सत्कार्योत्तेजक सभा - धुळें

( स्थापना - १८९५ ज्येष्ठ शुद्ध ४ )



श्री

## रामदास आणि रामदासी

भाग सत्तेचाळिसावा

सर पांचवा ]



[ मणि तिसरा

# श्री समर्थशिष्य कल्याण



कल्याणवांच्छा जयाचे जीवीं । भाव धरावा कल्याणपाईं ।
भाळोन तयाते जनकजावाई । करी कल्याण सर्वस्वें ॥



संपादक - गणेश शंकर देव, धुळें



राजशक २७२ ज्येष्ठ शुद्ध १३
तारीख २३ जून १९४५



सहा
किंमत [redacted] रुपये

# श्रीसमर्थशिष्य कल्याण

## अनुक्रमणिका

[ ४ ] श्री मारुतीचीं पदें



[ ५ ] श्री दत्तात्रयाचें पद



[ ६ ] श्री शंकराचीं पदें



[ ७ ] श्री कृष्णाचीं पदें



[ ८ ] श्री देवाचें पद



[ ९ ] श्री समर्थांचीं – श्रीगुरूचीं पदें

## परिशिष्टें



( परिशिष्टें २ ते ८ ही पार वर्षांपूर्वी
ती. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं लिहिलेलीं हात. )

## चित्रें

श्री

रामदास आणि रामदासी

भाग सत्तेचाळिसावा

# श्री समर्थ शिष्य कल्याण

( १ ) श्री सद्गुरुस्तवन

( २ ) थोडें प्रास्ताविक

[ १ ] श्री कल्याणकवन

[ २ ] श्री कल्याणस्तवन

[ ३ ] श्री कल्याणदर्शन

## ॥ श्री सद्‌गुरुस्तवन ॥

श्री गणपती गजानना । विघ्नहरा पार्वतीनंदना ।
विद्यादेवीच्या रमणा । ग्रंथारंभीं नमन तुज ॥ १

करुणालये ब्रह्मसुते । वाग्देवते श्री शारदे माते ।
ग्रंथारंभीं नमन तुतें । हृदयीं माझ्या वास करी ॥ २

लया जातीं विघ्नें सारीं । स्मरतां श्री जगदंबा अंतरीं ।
कोल्हापुरवासिनी ईश्वरी । कुलदेवते नमन असो ॥ ३

नमन बंदविमोचका । दाशरथी श्री रामा एका ।
राघवा सीतानायका । भारतवर्षा सोडवी ॥ ४

मतिमंद मी मूढमती । वंदिला श्री हनुमंत चित्तीं ।
रामचंद्रा जैसा मारुती । तैसा दासा कल्याण ॥ ५

हाहाकार राष्ट्रीं जाला । बेगोवेगीं धर्म बुडाला ।
राष्ट्रोद्धारक अवतरला । श्री रामदास स्वामी माझा ॥ ६

रामदास–शिष्यवरा । श्रीकृष्णतनया श्री शंकरा ।
इहपरलोकींच्या गुरुवरा । आशिर्वाद मज असो ॥ ७

जय जय जी देवदेवा । जन्मोजन्मीं तुमची सेवा ।
घडो अनन्य या जीवा । गणेश लोळे चरणांवरी ॥ ८

॥ श्रीरामसमर्थ ॥

# थोडें प्रास्ताविक

( १ ) श्रीसमर्थशिष्य कल्याण यांच्या संबंधीचा All about Kalyan या स्वरूपाचा ग्रंथ सत्कार्योत्तेजक सभेच्या श्री रामदास आणि रामदासी ग्रंथमालेंत गोवण्यांत यावा अशी कल्पना मनांत कांहीं काळ वागवून ती. शंकर श्रीकृष्ण देव यांना ती कळविली असतां त्यांना ती अति आवडली. आपल्याकडून हें कार्य होणार नाहीं असें मला वाटूं लागल्यामुळें देवांनीं तें दुसऱ्या कोणाकडून तरी करवून घ्यावें या हेतूनें वास्तविक माझी कल्पना मी त्यांना सांगितली. पण तसा ग्रंथ मी च संपादावा अशी त्यांनीं आज्ञा केली आणि आशीर्वाद दिला. मला नाहीं म्हणतां येईना.

( २ ) त्या आज्ञेचें फळ म्हणजे च प्रस्तुतचा ग्रंथ होय. अशा ग्रंथाचे साहजिक च तीन भाग पडतात. त्याप्रमाणें या ग्रंथाचे हि तीन भाग योजण्यांत आले. पहिल्या म्हणजे

## श्री कल्याणकवन

या भागांत श्री कल्याणांची कविता, आणि दुसऱ्या म्हणजे

## श्री कल्याणस्तवन

या भागांत कल्याणांवर त्यांच्या शिष्यप्रशिष्यांनीं आणि इतरांनीं केलेली कविता देऊन, उपलब्ध साधनांच्या साहाय्यानें संकलित केलेलें श्री कल्याणांचें चरित्र तिसऱ्या म्हणजे शेवटच्या

## श्री कल्याणदर्शन

या भागांत यावें, असें ठरलें आहे. त्यासाठीं श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील शेदोनशें बाडें चाळून कल्याणांनीं केलेली कविता आणि कल्याणांवर त्यांच्या शिष्यप्रशिष्यांनीं व इतरांनीं केलेली कविता उतरून काढली, ताडून पाहिली आणि पाठांतरांची नोंद करून घेतली. हें काम जिकीरीचें, दगदगीचें, तरी एका प्रकारें सोपें होतें. पण चरित्रसंकलनाचें काम अति कठीण जात आहे. त्यासाठीं देवांनीं सुचविलेले अनेक ग्रंथ चाळून वा वाचून टिपणें करावीं लागत आहेत. एके ठिकाणीं निवांत बसून लेखन आणि वाचन करण्याची संवय शरीराला आणि मनाला कधीं च लागलेली नाहीं ! त्यामुळें हें काम आपल्या आटोक्याबाहेरचें आहे, असें हि माझ्या मनांत वारंवार येत असतें. हें चरित्रसंकलन आपल्याकडून होईल असा विश्वास अजून हि मला वाटत नाहीं. त्यामुळें मनांत येतें कीं, " श्री कल्याणकवन " आणि

" श्रीकल्याणस्तवन " हे पहिले दोन भाग छापून होण्याच्या सुमारास " श्री कल्याणदर्शन " कोणी परस्पर घडविलें, तर तें उपकारक च होईल.

( ३ ) शेवटीं वाचकांना एक विनंति करावयाची आहे. मला ठाऊक आहे कीं, श्री कल्याणांचें दर्शन घेण्याची – त्यांचें यथातथ्य चरित्र जाणण्याची – उत्कंठा वाचकांना लागलेली असणार ! सोबतच्या प्रतिमेंत कल्याणांचें दर्शन घेऊन नेत्रांचें समाधान झाल्यावर, आणि

**कधीं भेटवीता गुरुपाउलाला ॥**

या आपण त्यांच्या केलेल्या विनवणीप्रमाणें, सद्गुरूंची आणि आपली भेट, या ना त्या जन्मीं, ते अवश्य करवितील असा विश्वास मनीं बाळगून, वाचकांनीं " श्री कल्याणकवन " आणि " श्री कल्याणस्तवन " या दोन भागांकडे अगोदर वळावें; कारण, तेथें च म्हणजे श्री कल्याणांच्या कवितेंत आणि कल्याणांच्या शिष्यप्रशिष्यांनीं व इतरांनीं त्यांच्यावर केलेल्या कवितेंत वाचकांना कल्याणांचें यथार्थ दर्शन होऊन त्यांच्या मनाचें समाधान होणार आहे. आणि मग, सवड झाल्यास, फुरसतीच्या वेळीं, वाटल्यास, ग्रंथाच्या तिसऱ्या म्हणजे " श्री कल्याणदर्शन " या भागाकडे त्यांनीं ओझरती दृष्टि टाकावी.

धुळें
१८६६ अक्षय्य तृतीया

गणेश शंकर देव



॥ श्री कल्याण स्वामी ॥



महाराज,

तुम्ही अग्रणी शिष्यशिष्योत्तमांचे ।
तुम्हां ठाउकें गूज माझ्या जीवींचें ।
गुरुदर्शना जीव व्याकूळ जाला ।
कधीं भेटवीतां गुरुपाउलाला ॥

# श्री कल्याणांचीं स्फुट प्रकरणें

## ( १ )

## महावाक्यपंचीकरण ग्रंथ

( बाडांक ३०८* वरून )

### शतक पहिलें

॥ श्रीराम ॥

मुळींचे स्मरण तें माहाकारण । गुणसंगें जाण अर्ध ऐसें ॥ १
मायायोगें मूळ प्रकृती ब्रह्मांडीं । अहं ब्रह्म प्रौढी तेथींची पै ॥ २
जीव पिंडीं ज्ञान तें महाकारण । अहं जीवपणें भ्रांतीगुणें ॥ ३
जीवशिवऐक्य देहातीत ज्ञानें । परी स्थानमानें देहसगें ॥ ४
अवस्था हे तुर्या ते सर्वसाक्षिणी । स्थानक हे मूर्धनी ब्रह्मरंध्र ॥ ५
अभिमानी पिंडीं प्रत्यगात्मी जाण । परमात्मा हे खूण ब्रह्मांडींची ॥ ६
शुद्ध सत्वगुण गुणेंद्र तो जाण । ज्ञानशक्ति खूण मूळमाया ॥ ७
परा वाणी तेथें उन्मेषु नादाचा । जाणात्री हे वाचा चौथी जे कां ॥ ८
आनंदावभास भोग उभयेता । मुक्ति सायोज्यता अथर्वण ॥ ९

---

* श्री रामदासी संशोधनाच्या प्रथम खंडांत या बाडाची नोंद करितांना शंकर श्रीकृष्ण देव म्हणतात, " अज्ञानामुळें कल्याणमहाराजांविषयीं महाराष्ट्रानें ज्या कल्पना करून घेतल्या होत्या त्या आतां साफ बदलल्या पाहिजेत. ग्रंथ अभंगात्मक आहे. त्याचीं सात शतकें आहेत. ग्रंथसंख्या ७७१ शेवटीं नमूद आहे. दुर्दैवानें पहिल्या शतकाचीं शेवटची पानें व स तव्याचीं आरंभीचीं पानें हरवलेलीं आहेत. तिसऱ्या शतकाच्या १०४ आव्या आहेत. दुसऱ्या, चवथ्या, पांचव्या आणि सहाव्या शतकांच्या प्रत्येकीं १०१ ओव्या आहेत. शतकें म्हटलीं असलीं तरी सातव्या शतकाच्या ६४ च ओव्या आहेत. यावरून पहिल्या शतकाच्या १९९ असल्या पाहिजेत. संपूर्ण ग्रंथ केव्हां तरी मिळाला पाहिजे आणि छापला गेला पाहिजे. "

कोठवर थांबावें ? आपण तो आज अपूर्ण च स्वरूपांत येथें छापीत आहोंत. पूर्ण व्हावयाचा असेल तेव्हां होईल. — संपादक

अर्धमात्रा नाम संकेतें हें जाण । चतुर्थ चरण प्रणवाचा ॥ १०
ऐसे चारी देह पिंड हे जीवाचे । ब्रह्मांड शिवाचें साक्षी देव ॥ ११
ऐसी जाली सृष्टी माजी अष्ट सृष्टी । कल्पनेचे पोटीं सबळत्वें ॥ १२
तंव शिष्य म्हणे कैशा अष्ट सृष्टी । स्वामी म्हणे गोष्टी सांगों ऐक ॥ १३
कल्पनीक येकी शाब्दीक प्रत्यक्ष । चौथी चित्री लक्ष जाणीजे पै ॥ १४
स्वप्नले पै सृष्टी पांचवी जाणावी । स्वपरत्रभावीं साहावी पै ॥ १५
सातवी ते वर्चार सृष्टि ऐसि म्हण । जे दृष्टिबंधन आठवी हे ॥ १६
ऐशा अष्ट सृष्टी सबळ कल्पना । प्रळयांतीं जाणा नाशताहे ॥ १७
प्रळये कैसा तो मी नेणे जी स्वामी । सांगों उपक्रमीं बुझसील ॥ १८
प्रळये ते पांच दोनी ते पिंडीचे । लक्षण तयाचें ऐसे असे ॥ १९
प्रत्यई जीवातें सुषप्ति कारण । स्थूळ लिंग भान लपे तेथें ॥ २०
हा नित्यप्रळये जाणा दैन्यंदीन । स्थूळाचें मरण दोनी पिंडीं ॥ २१
ब्रह्मांडीं प्रळये दोनी जे आहेती । ब्रह्मयाची सुषप्ति दैन्यंदीन ॥ २२
चारीं युगें क्रमें सहस्रदां जाये । ते दिवस होये ब्रह्मयाचा ॥ २३
हें चि परमीत रात्रीचें जाणावें । विधी लीन व्हावें अव्याकृतीं ॥ २४
स्थूळोत्पत्ती सरे तपे द्वादशार्क । महा मेघोदकें वर्षतील ॥ २५
तै प्रळयोदकीं त्रैलोक्य निमेल । अज्ञानीं राहील हिरण्यगर्भ ॥ २६
विधीची हे निद्रा चौ सहस्रां युगां । पुरे होय जागा ब्रह्मा तई ॥ २७
पुन्हां जीव लिंग संचितारंभकें । सामर्थ्ये कौतुकें सृष्टी निर्मी ॥ २८
सुषुप्ती समाधी ब्रह्मयाची ऐसी । दुज्या प्रळयासी सांग आतां ॥ २९
तो माहाप्रळयो सर्व लयो होतां । ब्रह्मांडासहीत ब्रह्मादिक ॥ ३०
शत वरुपें मेघ उघडती तेथें । आदित्य तपत तीव्र बारा ॥ ३१
भस्म सृष्टी चर भडाग्नी सूर्याग्नि । पादप पाषाणीं भस्म व्हावें ॥ ३२
शशीचा[1] गरळा तेज सूर्ये ज्वाळा । मिळोनि पाताळा दग्ध करी ॥ ३३
शत संवत्सर पूर्ण नभोदरीं । मेघ शुंडाधारीं प्रळयाचा ॥ ३४
जीव भूमंडळ जळोनिया ज्वाळा । मिळोनी पाताळा येक जाले ॥ ३५

(१) शेषाचा

शुंडाधारीं मेघें जळ महांपुरें । दग्ध पृथ्वी विरे जळामाजीं ॥ ३६
सप्त हि सागर माहां मेघोदकें । तें आवर्णो (द) क येक जालें ॥ ३७
भूगोळीं मर्यादा मही नाही होत । जळ चि वर्तत तेजोदरीं ॥ ३८
आवर्णाग्नि आणि प्रळयाग्नि तेथें । काळाचे क्षुधेतें रुद्राक्षें ही ॥ ३९
ऐसे सर्व अग्नी जाजुल्य जालीयां । जळ शोखुनीयां तेज उरे ॥ ४०
अद्भूत समीर तेजातें खग्रासी । तयाचे निरासी सर्व वायु ॥ ४१
लिंगदेहीं जे कां अनंत संचीतें । जीवशिव युक्तें येक जालीं ॥ ४२
इच्छारूप जे कां स्फुरण चंचळ । समीरीं सकळ बीज आलें ॥ ४३
अव्याकृत जें कां अज्ञान कारण । वायूचें चळण बीज ऐसें ॥ ४४
वायोचा उद्भव होय जेथुनीयां । पुन्हां जाये लया स्फुरणीं तो ॥ ४५
ढसाळाचें बीज जेवि वटबीज । प्रमाण सहज बोले वेद ॥ ४६
कल्प महाप्रळय याची ऐसी गोष्टी । सर्वा परीपाटीं बीज माया ॥ ४७
जेथुनी उपजत तेथें लीन होये । स्फुरणाची सोय सृष्टयाकार ॥ ४८
बोलावया शब्द ब्रह्मीचा विवर्त । अधा ऐसी मात संकेताची ॥ ४९
या माहा प्रळयीं सर्व वीचलें । यांत सांपडलें नाहीं तें चि ॥ ५०
स्वरूपीं मिळणी वीण जे बाहेरी । पुन्हा येरझारी न चुकती ॥ ५१
पुन्हा ऐसी मात ऐक्य शिष्यराव । म्हणे हा उद्भव पुन्हां कैसा ॥ ५२
पूर्वी जें बोलिलें त्याचीपरी सर्व । जाण अभिप्राव खूण ऐसी ॥ ५३
ब्रह्मा विष्णु रुद्र देव ऋषी गण । दानव मानव सर्व जे कां ॥ ५४
स्वरूपाकार जे देव त्रै जाण । ते अवतरण नित्यमुक्त ॥ ५५
अं(१)नु जे कां ब्रह्मीं तें प्रळयातीत । बीजांगें निर्भीत चुकेना कीं ॥ ५६
चौप्रळयाचा रूपाचा संकेत । जाण संकळीत सांगीतलें ॥ ५७
याकारणें ज्ञान सद्गुरुकृपेनें । प्रवाहीं जिवानें चुकीजेतें ॥ ५८
जीव शिव कैसे विचारिलें ठाया । विवेकप्रळया रूप ऐसें ॥ ५९
पंचम जाणीजे देवाभक्तांसी जे । ऐक्य तेथें बुझे विचारानें ॥ ६०

(१) अणु

सत्य रूप ज्ञान हें जवं नेणीजे । तवं न होईजे भवातीत ॥ ६१
असतांची दशा नाम रूप भास । व्हावें निराभास सर्वातीत ॥ ६२
व्रतें तपें यज्ञ तीर्थें नाना विधी । नाना कळा सिद्धी जरी जाल्या ॥ ६३
नाना मत्तें योग जनीं नाना परी । परी मायापु......

## शतक दुसरें

॥ श्रीरामसमर्थ ॥

तुर्येपुढें जे कां निवांत जाणीव । चिन्मये तो देव शुद्ध ज्ञान ॥ १
याचा येक औंश जडातें व्यापुनी । विचित्र करणी दिसाळाची ॥ २
चौंभूताचा खेळ येका औंश जाण । अर्ध ऐसी खूण बुजे बापा ॥ १३*
वायु जेथें लीन जाल्यां जाणपण । तो च अर्ध जाण वस्तुरूप ॥ १४
अत्यंत गहन अर्थ येथें आहे । पाहिल्याविण हें काय कळे ॥ १५
थोर तो प्रत्ययो सत्य विवेकाचा । गुरुमुखें याचा शोध होय ॥ १६
वायु जाणपण मूळ बीज होय । सूक्ष्माची सोय जाण ऐसी ॥ १७
ब्रह्मांड नसतां चंचळासि ठाव । नाहीं अभिप्राव जाण बापा ॥ १८
अष्टधेचा मेळा स्फूर्तिमाजि घडे । सृष्टीपैलिकडे गोष्टी याची ॥ १९
पुढें जे रचना सर्व ब्रह्मांडास । तो चि येक औंश तुर्यागुण ॥ २०
लीळा सर्वेश्वर पूर्ण अगोचर । धरी चराचर येका औंशें ॥ २१
श्लोकपाद ॥ एकांशेन स्थितो जगत् ॥
अनुभवें शोध पाहिल्यावांचुनी । केवि बाणे मनीं खूण याची ॥ २२
अहं ऐसी स्फूर्ती ते चि मूळमाया । महत्तत्व माया वायुरूपें ॥ २३
मूळ मायेपोटीं विस्तार सर्व ही । वायूविण कांहीं असेचिना ॥ २४
वोंकाराची खूण मूळ तें चि जाण । आकाश तें पूर्ण अंतरात्मा ॥ २५
तेथुनिया सर्व सृष्टी आरंभली । विस्तारें बोलिली ऐक आतां ॥ २६

* मूळांत च येथून पुढें ३, ४, ५ वगैरे ऐवजीं १३, १४, १५ वगैरे आंकडे पडले आहेत.

आकाश तें चि तें जाणिव बोलिजे । वायु तो सहज चंचळत्वें ॥ २७
त्रिगुण आणितें पंचभूतमेळा । आकार भूगोळा वायुरूपें ॥ २८
मूळीचा कर्दम वायो ते जाणीव । जगज्जोति नांव शिवशक्ती ॥ २९
दों रूपें समीर सीत आणि उष्ण । विजू सूर्य चंद्र तारांगणें ॥ ३०
शक्ति वायुचिये घसणीते संधी । ते तेजोद्भव वृद्धि विजू सूर्य ॥ ३१
सीतळ वायु जो सतेज मिश्रित । तेथें उमटत तारा चंद्र ॥ ३२
आप तें चि मृद मेघ ते विशद । पृथ्वी ते प्रसिद्ध जळीं गोठे ॥ ३३
ऐसीं पंचभूतें गुणत्रै मिश्रित । ऐकणें संकेत सावधान ॥ ३४
सर्वेश्वरइच्छा त्रिविध प्रकार । त्रिगुणविचार जाणिजे पैं ॥ ३५
शुद्ध जाणपण सत्वगुण जाण । जाणणें नेणणें रजोगुण ॥ ३६
नेणणें तो चि तो तमोगुण तेथें । त्रिगुण या अर्थे बुझें ऐसें ॥ ३७
भूताआंगीं गुण गुणाआंगीं भूतें । प्रचितीस येतें विचारानें ॥ ३८
जाणीव समीर अष्टधा प्रकार । सृष्टि हे विस्तार मूळान्वयें ॥ ३९
प्रत्ययें पहातां निश्चयेसीं होय । येदर्थीं संशयो नाहीं बापा ॥ ४०
तंव शिष्य म्हणे आलें प्रत्ययासी । अनुमान यासी नाहीं स्वामी ॥ ४१
परंतु आशंका येकी उद्भवली । ग्रंथांतरीं बोली भिन्न आहे ॥ ४२
मायेपोटीं गुण गुणापोटीं भुतें । वाढलीं समस्तें तमोगुणी ॥ ४३
तेथुनी आकाश वायु तेज आप । पृथ्वी ऐसें रूप विस्ताराचें ॥ ४४
ठाईं ठाईं ऐसें बोलियलें देवा । वाटे याचा गोवा शास्त्राधारें ॥ ४५
गुणापलिकडे भुतें सांगितलीं । मूळ माया केली भूतात्मकें ॥ ४६
शिष्याचा आक्षेप ऐके स्वामि ताता । कैसें जाला देता प्रश्नोत्तर ॥ ४७
शास्त्रीं निरोपिलें तें चि हें बोलिलें । पाहिजे शोधिलें स्वानुभवें ॥ ४८
श्रुतिशास्त्रीं आहे नीट चि वक्तव्य । उमजल्यां सोय कळों येतें ॥ ४९
धाटि पाहों जातां ग्रंथाचिये साक्षी । जाणाया परीक्षी पाहिजे तो ॥ ५०
परीक्षेवांचूनी सर्व अनुमान । नव्हे समाधान तेणें गुणें ॥ ५१
ऐका याची युक्ति सावधान श्रोता । मुळींची वेवस्ता भुतें कैसीं ॥ ५२
कर्दम त्रिगुण भुतें अष्ट काया । आदि मूळमाया सुक्षम ते ॥ ५३

आळोनिया नीर जेवि भासें गार । तैसा सर्वेश्वर दृश्यामाजिं ॥ ५४
भू जळाग्नि वायु पांचवें आकाश । तो मूळपुरुष महद्भूत ॥ ५५
इच्छा मूळशक्ति वोंकाराची गती । वायुविण स्फूर्ति शब्दीं कैंची ॥ ५६
वायुविण शब्द नव्हे कीं साचार । बोलिलें वोंकार पाहा कोण ॥ ५७
ज्ञाप्ति नाद मात्रा तिन्हीं येकाक्षर । नाद तो प्रकार वायुरूपें ॥ ५८
मुळीं जरी नाद स्मरण विचार । पुढें तो उच्चार शब्दमात्रा ॥ ५९
त्रिगुणाचीं रूपें कर्तृत्वें दिसतीं । येरवीं असती मुळामाजि ॥ ६०
सृष्टीपूर्वीं गुण कोण्या रूपें होतें । होतीं पंचभूतें कैसीं पाहा ॥ ६१
स्फूर्तीमाजि पूर्वीं बीज सर्व जाण । तरी हें निर्माण बंड जालें ॥ ६२
मुळीं हो भुगोळीं हो कां तिहीं ताळीं । पंचभुतें मेळीं अनु नाहीं ॥ ६३
यदर्थीं वचन असें येक जाण । करावें श्रवण श्लोकार्थासी ॥ ६४

श्लोक ॥ स्वर्गमृत्यपाताले वा यत्किंचित्सचराचरं ।
सर्वं पंचभूतिकं राम षष्ठं किंचित् न दृश्यते ॥ १ ॥

प्रचिती पहातां वेगळा भुतासीं । ठाव त्रिगुणासी कोठें आहे ॥ ६५
पंचभूतात्मक सर्वही आकार । मुळेविण थार गुणा कैंची ॥ ६६
गुण भूतें येक मुळींच आहेतीं । विचारावें चित्तीं खोल दृष्टी ॥ ६७
ब्रह्मांडापरतें विवेकें भरावें । पाहातां स्वभावें कळों येतें ॥ ६८
सर्वा पैलिकडे मूळमायेपोटीं । अव्यक्त हे दाटी गुणभूतें ॥ ६९
ऐसें निरूपण वेदांतीचें जाण । अष्टधा स्मरण मूळमाया ॥ ७०
सुक्षम कर्दमु जरी मुळीं होता । पावला पष्टता विस्तारासी ॥ ७१
पुढें आकाराया ढोबळें वाढाया । सुक्षमाची क्रिया स्थूळा आली ॥ ७२
शिष्य म्हणे हां जी खुणे पावलों मी । समजलों स्वामी दीनबंधु ॥ ७३
मूळमाया पंचभूतिक सुक्षम । जाणितलें वर्म अनुभवें ॥ ७४
मूळमाया कोणें केली हें सांगिजे । कोडें हें उमजे जेणें स्वामी ॥ ७५
मायेपुढें सांग प्रासार बोलिला । आधार तयेला कोणाचा पैं ॥ ७६
वोघ पुढें जो कां बाणला समज । उगमीं उमज व्हावा देवा ॥ ७७
ब्रह्म तें निश्चळ माया हे चंचळ । सांगा अळुमाळ संधी याची ॥ ७८

ब्रह्मासी लागेना स्पर्श दुजा कांहीं । माइक सर्व हि कोणें केलें ॥ ७९
परब्रह्में केलें सर्व चराचर । ऐसें ज्ञाते फार बोलताती ॥ ८०
कैसा हा विचार सांगा सविस्तर । ऐकावें चतुर वक्ता म्हणे ॥ ८१
ग्राम जेथें नाहीं सीमा तेथें कैंची । ब्रह्मीं कर्तृत्वाची वार्ता केवी ॥ ८२
जळ नाहीं तेथें तरंग कोठुनी । वृक्ष ते नसोनी छाया कैसी ॥ ८३
निर्मळासी मळ कैंचा लागों पाहे । कदापि न साहे ब्रह्मीं दुजें ॥ ८४
संत महानुभाव परब्रह्म जाले । ते मागुते आले घडेना कीं ॥ ८५
ब्रह्मासी करणें वाउगें बोलणें । वेर्थ अनुमानें शोधेंविणें ॥ ८६
असो मूळमाया कोणें केली हे चि । ऐकणें येथींची विवंचना ॥ ८७
मुळीं मिथ्या त्याचा कर्ता कोण आहे । प्रत्ययेंविण हें कळेना कीं ॥ ८८
माया शब्दें जाण लटिकें वचन । नाहीं च कवण करी तेथें ॥ ८९
सत्य जालें नाहीं जालें मिथ्या पाहीं । केलें कोणे काई बरें पाहा ॥ ९०
पूर्ण ते चि दृष्टी सत्य ऐसी गोष्टी । मुळीं नाहीं सृष्टी माया कैंची ॥ ९१
शिष्य म्हणे स्वामी कैसें हें बोलणें । कैंवि उमजणें अर्थ याचा ॥ ९२
विस्तार सांगतां नाहीं हि म्हणतां । आशंका हे आतां कैसी फिटे ॥ ९३
स्वामी म्हणे तुज नाहीं हें बिंबलें । मागुतें बोलिलें ऐक आतां ॥ ९४
आदि परब्रह्म येक नित्य मुक्त । अक्रिय येकांत ईश्वराचा ॥ ९५
तेथें अव्याकृत सुक्षम बोलिली । मूळमाया जाली श्लोक ऐका ॥ ९६

श्लोक ॥ आदिमेकं परं ब्रह्म ॥ नित्यमुक्तमविक्रियं ॥
तस्य माया समावेशो जीवमव्याकृतात्मकं ॥ १

जेथें मन वाचा निशेष राहिली । तेथें उद्भवली माया कैसी ॥ ९७
मूळ स्फूर्ती जे कां मुळीं आहे जाण । तयेचें स्फुरण दृश्याकारें ॥ ९८
तेणें गुणें नांवें बहुत लागलीं । दृश्यातीत बोली कैंची तेथें ॥ ९९
ब्रह्में नाहीं केली दिसे विस्तारली । पाहिजे ऐकिली युक्ति याची ॥ १००
हें चि निरूपण सांग पुढें आहे । कल्याणें सर्व हें बोलियलें ॥ १०१

इति श्री मूळ सूक्ष्म विवरण महावाक्य शत द्वितीय संपूर्ण ॥



## शतक तिसरें *

॥ श्रीराम ॥

निर्गुण निर्विकारी तें परब्रह्म । निश्चळ जाणीव रूप त्याचें ॥ १
अलक्ष प्रत्ययें स्वरूप जाणणें । लक्षी दरुषण अवकाश ॥ २
अवकाशा नाम आत्ममाया ऐसें । सोहं स्फुरण तेथें विकासलें ॥ ३
स्फूर्ति ते चि अर्धनारीनटेश्वर । सर्वांचा आधार जाणपणें ॥ ४
जीवेश्वर तेथें दृश्य योगें भेद । नामें अनुवाद बहुसाल ॥ ५
सर्वात्मा चि स्वात्मा देव तो जगदात्मा । तो चि तो परमात्मा आदिमूर्ती ॥६
अनंत ब्रह्मांडें इच्छामात्रें होतें । आपण निवांत सस्वरूपीं ॥ ७
सर्व सूत्रधारी दुजा कोण करी । करुनिया परी अकर्ता तो ॥ ८
सर्व द्रष्टा तो चि जाणता बोलिजे । जाणिवेविण जें सार कैसें ॥ ९
मुळीं मूळमाया ऊर्ध्व ब्रह्माकार । तरी हा विचार जीवालागीं ॥ १०
साच आदि अंतीं स्थानक जयाचें । जाणावें शब्दाचें अर्थांतर ॥ ११
उपासना सत्य हे रामदासाची । परंपरा साची मूळान्वय ॥ १२
सर्वज्ञ चिंतितां कृपा त्याची होते । आपुलें सुख ते देत जीवा ॥ १३
द्रष्टा हा तंववरी दृश्य मायोपाधी । लयांतीं ते शुद्धि कोण सांगे ॥ १४
वायुगुणें माया जड ते अविद्या । ब्रह्मांडाची विद्या जाणा ऐसी ॥ १५
विवेकें हें जडचंचळ सांडितां । स्फूर्ती हे तत्वता ब्रह्माकार ॥ १६
ब्रह्म सदसंत चळ अधो + थ । संधी ते सतत मूळ स्फूर्ती ॥ १७
तयेलागीं मूळमायासें बोलती । परंतु ते स्थिती ऐसी असे ॥ १८
नामरूप भानु तंववरी स्मरण । परतल्या पूर्ण जैसें तैसें ॥ १९
ऐसें आहे रूप ये मूळमायेचें । विचारें येथींचें कळे वर्म ॥ २०
जाणीव ते मूळ रूप स्वतः सिद्ध । जुनाट हा भेद येकरूपें ॥ २१

---

* बाडांक ३०८ चे लेखक तीन असावेत अशी देवांची कल्पना आहे; शतकें १ व ५ हीं कल्याणांच्या हातचीं, २ व ६ हीं दुसऱ्या कोणाच्या हातचीं आणि ३ व ४ हीं आणखी तिसऱ्या कोणाच्या हातचीं असावींत असे त्यांना वाटतें; ७ वें शतक या तिघांपैकीं कोणाचें याबद्दल ते साशंक आहेत. कल्याणांच्या परंपरेंत हस्ताक्षरांचें साम्य विशिष्टत्वानें आढळून येतें. – संपादक

ढिसाळ चंचळ जाणिवेचें रूप । नसतां स्वरूप कोण जाणे ॥ २२
असो हें जाणावें जेणें अनुभवें । होईजे स्वभावें निरोत्तर ॥ २३
दृश्य साच जालें वाटे ब्रह्में केलें । विचारितां जालें नाहीं मूळीं ॥ २४
माईक धरीलें ब्रह्म आच्छादलें । विवेकानें केलें जैसें तैसें ॥ २५
तंव शिष्य म्हणे फिटली आशंका । मूळींच्या विवेका जाणीतलें ॥ २६
पुढें हा आकार सर्व ही प्रासार । जाहलें जगत्र कोणे परी ॥ २७
कैसें तें ब्रह्मांड कैसें जालें पिंड । जीवशिव बंडरूपा आले ॥ २८
त्वंपद तत्पद याचा कैसा भेद । सांगणें विशद करूनिया ॥ २९
वक्ता म्हणे वृत्ति न व्हावी चांचल्यें । बोलिलें साकल्यें निरूपण ॥ ३०
सूक्ष्म कर्दम मूळीं अष्टधेचा । सांगितला याचा अर्थ पूर्वी ॥ ३१
देव विश्वंभर विश्व बीजाधार । व्यापुनी सतंत्र आदि अंतीं ॥ ३२
दृश्याचें स्फुरण तें चि विस्मरण । इच्छा ऐसी खूण जाण माया ॥ ३३
ऊर्ध निरावेव अर्ध तो प्रणव । महत्तत्वठाव गुणालागी ॥ ३४
अर्ध ते चि माया मुळाचिये पोटीं । देवगुणाधिष्टी सृष्टिभावें ॥ ३५
मुळीं तें अव्यक्त गुण आणि भुतें । सृष्टीलागी व्यक्तें पुढें तें चि ॥ ३६
अर्धमात्रापर स्मरण साचार । सर्वां सर्वेश्वर सोहं ब्रह्म ॥ ३७
ईया चि भेदें कीं योगिये जाणती । प्रणवाची गती येथुनीयां ॥ ३८
माया अर्धमात्रा त्रिगुण उद्भव । ॐकार प्रणव बोलिजेत्तो ॥ ३९
येक सूत्र तें चि विविध जाणावें । भिन्न भिन्न नांवें क्रियायोगें ॥ ४०
आदि मध्ये अंत येक चि शेवटीं । परी शास्त्रगोठी बोलिजेत ॥ ४१
देव आदिमूर्ती चिदानंदघन । लीला त्याची पूर्ण तो चि जाणे ॥ ४२
स्वइच्छेचा खेळ करी नानापरी । सामर्थ्याची थोरी वेद नेणे ॥ ४३
इच्छेच्या सामर्थ्यें निर्मिलें सृष्टीतें । निर्माण मायेतें तेणें केलें ॥ ४४
दिसे आणि भासे सर्व हि पाहतां । हे तयाची सत्ता कळारूपें ॥ ४५
ऐसी माया केली गुणा प्रसवली । औठ ऐसी बोली जाणिजे पैं ॥ ४६
क्षोभली त्रिगुणी माया अर्धमात्रा । त्या चि औट मात्रा प्रणवाच्या ॥ ४७

त्रिगुण ते चि तें त्रिपदा गाईत्री । वेदशब्दोच्चारीं मात्र त्रई ॥ ४८
येकानळी पुष्प तीन पाकोळिका । किंवा त्रिकाळिका शूळदंडा ॥ ४९
येका चि शिखरें जेवि तीन शृंगें । त्रिगुण येकांगें सम तैसें ॥ ५०
उद्भव त्रिगुणी ते गुणक्षोभिणी । विस्तारालागुनी पष्ट रूपें ॥ ५१
प्रथम उच्चार वेद शब्दांकुर । मात्रा मूळ स्वर पन्नासाचा ॥ ५२
सत्वगुण येक रजोगुण दुजा । तमोगुण तिजा नामें ऐसीं ॥ ५३
रूपें स्थानें मानें चौप्रकारें पाहीं । अकारी सर्व ही बोलिजेती ॥ ५४
त्रिगुण त्रिवळी समत्वें बोलिली । तत्वें विस्तारलीं पष्ट पुढें ॥ ५५
तंव शिष्य म्हणे त्रिगुण समान । हें कैसें वचन जाणावें पैं ॥ ५६
मायेपोटीं सत्व सत्वापोटीं रज । रजांगीं निपज तमालागी ॥ ५७
बहु ठाईं ऐसें बोलणें ऐकिलें । संशयीं पडिलें मन येथें ॥ ५८
याचा कैसा भाव निवडूनी सर्व । सांगा अभिप्राव कळे ऐसा ॥ ५९
ऐसी हे आशंका वाटली प्रश्निका । वक्ता म्हणे ऐका हें चि आतां ॥ ६०
शास्त्रीं बहु भेद बोलिले असती । वेवादाची युक्ती याचिलागी ॥ ६१
शास्त्रकारें ठाईं ठाईं निरोपिलें । पाहिजे घेतलें प्रचीतीनें ॥ ६२
सर्वेश्वराची हे इच्छारूप सृष्टी । कल्पितां चि उठी साकारत्व ॥ ६३
तेथें आदि मग गुण कैसे होती । ऐसी हे प्रचीती विचाराची ॥ ६४
त्रिगुण कर्दम पाही मुळाकडे । तो कैसा निवडे मागें पुढें ॥ ६५
कारण थोर तें प्रचीतीचें काम । दीर्घ दृष्टी वर्म जाणिजेतें ॥ ६६
परीपाठ युक्ती ग्रंथाची संमती । बोलायाची गती ऐक्यत्वाची ॥ ६७
सांगितलें ऐका महावाक्यामाजीं । ऐकतां सहजीं जाणवेल ॥ ६८
महामाया इच्छा तेथें शुद्ध सत्व । तें चि महत्तत्व ज्ञानशक्ती ॥ ६९
तया गर्भीं वर्ते रज आणि तम । ऐसें येक वर्म बोलण्याचें ॥ ७०
इच्छारूप शक्ती त्रिगुणाची गती । त्रिगुणीं त्रि शक्ती वर्तताती ॥ ७१
त्रिगुणी जनीलीं तत्वें रूपा आलीं । कोणेपरी जाली रचना हे ॥ ७२
पांच हि पंचकें पंच महाभूतें । त्रिगुणीं समस्तें देखियेलीं ॥ ७३
देव इच्छागुणें सृष्टि आरंभणें । चालायाकारणें तिनी देव ॥ ७४

ब्रह्मा विष्णु रुद्र देवाचे औतार । जाणा आज्ञाधार परेशाचे ॥ ७५
उत्पत्ति पाळण आणि तो संव्हार । तिनी अधिकार अभीमानें ॥ ७६
गुणीं तत्वव्येक्ति महावाक्यीं युक्ती । ऐकावी पद्धती साक्षरूपें ॥ ७७
तमोगुण द्रव्ये शक्ती समवेत । पंच प्रसवत महाभूतें ॥ ७८
तामसी गगन गगनीं पवन । पवनीं दहन उद्भवलें ॥ ७९
दहनीं जीवन जीवनीं भूमिका । पष्ट दशा ऐका पंचभूतें ॥ ८०
विषयोपंचक पंचभूतीं जाण । शब्दवोळखण आकाशाची ॥ ८१
स्पर्श तो पवनीं रूप जाण वन्ही । रस तो जीवनीं गंध पृथ्वी ॥ ८२
तमीं तत्व सृष्टी येकें येक दाटी । भोग्य सद्य गोष्टी कार्यभोग्य ॥ ८३
राजसाहंकारी क्रिया शक्तीयुक्त । तत्वें हें जनीत पंचदशा ॥ ८४
श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा आणि घ्राण । ज्ञानेंद्रिय जाण पंचक हे ॥ ८५
वाचा पाणि पाद शिश्न आणि गुद । पंचक विशद कर्मेंद्रिय ॥ ८६
व्यान समान जो उदान अपान । पांचवा तो प्राण पंचक हे ॥ ८७
ऐसी रजोगुणीं तत्ववृद्धि जाली । साधनें हे बोली सकळीकीं ॥ ८८
सत्वगुणें ज्ञानशक्ति समवेत । अंतःकरण हेत पंचरूपें ॥ ८९
अंतःकरण मन बुद्धि चित्त चौथें । अहंकार येथें पांच जालीं ॥ ९०
येक चित्त चतुष्ट नामी तें भिन्नत्व । उपाधी कर्तृत्व योगें जाणा ॥ ९१
भोक्ता साधक हे कर्ता भोक्ता ऐसें । सत्वीं बोलिलेसें तत्वज्ञानी ॥ ९२
त्रिविधा अहंकार शक्तीचा विस्तार । कर्ता सर्वेश्वर इच्छामात्र ॥ ९३
त्रिगुणाचा खेळ तत्वें हें सकळ । निर्मिला पाल्हाळ येकदां चि ॥ ९४
ज्ञाता ज्ञान ज्ञेय कर्ता कारण कार्य । भोक्ता भोग भोग्य त्रिपुटी हे ॥ ९५
अंतःकरण भोक्ता इंद्रियासी भोग । भुतीं भोग्य योग विषयरूपें ॥ ९६
भोक्ता तो साधकु तिनी साधनेसीं । मिश्रीत तामसीं मेळे पांच ॥ ९७
सत्वरजीं तत्वें सूक्ष्म भूतांचीं । कर्दमासी तें चि महाभूतीं ॥ ९८
तामस जनितें पंच महाभूतें । तदंशें समस्तें मिळालीं तें ॥ ९९
पूर्वीं होतीं गुप्त त्रिगुणीं विख्यात । तरी येकत्रें तें प्रगटली ॥ १००
नदी येकी तीन वोघ प्रासारले । पुन्हा येकी जाले तेवि भूतें ॥ १०१

येक पय जैसें त्रियांजुळीं द्रवे । येकत्वें सांठवे पात्राधारें ॥ १०२
पांचाची च तैसीं जाणा पंचवीस । येकत्र साभास कर्दमाचा ॥ १०३
ऐसीं सर्वें तत्वें कैसी ते मिळणी । **कल्याण** वचनीं सांगे पुढें ॥ १०४

इति श्री महावाक्ये प्रणवत्रिगुण विवरणं नाम शत तृतीये ॥ ३ ॥ ५ ॥

## शतक चौथें

॥ श्रीराम ॥

तो परस्परानुप्रवेशाचा मेळा । तत्वें जालीं गोळा महाभूतीं ॥ १
अंतःकरण व्यान श्रोत्र त्वचा ऐसीं । शब्देसीं आकाशीं प्रवेशलीं ॥ २
मन समान हे त्वचा चौथें पाणी । स्पर्शेंसीं पवनीं मिसळलीं ॥ ३
बुद्धि उदानेसी चक्षु पाद चौथें । रूपेंसीं मिळतें जालें तेजीं ॥ ४
चित्त अपानेसीं जिव्हा शिस्न रस । जालीं समरसें जाण अपीं ॥ ५
अहंकार प्राण घ्राण चौथें गुद । पांचवें ते गंध पृथ्वीयेसी ॥ ६
ऐसी विषयरूप पंचभूतें यासी । च्यारी येकयेकासी मिळालीं पै ॥ ७
देवइच्छा माया ते मूळ प्रकृती । जाली विस्तारती त्रिधारूपें ॥ ८
येथूनी प्रपंच शिव आणि जीव । उपाधी हे सर्व देवें केली ॥ ९
इच्छा मूळ शक्ति तेथें विस्मरण । देवाचें कारण अव्याकृत ॥ १०
महाभूतें मेळा येकत्र तामस । मायागुणें भास सूक्ष्माचा ॥ ११
ते चि गुणमाया भूतासमवेत । दो ठाईं करीत देवइच्छे ॥ १२
त्यांत येक भाग कळा पंचवीस । हिरण्यगर्भास निर्मीयले ॥ १३
अंतःकरण विष्णु चेंद्र तो चि मनु । बुद्धि कमळासनु देव लिंगी ॥ १४
चित्त नारायणु अहंकार खूण । तो गौरीरमण जाणावा पैं ॥ १५
श्रोत्र दिशा आणि त्वचा तो पवन । चक्षु सूर्य जाण दिव्यरूप ॥ १६
जिव्हा ते वरुण घ्राणाचा जो ठाव । तो अश्विनीदेव ज्ञानेंद्रियें ॥ १७
वाचा जाण वन्ही पाणी तो सुरेशु । पाद जाणिजेषु त्रिविक्रम ॥ १८
शिस्न प्रजापती गुद तो नैरुती । देवाची निगुती कर्मइंद्रियें ॥ १९
ब्रह्मांडीं विहरण तें चि पंचप्राण । दशभेदें जाण सप्त स्कंदीं ॥ २०

स्कंद कोणेपरी शिष्य प्रश्न करी । स्वामी तो उत्तरीं सांगे कैसें ॥ २१
पृथ्वीपासोनियां मेघाचें मंडळ । प्रथम सकळ अव स्कंद ॥ २२
मेघाहुनी सूर्यापर्यंत विशद । तो प्रवाह स्कंद दुसरा पैं ॥ २३
सूर्यापासोनियां चेंद्रमापावेतों । ऊर्ध स्कंद हा तो तिसरा कीं ॥ २४
चेंद्रापासोनियां ताराचें मंडळ । चौथा हा केवळ सह स्कंद ॥ २५
नक्षत्रापासोनी शनीपर्यंत हा । वैव स्कंद पहा पांचवा तो ॥ २६
शनीपासोनियां सप्तऋषी जेथें । पर स्कंदु वर्ते सहावा तो ॥ २७
ऋषीपासुनीयां ध्रुवस्थानीं भेद । परिवाहा स्कंद सातवा तो ॥ २८
भूताचें कारण मात्रा सूक्षम जाण । इंद्रियेसि ज्ञान विषयो पांच ॥ २९
ऐसे पंचप्राण सप्त स्कंदी जाण । व्यापुनी पवन चालतसे ॥ ३०
विषयाचें सुख स्थूळेंविण नाहीं । सूक्षमी पाहीं आतुडेना ॥ ३१
यालागी हे स्थूळ विराट देवाचें । मिश्रित भूताचें पंचकृत ॥ ३२
येक येक भूतें पांचा ठाईं केलीं । पांचा मेळविलीं परस्परें ॥ ३३
हे ईश्वरिं इच्छा सर्व हि कारण । भूत पंचीकर्ण वेद बोले ॥ ३४
येक चि आकाश पंच भाग जाले । ते कैसें मिळालें पंचविध ॥ ३५
अंतःकरणरूपें राहे आपणा पें । मिळे व्यानरूपें वायोआंगीं ॥ ३६
श्रोत्ररूपें वन्ही वाचांश जीवनीं । शब्दांशे मेदिनी नभा ऐसे ॥ ३७
वायु मनरूपें आकाशीं संचार । समान तो स्थीर आपणा पें ॥ ३८
त्वचारूपें तेजीं पाणी तें अपासीं । स्पर्श तो पृथ्वीसी वायुऐसा ॥ ३९
तेज बुद्धिरूपें प्रवेश आकासीं । आणि उदानेंसी वायुमाजी ॥ ४०
चंक्षु आपणा पें अपी पादरूपें । पृथ्वीरूप रूपें तेज ऐसें ॥ ४१
आप चित्तरूपें मिसळे गगनीं । अपानें पवनीं समरसे ॥ ४२
तेजीं जिव्हारूपें शिस्न अपणा पें । पृथ्वी रसरूपें आपऐसें ॥ ४३
पृथ्वी अहा रे मिळाली आकाशीं । प्राण तो वायुसी घ्राण तेजीं ॥ ४४
अपासी ते गुद अपणा पे गंध । पृथ्वी पंचविध मिळे ऐसी ॥ ४५
ऐसा हा येकोपा पंच महाभूतां । प्रकट स्थूळता पंचकृती ॥ ४६
कवण भूताचा कवण गुण कर्म । कोण कैसा धर्म ऐकावें पै ॥ ४७

सच्छिद्रता धर्म औकाश प्रधान । कर्म शब्दगुण आकाशाचें ॥ ४८
शब्द स्पर्श गुण चांचल्य हे धर्म । विहरणादि कर्म वायूचें पैं ॥ ४९
शब्द स्पर्श रूप गुण उष्ण धर्म । पचनादि कर्मे तेजाचे पैं ॥ ५०
शब्द स्पर्श रूप रस ऐसे गुण । कर्मधर्म कोण आपयाचे ॥ ५१
द्रवत्व हे धर्म क्लेदनादि कर्म । बुझे आपवर्म सांगितलें ॥ ५२
शब्द स्पर्श रूप रस आणि गंध । गुण पंचविध मेदिनीचे ॥ ५३
कठीणत्व धर्म धारणादि कर्म । पृथ्वीयेचे नेम जाण ऐसे ॥ ५४
मूळ तें कारण भूताचे हे गुण । कार्यासी ते जाण वर्तताती ॥ ५५
आरद्रत्व जैसें असे त्या जळातें । ते तरंगीं वर्ते तैशापरी ॥ ५६
येके भूतीं मुख्य ऐसे गुण येक । अन्ये अगांतुक चौं भूतांचे ॥ ५७
ते कार्यपरत्वें मिळोनी वर्तती । अधिक हे युक्ती ऐसी असे ॥ ५८
शब्द गुणाकाशीं तो वेद्य श्रोत्रांसी । जन्म हा वायूसी नभीं जाला ॥ ५९
यालागी द्विगुण समीरासी जाण । शब्द स्पर्श खूण श्रोत्र त्वचा ॥ ६०
वायूपासुनीयां जन्म या तेजासी । म्हणोनी तयासी त्रिगुणीनें ॥ ६१
शब्द स्पर्श रूप वेद्य हा त्रिपक्षु । श्रोत्र त्वचा चक्षु जाणा वन्ही ॥ ६२
तेजापासोनियां जन्म या आपासी । वेद्य इंद्रियासी चतुर्गुणी ॥ ६३
शब्द स्पर्श रूप रस गुण च्यारी । श्रोत्र त्वचा नेत्रीं जिव्हेसीं पैं ॥ ६४
जळीं पृथ्वी जाली पंचै गुणाथीली । ते चि वेद्य जाली पंच इंद्रिया ॥ ६५
शब्द स्पर्श रूप रस आणि गंध । पृथ्वीचा संमंध पंचइंद्रिया ॥ ६६
पंच महाभूतें केली पंचकृतें । देवें त्या अनंतें इच्छामात्रें ॥ ६७
पंचधातु मूस होये अग्नीसंगें । तेवि या श्रीरंगें केलें कैसें ॥ ६८
तन्मात्रा विचित्र भूतें कालविलीं । तात्काळ शोखिलीं महा तेजें ॥ ६९
ऐसा जाला गोळ त्याचे देह स्थूळ । निर्मी घननीळ ब्रह्मांड हें ॥ ७०
हिरण्यगर्भ जे देवताचें स्थान । देव ते संपूर्ण तेतीस कोटी ॥ ७१
यक्ष ऋषीगण गंधर्व किन्नर । आणि विद्याधर असुर ते ॥ ७२
कात्यायनी कोटी नव ऐसे जाण । कोटी त्या छपन्न च्यामुंडिका ॥ ७३
औट कोटी भूत आणिक बहुत । सूक्ष्मीं वर्तत वायुरूपें ॥ ७४

ऐसें हें सूक्षम देवाचें शरीर । त्या गृह्य विढार स्थूळ देहो ॥ ७५
यालागी सर्वेशें अवेवसमोहो । रचिला ऐका हो ब्रह्मांडीं या ॥ ७६
सप्त हि पाताळ ते चि श्रीचरण । तेथें अधिष्ठान त्रिविक्रमाचें ॥ ७७
कैसे ते चरण बोलो निवडोनी । तें नामाभिधान स्थानांकित ॥ ७८
विराट पाउलीं जाण पादतळ । तें होये पाताळ सातवें तें ॥ ७९
सहावें पाताळ जाण रसातळ । प्रपद्य केवळ विराटाचें ॥ ८०
गुल्फद्वय जें कां पांचवें पाताळ । ते चि महातळ नाम त्याचें ॥ ८१
चौथें जें पाताळ त्याची पोटरिया । नाम तरी तया तळातळ ॥ ८२
तिसरें पाताळ त्या नांव सुतळ । ते जानुयुगुळें विराटाचें ॥ ८३
दुसरें वितळ प्रथम अतळ । ते उरुयुगुळें जाणावे पै ॥ ८४
महीतळ तो चि जघनप्रदेशु । कंठ जाणिजेषु विश्वरूपा ॥ ८५
रोमावळी त्याची त्रिगुणगुल्मता । गंगादि सरिता नाडीचक्र ॥ ८६
सप्त हि सागर देवाचें उदर । वडवाग्नी जठर तेथें असे ॥ ८७
नाभिस्थान तें चि जाणा भूमंडळ । मध्य तो केवळ विराटाचा ॥ ८८
वक्षस्थळ ते चि जेथें जोतिर्लोक । आणि महर्लोक कंठस्थान ॥ ८९
जनलोक ते चि विराटीं वंदन । ललाटाचें स्थान तपोलोक ॥ ९०
ब्रह्मभुवन तें मस्तक जाणावें । सत्यलोक नावें विख्यात हा ॥ ९१
भानूचें मंडळ तें चि नेत्रगोळ । चक्षु ते विशाळ सूर्याऐसे ॥ ९२
दिशाची पोकळी जाणा कर्णबिळीं । श्रीकरकमळीं इंद्रलोक ॥ ९३
पुत्रकलत्रस्नेहे दंतपंगती ते हे । यमलोक पाहे दाढा त्याची ॥ ९४
वरुणलोक तो जिव्हारूप जाण । प्रजापती शिस्न विराटाचें ॥ ९५
निर्येलोकु जेथें गुदस्थान तेथें । जळवृष्टि रेत वृद्धियोग ॥ ९६
देहामाजीं क्रीमी कीटक आहेती । जीवयोनी होती त्रिभुवना ॥ ९७
व्यान तो चि नाग कूर्म तो समान । कर्कश उदान यीयापरी ॥ ९८
देवदत तो चि चौथा जो अपान । पांचवा तो प्राण धनंजये ॥ ९९

प्राणेसीं विराट तिन्हीं ताळें नीट । ब्रह्मांड हें पष्ट शास्त्र बोले ॥ १००
विराट देहाचें ऐसें हें लक्षण । ऐकावें कल्याण म्हणे पुढें ॥ १०१

इति श्री महावाक्य ब्रह्मांड विराट विवरण नाम शत ॥ ४ ॥

## शतक पांचवें

॥ श्रीरामसमर्थ ॥

ऐसा ब्रह्मगोळ पंचभूतखेळ । यामाजी सकळ जीवसृष्टी ॥ १
च्यारी खाणी च्यारी वाणी जीव नाना । योनी लक्ष जाणा चौऱ्यासी ते ॥ २
अंडज जारज स्वेदज उद्बिज । खाणीचा समज च्यारी ऐसा ॥ ३
अंडीं जे निपजे अंडज बोलिजे । जारज जाणिजे जारामाजी ॥ ४
पिंडब्रह्मांडींच्या स्वेदें जें निर्मित । स्वेदज हे मात जाणिजे पैं ॥ ५
अंतरिक्ष वायूमाजी प्राणी होती । कितीयेक क्षिती उद्बिज ते ॥ ६
उन्मेश स्फुरण परेचें लक्षण । ध्वनीरूप जाण पश्यंती हे ॥ ७
मध्यमा तो नाद वैखरी तो शब्द । च्यारी वाचा भेद ऐसा असे ॥ ८
पृथ्वीआपयोगें द्रव्यशक्तियुक्त । नाना उद्भवत बीजवडी ॥ ९
तेथुनी औषधी पासूनिया अन्न । पुढें वृद्धि जाण रेत त्याचें ॥ १०
भूमी गोळा बाह्य याची दशगुणें । असें आवरण पृथ्वीयेचें ॥ ११
तया दशगुणें आवर्णोदक हें । वेष्टणासी आहे सभोवतें ॥ १२
तया दशगुणें धडाडीत ज्वाळ । तो आवर्णानळ वेष्टलासे ॥ १३
तया दशगुणें थोर आवरण । जाणिजे पवन आधारासी ॥ १४
तयाहुनी थोर दशगुणाधीक । नभाचें कौतुक आहे पैं या ॥ १५
तया दशगुण अहंकार जाण । त्रिविध हे गुण येकत्वेंसी ॥ १६
तया दशगुण महत्तत्व जाण । असे पांघुरण ब्रह्मगोळीं ॥ १७
ऐसें सप्तावर्ण सर्व हें ब्रह्मांड । सप्तावर्ण पिंड तैसें ऐक्य ॥ १८
ऐसीं हें ब्रह्मांडें मायेचे उदरीं । होये भरोवरी स्फूर्तीमाजीं ॥ १९
विराटीं उभारा सृष्टीची रचना । जागृति हे जाणा अवस्था पैं ॥ २०
रजोगुण येथें उत्पत्ति बोलिजे । अभिमानी बुझे ब्रह्माऐसें ॥ २१

प्रथम चरण प्रणवाचा स्थूळ । आकार केवळ मात्रा ऐसी ॥ २२
हिरण्यगर्भ लिंग स्थिति अवस्था ते । सत्त्वगुण येथें जाणावा पै ॥ २३
अभिमानी विष्णु तेजसु तो भोक्ता । तारितो बुडतां भवीं जीवा ॥ २४
उकार हे मात्रा दुजी प्रणवाची । सूक्ष्म देहाची गती ऐसी ॥ २५
देवाचें कारण देह जे प्रकृती । प्रळये सुषुप्ति अवस्था ते ॥ २६
अभिमानी येथें रुद्र महेश्वर । मात्रा ते मकार प्रणवाची ॥ २७
अव्याकृत तें चि तमोगुण होये । ऐसे पादत्रये प्रणवाचे ॥ २८
सर्व सांगितली त्रिदेहांची युक्ती । ऐक्याचे अंतीं बरें पाहा ॥ २९
महाकारण जें देवाचें शरीर । स्वतां सर्वेश्वर अभिमानी ॥ ३०
सर्वसाक्षी ते चि अवस्था जाणावी । मात्रा ते प्रणवी अर्ध चौथी ॥ ३१
ब्रह्मांडींचे देहत्रय जे विशद । सबळ तत्पद कारणाचें ॥ ३२
पंचभूतें आणि त्रिगुण प्रसार । अष्टधा ॐकार विस्तारला ॥ ३३
शिवचतुष्टयें ब्रह्मांड बोलिलें । पाहिजे ऐकिलें पिंड कैसें ॥ ३४
पिंडी देहधारी जीव चतुष्टये । कैसा तो अन्वये सांगिजेल ॥ ३६*
आत्माराम सत्य जो स्वानंदघन । तें मूळ स्फुरण ब्रह्माकार ॥ ३७
त्यासी स्वरूपाचें नाहीं विस्मरण । चिन्मये तो पूर्ण ब्रह्मरूप ॥ ३८
त्यासी इच्छा जाली सृष्टी व्हावी ऐसी । किंचित् स्वरूपासी विस्मरे तो ॥ ३९
तें चि विस्मरण महामाया जाण । ईश्वरीं षड्गुण उद्भवले ॥ ४०
सृष्टीचें चिंतन स्वरूपीं दुश्चित । अज्ञानें अनंत शक्ति जाल्या ॥ ४१
मायोपाधी तें चि ब्रह्मांड हे शिव । सबळत्व भाव तत्पदाचा ॥ ४२
ते माया अज्ञान शक्ति प्रसवत । अविद्यासंकेत जीव तो चि ॥ ४३
अविद्यात्मक जीव ( तो चि ) पिंड गोळ । त्वंपद सबळ भ्रांतियोगें ॥ ४४
महामायायोगें ईश्वर षड्गुण । तें पूर्ण चैतन्य बोलिजेतें ॥ ४५
अविद्यात्मक हें जीवाचें अज्ञान । प्रत्यक चैतन्य ( जा ) णावें पैं ॥ ४६
नौतें बंड जैंई स्फूर्ती होती जैसी । जालियां हि तैसी साक्षरूपें ॥ ४७

---

* ३५ ऐवजीं ३६ आंकडा पडल्यामुळें पुढील सर्व आंकडे तसे पडले.

परम पुरुष देव निरंतर । जीव हा साचार अंश त्याचा ॥ ४८
माया अव्याकृत तयेचें कारण । प्रकृति अज्ञान तें चि पिंडीं ॥ ४९
ज्ञानरूप होय शुद्ध हा मुळीचा । अज्ञानें जीवाचा आळ आला ॥ ५०
अविद्येच्या लिंगें शरीरें वेष्टला । भ्रमानें भुलला आपणातें ॥ ५१
संमत श्लोकार्ध अज्ञानेनावृतं । ज्ञानं तेन मोहियंति जंतुहा* ॥ ७
अज्ञान तेथें चि तें अन्यथा ज्ञान । येणें चि दारुणें दुःख जीवा ॥ ५२
जीव जाणपण प्रकृति अज्ञान । शिवशक्ती खूण ऐसी येथें ॥ ५३
स्थूळ देहपुर माजीं जीव नर । आहे निरंतर निद्रिस्त हा ॥ ५४
स्फूर्ति पूर्ण देव सूत्रधारी सर्व । सत्तायोगें जीव धरीयेले ॥ ५५
श्लोकार्ध ॥ मयि सर्वमिदं प्रोक्तं सूत्रे माणिगणा इव ॥ ७
येके धातु माळ सूत्र आणि मणी । अंतरात्मा धणी जीवां तैसा ॥ ५६
अविद्या आरसा माया प्रतिबिंब । बिंबला आरंभ ब्रह्मांडाचा ॥ ५७
पिंडीं ईश्वर तो चौथा देह जाण । तो महांकारण जीव नामें ॥ ५८
तिजा देह जाण कारण अज्ञान । तें अन्यथा ज्ञान लिंगस्थानीं ॥ ५९
तेथें तो हिरण्यगर्भ संचरतु । ऐकावा वृतांतु लिंगदेह ॥ ६०
जीवा निर्विकल्प प्रथम स्फुरण । तें चि अंतःकरण चतुष्टये ॥ ६१
संकल्प विकल्प मन वोळखावें । बुद्धीचें स्वभावरूप सांगों ॥ ६२
योजिलें जें कार्य करूनि निर्णयें । निर्धारी निश्चयें ते चि बुद्धी ॥ ६३
निर्धाराचा अर्थ चेतव्य चिंतीत । अनुसंधान चित्तरूप ऐसें ॥ ६४
अहंभावयोगें पदार्थीं ममता । सुखदुःखदाता अहंकार ॥ ६५
स्फूर्तिरूपें तो चि कारणांगें जीव । तेथें चंचळत्व अंतःकरणीं ॥ ६६
ते चि पंचप्राण कोणें स्थानीं कोण । व्यापार लक्षण रूप त्याचा ॥ ६७
व्यान सर्व देहीं व्यापुनियां वर्ते । भोक्तव्य रसातें अंगिकारी ॥ ६८
शिरा नाडी देहीं प्रासार तयास । आप्यायन रस पाववीते ॥ ६९
जें कां नाभिस्थान तेथें चि समान । तयाचें आसन जाणावें पैं ॥ ७०
तेथुनिया सर्व संधी विभागत । तेणें हे लवत हस्तपाद ॥ ७१

* ' अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जंतवः । ' भ. गी. ५-१५

उदानाचें कंठस्थान कीं रहाणें । अन्नपान तेणें गिळीतसे ॥ ७२
स्वप्न निद्रिस्तासी तेथें ही संचार । नाना ते विकार दावीतसे ॥ ७३
गुदस्थानीं असे जाणावा अपान । त्या अधोगमन सर्वकाळ ॥ ७४
मळ आणि मूत्र त्याग निरंतर । तयाचा व्यापार ऐसा असे ॥ ७५
प्राणतंतु त्यासी अखंड वहाणें । नासामार्गें येणें जाणें घडे ॥ ७६
क्षुधा आणि तृषा कारकु शरीरीं । वेग भरोवरी सोहं ऐसा ॥ ७७
ज्ञानइंद्रियें आणि विषयेपंचक । तयातें वोळख ऐशापरी ॥ ७८
अंतःकरण शब्द वृत्ति कर्णरंध्रीं । बैसोनी स्विकारी शब्द पै गा ॥ ७९
स्पर्शातें जाणणें मनोवृत्तिगुणें । त्वचइंद्रियेंणें अर्थ बुझे ॥ ८०
रूपोन्मुख वृत्ति बुद्धीची ऐका जी । रीवे चक्षूमाजीं रूप पाहे ॥ ८१
रसाचें ग्रहण चित्तवृत्ती जाण । जिव्हेची हे खूण मुखामाजीं ॥ ८२
गंधाचें आग्रहण अहंकार वृत्ती । नासापुटी वस्ती घ्राणइंद्रिय ॥ ८३
तेणें चि प्रमाणें जाणा कर्मइंद्रियें । सांगो येथान्वयें पंचकें तें ॥ ८४
जैसा शब्द योजी अंतःकरणवृत्ती । अक्षरें बोलती वाचा तैसी ॥ ८५
मनाची वासना ते नाना कल्पना । प्राणेंद्रियें जाणा व्यापारासी ॥ ८६
बुद्धिचिया वृत्ती कार्याच्या निश्चयें । वेगीं पादइंद्रियें चेष्टवीती ॥ ८७
चित्तवृत्ती रसें कामातें वांछित । शिस्नद्वारें घेत रतीसुखा ॥ ८८
अहंकार करी मळमूत्रोत्सर्ग । पदार्थाचा योग गुदइंद्रियें ॥ ८९
अंतःकरण प्राणयोगें त्रिपंचकें । बोलिलीं कौतुकें जाणा तुम्ही ॥ ९०
ऐसे पंचवीस कळालिंग हे जीवाचें । हिरण्यगर्भ याचें आदिस्थान ॥ ९१
ईश्वराचीं जाणा देहइंद्रियें तें । ते आदिदैवतें जीवइंद्रियें ॥ ९२
पिंड ब्रह्मांड हें येकरूप आहे । समजोनी पाहे दृष्टांतासी ॥ ९३
जैसा असे येक वर्तुळ पाषाण । त्या गर्भी तो अपान त्याचि ऐसा ॥ ९४
देवें तैसें चि हें ब्रह्मांड निर्मिलें । माजी पिंड केलें तदाकारें ॥ ९५
म्हणोनियां येक जीव शिव देख । नाहीं वेगळीक विचारितां ॥ ९६
इंद्रियें पिंडाचीं अध्यात्म बोलिजे । रूप तयाचें जें आदिभूत ॥ ९७

ब्रह्मांडीं शिवाचीं इंद्रियें समस्तें । तें आदिदैवतें जीवइंद्रियें ॥ ९८
अध्यात्मादि भूत पिंड इंद्रियातें । मुळादि दैवतें ब्रह्मांडींचीं ॥ ९९
असो हें जीवाचें सूक्ष्म शरीर । ऐक्याचा विचार ऐसा असे ॥ १००
**कल्याण** इयाचा निवडूनि अर्थ । श्रोतया यथार्थ सांगे पुढें ॥ १०१

इति श्री महावाक्य पिंड सूक्ष्म देह विवरण नाम शत ॥ ५ ॥ ७ ॥

## शतक सहावें

॥ श्रीरामसमर्थ ॥

प्रथम अध्यात्म अंतःकरण जाणा । ते निर्विकल्पना आदिभूत ॥ १
या आदिदैवत विष्णु रमानाथ । यापरी संकेत जाणावा पैं ॥ २
मनाचें मंतव्यें तेथें चेंद्रभव्यें । बुद्धीचें बोधव्यें ब्रह्मा तेथें ॥ ३
चित्त रूप हें चि चैतव्ये जाण । यासी नारायण आदिस्थान ॥ ४
अहंकार अहं कर्तव्यें हें जाण । तो गौरीरमण आदिस्थान ॥ ५
कर्णीं श्रोत्रतव्य तेथें आदि दिशा । त्वचेचिया स्पर्षा वायु तेथें ॥ ६
चक्षु दृष्टैतव्ये सूर्य तेथें दिव्यें । जिव्हा रसैतव्ये करुण तेथें ॥ ७
घ्राणाचे घ्रातव्ये तो अश्विनी देव । देवताचें नांव जाणावें पैं ॥ ८
वाचेचें वक्तव्ये वन्ही सर्व सेव्ये । पाणिग्रहतव्ये इंद्र तेथें ॥ ९
पाद तें गंतव्ये शरीर चालत । तें आदिदैवत त्रिविक्रम ॥ १०
शिस्न उपस्थते आनंदैतव्ये हें । प्रजापति राहे आदि तेथें ॥ ११
गुदइंद्रिय जेथें विसर्वैतव्ये हें । नैरुति तै पाहे आदि तेथें ॥ १२
पंचप्राण तेथें विहरण चंचळें । येके रूपें खेळे सर्व वायु ॥ १३
स्वभाविक प्राणस्थानकें पाहाणें । या पिंडाप्रमाणें कल्पुनीया ॥ १४
विषयांसी ऐक्ये भूताचिये सोये । स्थूळ ज्ञानेंद्रियें पाहा तेथें ॥ १५
अज्ञान कारण विकारईतव्या । स्थान मायादेव्या आदि तेथें ॥ १६
कारण स्थूळासी गांठी येकीमेकीं । लिंगाच्या पंचकीं वोळखावें ॥ १७
लिंगेंद्रियें मूळ कारणाची खूण । नाहीं स्थूळेंविण सुषुप्ती हे ॥ १८
या देहद्वयाचें अधिष्ठान लिंग । येथें याचे भाग जाणा ऐसे ॥ १९

कारण अविद्या लिंग ते कामना । स्थूळ कर्म जाणा लिंगाधारें ॥ २०
यालागी सूक्ष्मीं पुरे या अष्टक । वेदांतीं निष्टंक बोलियेले ॥ २१
हे अविद्या काम कर्म ऐसी तीन । चौथें अंतःकरणपंचक हे ॥ २२
पंचम पुर हे ज्ञानइंद्रियें पांच । कर्मइंद्रियें पांच सहावें पै ॥ २३
सातवें पुर जे हे प्राणपंचक । विषयेपंचक आठवें पै ॥ २४
लिंगपुरी अष्टक इयाचें निर्शनें । दृश्यातीत पूर्ण ज्ञानें होये ॥ २५
असो ऐसा जीव अज्ञानें भ्रमला । असे आंवरिला लिंगदेहे ॥ २६
लिंगदेहे जीव सूक्ष्म शरीर । तयाचें बिढार स्थूळ देहे ॥ २७
पंचीकृत पंचभूताचा मेळावा । आकार अवघा ऐक बापा ॥ २८
कोण भूत कोण्या रूपें स्थूळ देहीं । आहेत सर्व हि सांगों आतां ॥ २९
अस्थि नाडी मांस त्वचा आणि केंस । पांचै कठीणांश पृथ्वीचे हे ॥३०
लाळ मूत्र आणि शुक्र रक्त मज्जा । द्रवत्व समजा आपाचें पैं ॥ ३१
क्षुधा तृषालस्य निद्रा हे मैथुन । पंचक हें उष्ण तेजाचें पैं ॥ ३२
धांवणें तें चि तें चळण वोळखा । वळण हें देखा आकुंचन ॥ ३३
प्रासारण चौथें आणि निरोधन । जाणिजे पवन पंचरूपें ॥ ३४
काम क्रोध शोक मोहो भय देख । हे पांचै हि वोळख आकाशाचे ॥३५
वायु दशविधा सांगितले पांच । आतां ऐक पांच रूपें कैसी ॥ ३६
ताळका कमळी नाग सदां वस । मुख हे विकास तेणें गुणें ॥ ३७
कूर्म नेत्रस्थानीं त्राहाटकु पाल्यासी । आळस येणेसी खूण पाहा ॥ ३८
आंगमोठा आणि मुखांत जांभई । देवदत्त पाही प्रचीतीन ॥ ३९
कर्केशा गुणें उचकी करक । धनंजई शिंक पांच ऐसे ॥ ४०
षड्रिपु जे स्थूळ देहीं आहेती । गुण लिंग स्थिति योग ऐसे ॥ ४१
काम तो प्रथम क्रोध तो दुसरा । मद तो तिसरा तीनी ऐसे ॥ ४२
मत्सर तो चौथा दंभ तो पांचवा । प्रपंच सहावा साही वैरी ॥ ४३
काल्पनिक सांगों जातां फार आहे । प्रचीतीविण हे व्यर्थ श्रम ॥ ४४
ऐसें हें जीवाचें जें स्थूळ शरीर । षडोर्मी विकार येथें पाहा ॥ ४५

प्रथम जायेते[1] दुजा तो अस्तिते । तिजा विविधते विकार पै ॥ ४६
चौथा हा विकार विपरिणमत्ते । आणि आपेक्षीते पांचवा पै ॥ ४७
सा ( हा ) वा विकार जाण विर्नासेत । साहाचीं रुपें तें ऐसीं ऐके ॥४८
ज्यायेते ते ऐसे संभवे उदरीं । नहोनिया परी होणें जालें ॥ ४९
अस्तिते ते ऐसें नसोनी असणें । वाढोनी पावणें जन्मकाळ ॥ ५०
विवर्धते हे चि बाळत्व जालिया । थोर होय काया वृद्धि पावे ॥ ५१
विपरीण मतें तारुण्यदशेते । आणि आपेक्षी ते वृद्धपण ॥ ५२
विनशेते बाण पावल्या मरण । देहीं विकारण षड्र्मींचे ॥ ५३
स्थूळ शरीर हें सांगितलें पष्ट । ब्रह्मांडीं विराट ऐक्य आहे ॥ ५४
ऐक्य पाहों जातां अष्टधा प्रकृती । अन्यथा पदार्थी घडे कैसी ॥ ५५
संकळित मुख्य विवेकें पाहावें । कल्पुनियां नांवें किती काय ॥ ५६
स्थूळदेहे याची अवस्था जागृती । विराटीं उत्पत्ति सृष्टीकर्म ॥ ५७
स्थूळीं अभिमानी विश्व वोळखावा । विराटीं जाणावा ब्रह्मदेव ॥ ५८
आकार मात्रा हे दोहीं ठाईं जाण । प्रथम चरण प्रणवाचा ॥ ५९
स्थूळीं नेत्रस्थान तेथें सत्य लोक । भोगस्थळ येक दोहीलागी ॥ ६०
रजोगुण असे दोही ठायीं येक । क्रियाशक्ती देख येकत्रासी ॥ ६१
मुक्ती सलोकता वाणी ते वैखरी । ऋग्वेद समीरीं जीव वर्ते ॥ ६२
ब्रह्मांडीं विराट देहे हे शिवाचे । स्थूळ हे जीवाचें ऐक्य जालें ॥ ६३
येणें न्यायें लिंग हिरण्यगर्भाचें । बोलिजे ऐक्याचें निरूपण ॥ ६४
लिंगदेहे याची अवस्था हे स्वप्न । स्थिति ते हिरण्यगर्भस्थानीं ॥ ६५
लिंगी अभिमानी तेजस वर्ते तो । ब्रह्मांडीं विष्णु तो सूक्षमाचा ॥ ६६
मात्रा ते उकार दोन्ही येक जाण । दुसरा चरण प्रणवाचा ॥ ६७
पिंडीं कंठस्थान तेथें तें वैकुंठ । विष्णु स्वामी श्रेष्ठ सर्वपाळी ॥ ६८
येक चि भोग तो जाणावा प्रविक्त । देहीं तो मिश्रित सुखींदुःखीं ॥ ६९
सत्वगुणीं येक लिंगीं इच्छाशक्ती । येथें ज्ञानशक्ती देवलिंगीं ॥ ७०
वाणी ते मध्यमा दुसरी जो नाद । आणि यजुर्वेद युक्ति जाणा ॥ ७१

---

१ जायते, अस्ति, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते, विनश्यति

समीपता मुक्ती सूक्ष्माची जाणा । जीव तो वासनारूप वर्ते ॥ ७२
लिंग जें हिरण्यगर्भी ऐक्य असे । तिजा देह कैसे ऐक्य सांगो ॥ ७३
कारण अविद्या अव्याकृत माया । हे महाप्रळया नाश पावे ॥ ७४
सबळ कल्पना इच्छा विस्मरण । अज्ञान कारण अव्याकृती ॥ ७५
गाढ मूढ अवस्था सुषुप्ती हे पिंडीं । प्रळय ब्रह्मांडीं ह्मण ऐसी ॥ ७६
अज्ञान इच्छेचा जितुका संगम । प्रळयांतीं ब्रह्म अनुश्रुत ॥ ७७
अभिमानी प्राज्ञ अव्याकृती रुद्र । मात्रा ते मकार तृतीय जो ॥ ७८
हृदयेस्थानक तिजिया देहास । ब्रह्मांडीं कैळास संज्ञा जाण ॥ ७९
भोग द्वि आनंद दोही तमोगुण । द्रव्याशक्ति जाण येकपणें ॥ ८०
वाणी ते पश्यंती ध्वनीचिये स्थिती । स्वरूपता मुक्ती सामवेद ॥ ८१
शिव अव्याकृत जीवाचकारणें । येक्य जालें ह्मण आन ऐक ॥ ८२
नेत्र सूर्यबिंब कंठ महर्लोक । हृदयीं ज्योतिर्लोक विराटीं हा ॥ ८३
सत्यलोक आणि वैकुंठ कैलास । बोलिलें ऐक्यास देहेत्रई ॥ ८४
याची ऐसी गोष्टी अभिमान देठी । दिवत्रई सृष्टी कार्य चाले ॥ ८५
असो ऐसी देहत्रयाची मांडणी । आविद्या कारणीं भ्रमरूप ॥ ८६
अविद्या त्रिगुण जीवासी बंधन । दुःख तें दारुण नाना योनी ॥ ८७
सुषुप्तीकारण देह अज्ञानाचें । अन्यथा ज्ञानाचें लिंग स्थूळ ॥ ८८
त्रिदेहीं त्रिगुण येकत्र वर्तती । रूपें कळों येती क्रियायोगें ॥ ८९
गुणवृत्ति चित्त चित्तांशें इंद्रियें । वर्ततातीं कार्यें नानाविध ॥ ९०
येक पुढें होतां दोनी ते माघारे । शरीर विचरे त्यानुसारें ॥ ९१
सत्वगुण येतां वर्ते पुण्येमार्गें । तेणें भोगी स्वर्गसुख जाण ॥ ९२
रजोगुण कर्म विषय अभिलाष । त्या ध्यासें जीवास रजोयोनी ॥ ९३
तमोगुण होती पाप कर्में नाना । अधोगती जाणा मूढ योनी ॥ ९४
गुणसंगें वर्ते चितोवृत्ति खेळे । प्राणी पावे फळ कर्मा ऐसें ॥ ९५
त्रिगुणबंधन जंव हे तुटेना । तंव पालटेना जीवपण ॥ ९६
लिंगीं ते वासना बीजरूप जाण । स्वरूपाचें ज्ञान होतां नाशे ॥ ९७

त्रिदेहाधिष्ठान तंव तुर्यास्थान । ते महाकारण चौथा देह ॥ ९८
त्रिगुण सृष्टीनें अर्धमात्रा नेम । चंचळत्व नाम रूप आलें ॥ ९९
चौथा देहे याचें कैसें तें लक्षण । सांगा स्वामी ऊण शिष्य म्हणे ॥ १००
श्रोतया कल्याण हे चि निरूपण । म्हणे सावधान ऐका पुढें ॥ १०१
इति श्री महावाक्यपिंडदेहत्रयविवरण नाम शत ॥ ६ ॥ पु० ॥ ७१ ॥



## शतक सातवें

\+ + + + + + +

( आरंभींचीं ३ पानें नाहींत )

\+ + + + इच्छा प्रपंचा लागुनी । ते गुणक्षोभिणी माया जाण ॥ ३७
अव्याकृत योगें देहद्वय जाले । देवें जाणीतलें मायेसी हें ॥ ३८
मायेचा जाणता तो माया कैसेनी । निरास त्रिगुणीं सहजचि ॥ ३९
ईश्वर हें नाम मायागुणें जालें । साक्षद्रष्टा बोलें मायेचेनी ॥ ४०
सबळ तत्पद यासी च म्हणावें । शुद्ध तें स्वभावें इयातीत ॥ ४१
मुळींचें स्मरण दृश्याचें स्फुरण । मायायोगें जाण चौथा देह ॥ ४२
ते मूळ प्रकृति अर्धमात्रा स्थिती । सर्वसाक्षीयुक्ती अवस्था हे ॥ ४३
जीवशिव यांचा सबळांश सांडिता । शुद्धांश तत्वतां ऐक्यरूप ॥ ४४
ईश्वर षड्गुण मायायोगें जाण । सर्व साक्षी ऊण तंवरी च ॥ ४५
सर्व नाहीं तेथें साक्षत्व कोठुनी । येकत्व निर्गुणीं जीवेश्वर ॥ ४६
अधोस्फुरणानें अष्टदेहनाम । मायाविद्याभ्रम निरसला ॥ ४७
परमात्मा आणि प्रत्यगात्मा ऐसें । येकत्व हि नसे स्वस्वरूपीं ॥ ४८
बहुत त्रिपुट्या बहुत चौपुट्या । कल्पना हिंपुट्या येथें जाल्या ॥ ४९
शुद्ध स्वरूपाचें दृश्येंवीण ज्ञान । त्याचें नांव कोण सांगे पैं गा ॥ ५०
मिथ्या मायागुणें प्रकृती पुरुष । मायात्यागें भास कैंचा तेथें ॥ ५१
अष्टधा प्रकृती जडांगें चंचळ । सांडितां निश्चळ जैसें तैसें ॥ ५२
अनंत अपार मनावाचेपर । रामरूपसार संपूर्ण जें ॥ ५३
सद्गुरुप्रसादें ज्ञान हें निर्मळ । जन्म हा सफळ स्वामीकृपें ॥ ५४

ऐसें महावाक्य गुरुशिष्याऐक्य । सद्गुरुसुवाक्यबोधें जालें ॥ ५५
अहं ब्रह्म अर्थ महावाक्य याचा । सोहं हंसा साचा वेदांत हा ॥ ५६
नामरूप गेल्यां सस्वरूपज्ञान । लक्षांशें तूं पूर्ण ब्रह्म सत्य ॥ ५७
या नांव विवेकप्रळये बोलिजे । स्वानुभवें बुझे आपआप ॥ ५८
शिष्य तो सुलीन आनंदें निर्भर । नेणे आपपर स्वामीबोधें ॥ ५९
तुटलें बंधन मायेअविद्येचें । ज्ञानाविज्ञानाचें मौन्य जालें ॥ ६०
समर्था सद्गुरु नाहीं उत्तीर्णता । पूर्णत्वें पदार्था ठाव नाहीं ॥ ६१
रामभक्ति पूर्ण तेणें सत्यज्ञान । केलें निरूपण संकळीत ॥ ६२
परोपकारार्थ बोलिलें स्वभावें । याच्या शोधें व्हावें ब्रह्म पूर्ण ॥ ६३
रामदासकृपें बोलिलें कल्याणें । श्रोतीं न्यून पूर्ण क्षमा कीजे ॥ ६४

इति श्री महावाक्यपंचविवेकप्रळय विमळब्रह्म निरूपण नाम संपूर्ण ॥ वोव्य संख्या ॥ ७७१ ॥ छ



# सोलीव सुख

( बाडांक २३५ वरून )

॥ श्रीरामसमर्थ ॥

जय जय जी सद्गुरुवर्या । पूर्ण ब्रह्म प्रतापसूर्या ।
तुज नमो जी आचार्या । करुणासिंधु ॥ १
जे भवसमुद्रीं पोळले । विषयमदें अंध जाले ।
चौऱ्यासींत वाहूं लागले । मार्ग सुचेना तयासी ॥ २
ऐसें[1] विश्व बहुत बुडालें । मी जीव म्हणोनी धाऊं लागलें ।
मुळींचें स्मरण विसरलें । मी कोण ऐसें ॥ ३
तयासी मुक्त करावया पूर्ण । तूं बा उतरलासी ज्ञानघन ।
रोगिया औषधी देऊन । भवमोचन करसील ॥ ४
ऐसें औदार्य तुझें सघन । म्हणोनी आलों मी शरण ।
दयार्णवा कृपा करून । मज दातारें तारावें ॥ ५
आपण आपणातें पावें । ऐसें माझे मनीं बोलावें ।
तें दातारें गोचर करावें । रोकडें ब्रह्म ॥ ६
ऐसा शिष्याचा प्रश्न ऐकोनी । ज्ञानाचें भरतें आलें स्वामीलागोनी ।
आसन सोडूनिया तये क्षणीं । कडकडोनी भेटले ॥ ७
रे[2] बाळका ऐक निर्धार । तुझा प्रश्न तो वाग्दोर ।
माझे कंठीं बैसला साचार । बरें घेई निज वस्तु ॥ ८
मग स्नेहाळें नवल केलें । वोसंगा[3] सत्‌शिष्या घेतलें ।
अर्ध मात्रा रस काढिले । पूर्ण फुंकिले कर्णरंध्रीं ॥ ९
खडतर औषधी दिव्य रसायन । नयनीं झोंबलें जाऊन ।
डोळियाचा डोळा फोडून । चित्सूर्य[4] भेदिले ॥ १०

---

( १ ) जैसें-५३९; ( २ ) अरे-५३९; ( ३ ) ओसंगास-५३९;
( ४ ) चित्तसूर्य-५३९

पूर्ण अंश गगनीं भेदिला । अर्क तो पिंडीमाजीं उतरला ।
त्रिकुट श्रियाट चुराडा केला । सेखीं भरला गगनगर्भीं ॥ ११
उग्र तेज लखलखाट । तेणें जाला चौदेहाचा आट ।
भ्रांती पडली बळकट । तेव्हां बाळ निचेष्टित पडे ॥ १२
ऐसें पाहोनि सद्गुरुनाथ । पद्महस्त मस्तकीं ठेवीत ।
वत्सा सावध त्वरित । निज रूप पहा आपुलें ॥ १३
जागृत करूनि ते वेळीं । अजपाची दोरी देउनी जवळी ।
विहंगम डोल्हारी तये वेळीं । आलक्षें लक्षीं बैसाविलें ॥ १४
धैर्याचें आसन बळकट । आणी इंद्रियें वोढुनी सघट ।
धरी ऊर्ध्व पंथें वाट नीट । अढळ पदीं लक्ष लावी ॥ १५
पुढें करूनीया जाणीव । मागें सारोनि नेणीव ।
जे जे जाणीव अभिनव । ते तूं नव्हेसी तत्वता ॥ १६
तै मार्गाची करूं नव्हाळी । प्रथम घंटानादाची नवाळी ।
दुसरी किंकिणीची मोवाळी । तिसरी अनुहत कोल्हाळ ॥ १७
आतां अग्रीं लक्ष लावी । काय दिसेल तें न्याहाळीं ।
चंद्रज्योती प्रकाशली । विभु बांधिला बळकट ॥ १८
तें सुख अंतरीं घेउनी । पुढें चाल्ल करी संगमीं ।
तेथें विजुऐशा कामिनी । चमकताती[3] सुवर्णरंग ॥ १९
ते ही जाणोनि मागे सारी । पुढें सूर्यबिंब अवधारी ।
ज्वाळा निघती परोपरी । दंडळूं नको कल्पांतीं ॥ २०
वायोमुख करोनी तेथें । गिळी वेगीं सूर्यकिरणातें ।
मग देखसी आनंदमार्तंडातें । तेजोमय यमपुत्रा[4] ॥ २१
अनंत भानु तेज अद्भुत । खदिरांगार ज्वाळा उसळत ।
धारिष्ट तेथें न निभत । दुर्घट विभू तेथींचा ॥ २२

---

(१) मुळांत हा शब्द लिहून खोडला आहे; बाडांक ५३९ त हि तो नाहीं.
(२) ग्रंथाची–५३९ (३) चकाकती–५३९; (४) मम पुत्रा–५३९

तेथें हुषारीचें काम । अग्रीं लक्ष घालून नेम ।
तीर लाऊन सुगम । मागें सारी सूर्यातें ॥ २३
पुढें दिसेल जें नवल । तें पाही हंसमेळ ।
चंद्रकिरण सीतळ । पहासी[1] मम वत्सा ॥ २४
तेव्हां मागील दाह शमेल । सीतळाई सर्वांग होईल ।
चंद्राची प्रभा सुढाळ । फडफडीत चांदणें ॥ २५
तो चि डोळियाचा डोळा पाही । देहातीत वर्म विदेही ।
चिन्मयसुखाची नवाई । भोगीं आपुले कीं गा ॥ २६
अनुभवाची सीग भरली । अग्रापरी उसळली ।
भूमंडळी प्रभा पडली । कर्पूरवर्ण नभ जालें ॥ २७
तया मध्यभागीं सघन । अढळ पद दैदिप्यमान ।
उर्वरीत ब्रह्म जाण । ध्रुव बैसला अढळते ॥ २८
तें तुझें स्वरूप नेटें बोटें । जेथें समस्त जाणणें आटे ।
ऐके[2] जालासी धिटें[3] । बळकटपणें बलाढ्य ॥ २९
ऐसें सुख योगिया लाधलें । तेव्हां देहाचें मरण गेलें ।
सांगणें ऐकणें मुरालें । येकत्वपणें येक ची ॥ ३०
शांती येवोनि माळ घाली । अलक्ष सेजे निजली ।
हंसपदीं ऐक्य जाली । सुख सुखाते निमग्न ॥ ३१
तेथील अनुभव घेउनी । स्वानुभव पाहे कलटुनी ।
आला मार्ग ते क्षणीं । दिसेनासा जाला कीं ॥ ३२
त्रिकुट श्रियाट गोलाट । बुडाले ते औटपीट ।
ईडा पिंगला सुषुम्नातट । विराले ते स्वात्मसुखें ॥ ३३
स्थूळ सूक्ष्म कारण । नेणो काय जालें महाकारण ।
इंद्रियें चुबकलीं[4] जाण । धांव मोडली तयाची ॥ ३४
पंचभूताचे खवळेले[5] । तयाचे ठाव चि पुसिले ।

(१) पावती–५३९; (२) ऐसें–५३९; (३) नेटें–५३९; (४) चुबुकुळलीं–५३९; (५) खटलें–५३९

अपरमित आनंदिले । निमग्न जाले सुखांत ॥ ३५
सखोल भूमिके ऐसे जालें । सुख सुखासी घोटलें ।
स्वयें आत्मत्व प्रगटलें । माझे देहीं रोकडें ॥ ३६
मग सहज समाधी जिरउन । शिष्य उठिला घाबिरा होउन ।
हें सद्गुरुचें देणें । काय उत्तीर्ण मी व्हावें ॥ ३७
जरी स्तुती त्याची करावी । तरी माझी मति नाहीं बरवी ।
अनिर्वाच्य गती बोलावी । परा वाचा खुंटत ॥ ३८
आतां मी जी लडिवाळपणें । तुमचे कृपेनें करितों स्तवन ।
सूर्यापुढे खद्योत जाण । तैशापरी बोल हे ॥ ३९
जय जया जी करुणासिंधु । जय जया जी भवरोगवैद्यु ।
जय जया जी बाळबोधु । कृपाघना समर्था ॥ ४०
जय जया जी अविनाशा । जय जया जी परेशा ।
जय जया जी अध्यक्षा । दयार्णवा ॥ ४१
जय जया जी पूर्णचंद्रा । जय जया जी अलक्षविहारा ।
जय जया जी भवसमुद्रभास्करा । आनंदप्रभू ॥ ४२
तुझी स्तुती करिता सांग । वेद स्तुति जाले अव्यंग ।
तेथें प्राकृत मी काग । वर्णावया योग्य नव्हे ॥ ४३
कल्याण म्हणे जी रामदासा । माझा मुकेपणाचा ठसा ।
ते मोडुनी वसोसा[1] । मज आपणाऐसें केलें ॥ ४४
ऐकोनी मृदु वचन । कुरवाळिले तयालागोन ।
गुरुशिष्य हें बोलणें । उरलें नाहीं ते वेळीं ॥ ४५
येकपणें येक चि जालें । ऐक्यरूपीं सम मिळालें[2] ।
करुनिया सुख उसळलें । नाहींपण जाउनी ॥ ४६
सुगरणीचा पाक जाला । नभा भाजनीं वाढिला ।
अक्षय पदीं सुगरावला । संत जेविती स्वानंदें ॥ ४७

---

(१) वसोवसा–५३९; (२) ऐक्यरूपासी मिळाले–५३९

अनिर्वाच्य बोल बोलिले । साधकाचे उपेगा आले ।
सिद्धांतरीं डोलों लागले । बद्ध मुमुक्ष होताती ॥ ४८

या परतें आन नाहीं बोलणें । श्रीराम दाशरथीची आण ।
येकपत्नी तो सुजाण । आपलें पद दे दासा ॥ ४९

इति श्री दासबोध ग्रंथ । त्यांतील हा सोलीव अर्थ ।
श्रोते ऐकतां यथार्थ । समाधिस्त होती ॥ ५०

* ॥ समास ॥ १ ॥ श्रीराम ॥ ५ ॥ ५ ॥ ५ ॥ *



* या ऐवजीं बाडांक ५३९ त " ॥ शुभं भवतु ॥ " असें आहे.

( ३ )

# श्री शुक आख्यान

( बाडांक ५२ वरून )

महा घोर आरण्य तारुण्यकाळीं । शुकें[1] साहिलें पाहिलें पर्वकाळीं[2] ।
जना गम्य तें रम्य नाना प्रकारीं । वनीं तो मुनी राहिला निर्विकारी ॥ १
करी स्नानसंध्या विधीयुक्त नेमीं । सदा सर्वदा आवडी नित्य नेमीं ।
क्षुधा रक्षणें भक्षणें मूळकंदें । मुनीराज तो जाणिजेतो मुकुंदें ॥ २
पहा वेद[3] तो वर्णितो ज्या शुकासी । इती ते किती तूकती ना तुकासी ।
पुरश्चर्ण आच्यर्ण सामर्थ्य सिंधू । ऋषीमाजि तो अग्रपूजे विबूधू ॥ ३
शचीचा पती वीपतीलागि धाके । वदे इंद्र रंभेसि ते[4] राख राखे ।
दिसे स्पष्ट आरिष्ट माझ्या सुखासी । त्वरें सत्वरा बांध पाशीं शुकासी[5] ॥४
क्षीराब्धीसुता बोलिली राजयासी । क्षणामाजि जिंकोनि येतें तयासी ।
रतीचा पती संपती यौवनेंसी । ब्रिदें घातलीं पातलीं त्या वनासी ॥ ५
ठकू ठमके[6] ठाण मांडी ठकारी । महा रम्य लावण्य नाना विकारी ।
बरा सम्र वीचार केला मनासी । म्हणे शूक हे आमुचा धर्म नाशी ॥ ६
वसंती भल्या फूलल्या पुष्पजाती[7] । वनीं सूमनीं भृंग भोगार्थ जाती ।
तथा तारुणी यौवनीं संग भोगी । जगीं धन्य रे धन्य तो[8] राजयोगी ॥ ७
भुतें पिंड ब्रह्मांड वाक्यार्थ पाहे । तदाकार आकार मूळीं न साहे ।
गुरूभक्त नीवेदनीं संग त्यागी । जगीं धन्य रे[9] तो मुख्य[10] योगी ॥ ८
कुची वर्तुळा रत्न[11]माळा उमाळा । फुलें हार हे[12] मे ल चमेलमाळा ।
सुरतें[13] भोग संभोग नेणोनि ज्याला । वृथा पुष्ट तो जन्मला जीतें[14] मेला ॥९

---

( १ ) सुखें – ११४, ११७४; ( २ ) सर्व काळीं – ११७४ ( ३ ) देव – ५८; ( ४ ) तूं – ५८, ११७४, १७७३; ( ५ ) मुळांत " सुखासी " आहे, पण बाडांक ५८, २५०, ११७४ व १७७३ वरून " शुकासी " घेतलें आहे; ( ६ ) ठाणके–५८; ( ७ ) पुष्पयाती–५८; ( ८ ) ते–११७४; ( ९ ) गे–१७७३; ( १० ) राज–१७७३; ( ११ ) रम्य माळा–५८; ( १२ ) ?; ( १३ ) सुखें–५८; ( १४ ) आणि–११४.

अशौची क्रिमी जंतु शंका दुर्गंधी । म्हणोनी जनीं लिंपिताती सुगंधी ।
महा नर्क तो मूर्ख भोगी भगाला । वृथा पुष्ट तो जन्मला जीत मेला ॥१०
महा सुंदरी ऊदरीं शस्त्र घाली । विदारी दरी मूळ विष्ठा निघाली ।
जवादी चुवा गंध सूगंधनाभा । गमे ते रमेतुल्य चातुर्यरंभा ॥ ११
कुशी द्वादसी वर्षवासी कुवासी । म्हणे शूक मी कष्टलों गर्भवासीं ।
तुझ्या ऊदरीं जन्मतो पुण्यरासी । तरी पावतो सूखसंतोषराशी ॥ १२
दधीजा म्हणे कोण आश्चर्य मोठें । चमत्कारिली चाविलीं युग्मबोटें ।
पुढें पाहतां चंद्रजोती विझाली । तयाचे परी दृश्य अदृश्य जाली ॥ १३
चळे मेरुमांदार जीच्या प्रतापें । चळे चंद्र तारा ज्वरें सूर्य कांपे ।
चळे सागरू आगरू लोणखाणी । चळेना शुकेंद्रू महा योग ठाणीं ॥१४
रिपू षष्ट जिंकी असा कोण साधू । जनीं शब्द वाचाळ बोधें प्रबोधू ।
वृथा भांडती निंदिती येकमेकां । भरा दुर्भरा कारणें शिष्यशाखा ॥ १५
सहस्रामधें वीरुळा येक संतू । गिता तत्त्वता वाक्य बोले सतंतू ।
पहा गुप्त चिंतामणी हेमखाणी । आम्हवेल कल्पतरूची सिराणी ॥ १६
नसे कामधेनू खडाणे उदंडें । महीमंडळीं माजलीं थोर बंडें ।
असो बोलतां बोलतां शीण होतो । प्रभू रामचंद्राविणें काळ जातो ॥१७
गुरूची दया ऊदया सीघ्र पावे । तरी अंतरीं विश्रमानंद फावे ।
नसे वैर निर्वैरता आत्मदृष्टी । जगीं धन्य तो धन्य कल्याण सृष्टी ॥१८

इति श्री शुकआख्याननिरुपणं समाप्तमस्तु ॥ ५ ॥ ॥

---

( १ ) तापें – ११७४ ( २ ) बोधें – ५८.

( ४ )

# ध्रुवाख्यान

( बाडांक १२२ वरून )

ध्रुवाची कथा सत्पथा मोक्ष दावी । शुकें ज्या मुखें सेविली ते वदावी ।
रवी भूप जो दीप उत्तान साचा । तपोधीर्य जो सूर्य सत्कीर्ति साचा ॥१
सुरति सुनति दोघी राजभार्या प्रसिद्धा । सवतिपण इसाळे चालती पूर्ण स्पर्धा ।
सुत उभय तयांचे थोर लावण्यखाणी । बिषमसम नरेंद्रू बैसवी जानु दोनी ॥२
कसे बाळ तेजाळ लावण्यखाणी । मुखें बोलवी राव तो रम्यवाणी ।
म्हणे जननी श्रेष्ठ कां त्यास मानी । मनीं खेद अत्यंत मानीत ह्राणी ॥३
क्रिडत जाय कुमार स्वमंदिरीं । जननी लोणमुखेंदु सुखादरी ।
स्वनयनीं धरू पाहतसे जसें । दुडदुडा धरिलें करि राजसें ॥ ४
कठिण शब्द अयुक्त चि मांडिलें । पदतले उदरावरि ताडिले ।
न रडतो शिशुराज शिरोमणी । नमनरूप पुसे मग जननी ॥ ५
मातें काये निमित्य ताडणपदा श्लोकाक्षराच्या पदा ।
कैचें रे हतभाग्य तूं पद तुला या अंगिकारी पदा ।
यातें प्राप्तमतें किमर्थ न घडे ऐसे पुसे जननी ।
पूर्वीं क्लेश विशेष भोगित पदें देवाचिये अर्चनीं ॥ ६
जावें घोर अरण्य दुर्घट दरी कीं पर्वती कंमेरी ।
निर्वाणीं त्यजि प्राण हा मग पदा देईल तो श्रीहरी ।
सत्रासें जननी छळी मग निघे माता नमस्कारुनी ।
सन्मार्गे चि प्रबोधिलें जननिये तूं धन्य हो या जनीं ॥ ७
पुसेना स्वमाये निघे काननासी । दिसेना पुढें मार्ग नेत्रांबुजासी ।
पथीं थोर आरण्य पुल्लाक सीळा । पडे तो रडे चिंतितो मेघनीळा ॥ ८
रडत राजशिशू अनवाणी । स्मरतसे स्मर पूर्वजवाणी ।
वनचरें गज व्याघ्र किकाटती । निबिड रात्र सिंह्यादिक गर्जती ॥ ९

---

(१) तपोवीर्य-१४९ (२) ध्रुव-१४९

गगनिं देवऋषी हरि गातसे । नभगती सुख तन्मय जातसे ।
स्मरण बाळ स्वकीर्तनिं ऐकतां । परम तोष शिशूवर वंदिता ॥ १०
स्वकीय तो पुसतां चि वदे तया । भजन आत्मसुखें न वदे तया ।
हरि तुला तरि भेटवितो मुला । म्हणत जात असे प्रभूच्या स्थळा ॥११

सहस्राक्षें तेव्हां जननिकप घे[1]ऊनि जवळी ।
वळी नाना बुद्धी परि हृदयिं त्याते न कळवी ।
म्हणे ये वेल्हाळा तुजविण बहू शीण मजला ।
अरे पान्हा कां पां कठिणपण हें आजि तुजला ॥ १२

हरी नाना विघ्ना अचळ स्मरणीं दास रमती ।
मती नाना ऐसा सुरपति करी थोर कुमती ।
कथी वार्ता साधू दिनजनकृपाळा झडकरी ।
करा साह्ये आतां स्मरण करितें बाळ निकुरी ॥ १३

निरोपीत ब्रह्मात्मज धांवताहे । अकस्मात येऊनि संमोखिताहे ।
पदारूढ निर्द्वंद कल्याण वाचा । वसे तो चिरंजीव जो सूर्य साचा ॥ १४



(१) येऊनि-१४५

## ॥ रुक्मिणी स्वयंवर हिंदुस्तान ॥

( बाडांक ५४९ वरून )

वैदर्भ येक मुलुख । वहा कौंडण्येपुर देख ।
दरी भीम भूप नेक । सखिजोरजबरसारा ॥ १
दरम्यानें महताब । जीनो सुरजकी आब ।
हुई पैदा खुष बाब । उसकू रुक्मण प्यारा ॥ २
येक रोज पदरजात । करें बजरोसो बात ।
दुल्हन दिदे खुष बात । सुमीज्यानमानतोरा ॥ ३
तद कल्याण नाम दास । मिळा किसनके पास ।
कृष्ण बैन सरस गात । दिल्हा रुक्मन दारा ॥ ४
कहे रुक्मा भूपाळ । गौरखागौसपाळ ।
हम समधी सशुपाळ । सुधापानबाटतें ॥ ५

### श्लोक

पाचारूनि सभेसि रुक्म शिकवी ज्योतिर्विदां ब्राह्मणां ।
कृष्णासि घटितार्थ लाभत नसे चैदेश्वरा या म्हणा ।
नाहीं चामर छेत्रपत्र अकुळी सिंव्हासना वेगळा ।
गोत्र क्षेत्र न नाव रूप नवरा कोण्या मतें आगळा ॥ १
कैचें भांडार गाठीं पशु वळी किरटी कांबळी वेणु काठी ।
कासेसी माल गाठी चवरधर मुठी थापटी धेनुपाठीं ।
ऐशातें कंबुकंठी वरिल निज दिठी तै पुरी कोण कंठी ॥ २
व्रजा पातली पूतना लंबकेशी । त्रणावर्त वछा सुरारक्तकेसी ।
असे मर्दिले धेनुकाशकंठासी । स्वसा केवि देऊं तया लंपटासी ॥ ३

हुई रुक्मिण बेजार । तपें तपती गुळनार ।
तुटे मोतेनके हार । छपरपलंग लेहटती ॥ ६
सखीसाथ कहे बात । विप्र लावो हारभात ।
हरि नायनके नाथ । सातसात आवती ॥ ७

लिखा देती जोहत । आग लगी महबान ।
कहे मुसो येक बात । न हि और ज्यानती ॥ ८
अश्वफिलं दिये सात । ज्याह पोचे गुजरात ।
ज्यहा दर्याकी मात । सहज पार उतरते ॥ ९
हरि बैठे खुश रंग । राग रंग लगे चंग ।
खुले मजलसके रंग । गुणीतांनगावतें ॥ १०
बसुदेव मिले ज्याय । उसें पुछे जदुराय ।
कौंडण्ये मिले आय । भूपभार उतरते ॥ ११
पाती दिये जो हात । हरि पढे खुष बात ।
जी जाने कदम सात । नही और ज्यानती ॥ १२
खुशरंग जदुसग । चेले दुल्लदुल्लके संग ।
दवा दौ दे खुले चंग । चटक चाल चटकतें ॥ १३
बनेजीनजेंजरीन । लगें पाखरा रंगीन ।
बाकलादत्ताजजीन । झलाझल झलकते ॥ १४
आसिवार उपर सार । खुलेपंजमहातियार ।
लगे मोतनके हार । चलें भार थरकते ॥ १५
केते झलके गजदंत । नहीनेजोकेआंत ।
जगढाल चमकत । भीड आश्वफीलकी ॥ १६
सुतरनालोकेथाट । बाणोतोफनके लाट ।
नही चलनेकू बाट । यकदाट बकमकी ॥ १७
गुजरजमदाउतो । पटाकोंदुके मार ।
अर्जबेग छडीदार । बडी कडक हारोलकी ॥ १८
बाजे भेरी करनाल । तुडम ढोल घंगाल ।
बीच बाजती काहाल । चले फौज किसनकी ॥ १९
द्रिकाके पंथ द्रिग लागें रुक्मनके ।
खुशालीकिये गुढिया सुदेवनके ।

नगारेके घोश बाजे रणसिनके ।
सुभक भीमकतनया भुल गई आगीया सुनके ॥ २०
भीमक पूर्ण लोकनसे जाय मिले शामके ।
दिया निवास अंबिकाके पीठ देवी सदनकें ।
भोरभई रुक्मन चली अंबिकापूजनके ।
दीर्घ सेनानाथ पोहर्चे देवीसदनकें ॥ २१
रथनकी थाटदाट । आसिवारकी लाट ।
पोहचें देवीके बाट । बनी दाट उनोकी ॥ २२
मिला रुक्मनगोपाळ । तब ही दौडा सुसपाळ ।
दस्ततेग बांकढाल । सुतरनाल कडकती ॥ २३
तडक तोफोनकी मार । भडकें घोडे आसिवार ।
केती सुर्जोकी मार । जानो बीजली चमकती ॥ २४
तिरंदाजी शाहाबाज । जाहाळ २ तहे आगाजें ।
चीराकलगी झिरताज । खणाखण झलकती ॥ २५
ष्यांहा मर्दोका बार । दुघ २ घोडा आसीवार ।
शुशुपाळ दिया मार । चकरपान मुलकते ॥ २६
रुक्मराज बडे गाज । किया संजुत सब साज ।
चलें छुटनके काज । बडी फौज कुवरकी ॥ २७
वेगे पोहच्या आसिवार । ष्याहा किसनजीका मार ।
झमकन लगे हातियार । होई गाज हरोलकी ॥ २८
पक २ रुक्मा छडीदार । छीन लिया हतियार ।
किया फजीयत बेजार । हुई जाम दुल्हनकी ॥ २९
भीमकराज किया मान । बडे तबुदियातान ।
धमक लगे नीशान । चकरपान गज़रलकी ॥ ३०
डाले कृष्णजीको माळ । भीमकुमरी खुशाल ।
मग लगावते भूपाळ । ताळमाळ झमकते ॥ ३१

ऐसें गुदरे दीन च्यार । किया कुच चले भार ।
गये सोरटके पार । ढोल तुडम बाजतें ॥ ३२
डेहेरे पोहचे जदुराजें । हरिभक्तंन काज ।
कृष्णराजनके काज । नवरसान गजरकी ॥ ३३
जस पढत कल्याण । कीर्तनोमे भाठ जाण ।
गुणी गावत हे तान । पानफूल बाटतें ॥ ३४
इति श्री रुक्मीसैवर हिंदुस्तान संपूर्ण मस्तु ॥



( ६ )

# ओव्या संतमाळा *

( बाडांक १२८ वरून )

आत्मयारामाचा मुगुट सुभट । कारुण्यतेजें मुद्गल भट ।
निवृत्ति सुरेख टिळा नीट । मुक्ताक्षता मुक्ताई ॥ १

आकर्णपूर्ण उभय नयन । भानु कूर्म अवलोकन ।
नासीक सरळ सुंदर जाण । आचार्यस्वामी विराजे ॥ २

मुखारविंदीं [1] आनंद । तो चि शोभे रामानंद ।
नाभया[2] ज्ञानी[3] कर्ण प्रसिद्ध । वाचा नरसिंहसरस्वती ॥ ३

कुंडलें तळपती मकराकार । मुकुंदराज मुक्तेश्वर ।
कंठीं[4] शोभती सुमनहार । कबीर जसवंत तुळशीचे ॥ ४

उभय कुचाचें स्थान परम । नारायण आणि अच्युताश्रम ।
मन वामन विश्राम । आत्मा रामदासस्वामी ॥ ५

आजानुबाहो लंबायमान । साळया येकाजनार्दन ।
वीरकंकण विराजमान । कृष्णदास केशवाचे ॥ ६

धनाजाठ तो धनुष्यभावा[5] । अमोघ तुणीर [6] तुकावा ।
कृष्णयाज्ञवल्की जाणावा । यज्ञोपवीत हृदईचें ॥ ७

नाभी मिराई[7] सधर । कटिसूत्र तो सोनार ।
पीतांबर दासोदिगांबर । शांतिवसन तो जयराम ॥ ८

---

* " श्रीरामसंतरूपीध्यान " असें नांव या प्रकरणाला बाडांक २९० त दिलेलें आहे. हें प्रकरण श्रीसांप्रदायिक विविध विषयांक ५१ यांत सभेनें छापलें आहे.

( १ ) जो – २९०; ( २ ) नामा–२९०; ( ३ ) ज्ञानेश्वर – २९०; ( ४ ) गळा–२९०; ( ५ ) व्हावा–२९०; ( ६ ) तो–२९०; ( ७ ) मिराबाई–२९०

ऐसी साधुरूपें आनंदमूर्ती । शोभला दिसे[1] अद्वयभक्ती ।
विमळ रंग तेनु[2] प्राप्ती । रंगमूर्ती विराजे ॥ ९

चरणीं श्रीदांचा[3] घोष । सुरदास आणि रोहिदास ।
उभय पाउलें विशेष । कल्याण आणि दत्तात्रय ॥ १०



(१) राघव-२१०; (२) तनूची-२१०; (३) तोडर-२१०

## ( ७ )

# श्री रामदास *

( बाडांक ३५८ वरून )

अविद्याभ्रमें भ्रांत होऊनि ठेलों । घनानंदसूखास मूकोनि गेलों ।
तया अशोच्या जीवासि केला प्रबोधु । नमस्कार माझा तया दासबोधा ॥ १
स्मृती न्याय मीमांसकें तर्कशास्त्रें । श्रुती वेद वेदांत वाक्यें विचित्रें ।
मुमुक्षा जना दाविला मार्ग साधा । नमस्कार माझा तया दासबोधा ॥ २
स्तुती भक्त ज्ञानी विवेकी विरागी । गुरुशिष्य ते लक्षणें आत्मयोगी ।
गुणत्रैविभागीं बरें चित्त वेधा । नमस्कार माझा तया दासबोधा ॥ ३
महावाक्य तत्वादिकें पंचिकर्णे । खुणा लाधती नित्य नेमें विवर्णे ।
बरें शोधिला पाहतां आत्मशोधा । नमस्कार माझा तया दासबोधा ॥ ४
मना उन्मना साधना हे चि आहे । विवेकें विचारें विवंचूनि पाहे ।
गुणातीत होसी हरे भूतबाधा । नमस्कार माझा तया दासबोधा ॥ ५
जनीं सज्जनीं प्रीति हे ची धरावी । घडीनें घडी सार्थकाची करावी ।
तया वाचितां नूरवे कामक्रोधा । नमस्कार माझा तया दासबोधा ॥ ६
गुरूअंजनें लेउनी ज्ञान नेत्रीं । सदा पाठ वीसं वदे जो वगत्रीं ।
तयालागि तारी असंख्या प्रसिद्धा । नमस्कार माझा तया दासबोधा ॥ ७
प्रभू राम दासासि कल्याणकर्ता । नुरे सर्वथा पाहतां भेदवार्ता ।
अनंता अखंडा निज ज्ञानसिद्धा । नमस्कार माझा तया दासबोधा ॥ ८

॥ श्रीरामदासार्पणमस्तु ॥



* बाडांत च या प्रकरणाला हें नांव दिलें आहे.

( १ ) हा चरण असा वाचूं या कां ?– " तया दीन जीवासि केले प्रबोधा । "

( २ ) मुळांत " अनंदा " आहे.

# श्री कल्याणकृत चौचरणीं वोव्या*

## ( १ )

## रामनामकथा

( बाडांक ५२ वरून )

रा[1]मनामकथा गोदावरी पा[2]हो । भुवनत्रईं डोहो भर[3]लासे ॥ १
भर[3]लासे तेथें[4] बुडी देई मना । आनंदभूवना पावशील ॥ २
पावशील जन्मभूमिका आपुली । तेथें[5] उग[6]वली गोदावरी ॥ ३
गोदावरी पद पा[7]ळवी निघाली । कल्याणें सेविलीं संतसंगें ॥ ४

## ( २ )

## पांगुळ मी देवा

( बाडांक ५२ वरून )

पांगुळ मी देवा मज कोण्ही नाहीं । कृपादृष्टि पाही रामराया ॥ १
रामराया तूं चि नाथ अनाथाचा । मायेबाप साचा तूं चि माझा ॥ २
तूं चि माझा स्वामी गणगोत सर्व । तुजविणें ठाव नाहीं आम्हां ॥ ३
आम्हां नाहीं कोण्ही प्रपंचीं पाहातां । येई दिनानाथा माहियेरा ॥ ४
माहियेर माझें सितापती देव । तेथें अंतर्भाव निरंतर ॥ ५
निरंतर देव सर्वांचे अंतरीं । सर्व चराचरीं नांदतसे ॥ ६
नांदतसे सर्व भूमंडळभरी । भरि [9]ये उभरी तुं[10]झी देवा ॥ ७
तुझी देवा सत्ता सर्व भूमंडळीं । आकाशीं पाताळीं तूं चि देवा ॥ ८
तूं चि देवा गुरु तूं चि देवा शिष्य । ज्ञानाचा प्रकाश तूं चि देवा ॥ ९
तूं चि देवा वल्ली तूं चि देवा रस । स्वाद हा विशेष नाना फळीं ॥ १०
नाना फळीं मूळीं जळीं स्थळीं पाहा । पाहोनिया राहा रामरूपी ॥ ११

---

* बाडांत च " ॥ पदें चौचरणी ॥ वोव्या ॥ " असें नांव आहे.
( १ ) श्रीराम–५८; ( २ ) पाहा हो–२३९; ( ३ ) भरला आसे–५८; ( ४ ) जेथें–२३९; ( ५ ) जेथें– १६३; ( ६ ) उद्भवली–५८, १७७३; ( ७ ) पल्लवी–५८, १०३, १६३, २३९, २४२, १७७३; ( ८ ) मायबापा–५८; माहेरीया–१६३; ( ९ ) हे–५८, १७७३; ( १० ) तूंचि–५८, १७७३.

रामरूप मजमाजि हें भरलें । भरोनी उरलें सदोदीत ॥ १२
सदोदीत राम खंडेना अखंड । थोतांड हें बंड मावळलें ॥ १३
मावळलें दृश्य न दिसे अदृश्य । नाहीं भासाभास पूर्ण ब्रह्म ॥ १४
पूर्ण ब्रह्म घनदाट हें संचलें । गुरुचेनि बोले महावाक्यें ॥ १५
महावाक्यअर्थ आपण चि ब्रह्म । तेथें मायाभ्रम मावळले ॥ १६
मावळले अहं सोहं गुणातीत । शुद्ध सदोदीत आपण ची ॥ १७
आपण चि जाला कल्याण स्वरूप । तेथें पुण्यपाप आडळेना ॥ १८
आडळेना ऐसें केलें गुरुरायें । धन्य त्याचे पाये फळा आले ॥ १९
फळा आले ऐसें पांगुळ बोलिलें । समाधान जालें अनूभवें ॥ २०
अनुभव कैसा पांगुळाचा पाहा । पाहोनिया राहा निजरूपीं ॥ २१

( ३ )

## रामपाईं दास कल्याण बहाले

( बाडांक ५२ वरून )

गणिका अजामेळ पातकाचा मेळ । विमानीं तत्काळ वाईला[1] ॥ १
वाईले[2] पुत्र माहारी अंतुरी । तया विष्णूपुरी दाखवीली ॥ २
कुंटणी पिंगळा पापी अमंगळा । शुकमीसें हेळा उद्धरली ॥ ३
गजेंद्र सावजें धरियेला जळीं । तयासी तत्काळीं उद्धरीले[3] ॥ ४
भृशंडी काउळा उद्धरिला हेळा । बाळपणीं लिळा दाखवीली ॥ ५
भिलटीचीं फळें उच्छिष्ट खादलीं । ते हि उद्धरिली हेळामात्रें ॥ ६
विराध कबंध तारिले[5] प्रसिद्ध । जडमूढबंधे[6] उद्धरीले ॥ ७
तृण वृक्ष प्रावी तया क्षेम द्यावी । सीघ्र चि पाववी वैकुंठासी ॥ ८
पाये लाउनीया शिळा दिव्य बाळा । गोहुंका[7] प्रेमळा उद्धरीले ॥ ९
चित्रकुटीं काक जानकीसन्मुख । शरण येतां रंक उद्धरीला ॥ १०

---

( १ ) अर्थी–५८; ( २ ) वाहियला–५८, १७७३; ( ३ ) वाहियेले–१७७३; ( ४ ) सोडवीले–५८, १७७३; ( ५ ) तारियेले–१७७३; ( ६ ) बद्ध–५८, १७७३; ( ७ ) गुहका–१७७३

खग मृग पशू उद्धरी सर्वेशू । कांहीं गुणदोषू न पहातां ॥ ११
पंपासरोवरीं मारुती भेटला । सुग्रीव तारीला वैभवेंसी ॥ १२
वाळि निज बाणीं चुके जन्मयोनी । तया निज स्थानीं मोक्षपद ॥ १३
क्रोधा येउनीया समुद्र तारीला । अन्याय क्षमीला सीघ्र काळें ॥ १४
वैरियाचा बंधू शरणांगत आला । चिरंजीव केला क्षणमात्रें ॥ १५
अस्वलें वानरें तारियेलीं प्रेमें । रामें गुणधामें आवलिळा ॥ १६
राक्षस मारूनी उद्धरीले रामें । दिली पूर्णकामें भरता भेटी ॥ १७
अयोध्या नगर वैकुंठासि नेलें । नाहीं कीं पाहिले गुणदोष ॥ १८
कलियुगीं दास उद्धरायालागी । मारुती निसंगी ठेवियेला ॥ १९
चहूं वर्णा नामीं अधिकारु बोलिला । जन उद्धरिला नेणो किती ॥ २०
नेणो किती आतां कलियुगामाजीं । स्त्रिया शूद्र भोजी नाम छंदी ॥ २१
नाम छंद जया लागलासे ध्यास । तयास विश्वास रामपाईं ॥ २२
रामपाईं दास **कल्याण** जह्माले । पदीं स्थिरावले श्रीगुरूच्यां[1] ॥ २३

## ( ४ )

## माझ्या स्वामीचें वचन

( बाडांक ५२ वरून )

पतित मी होतों पावन चि केलें । लागतां पाउलें स्वामियाचीं ॥ १
स्वामियाचे पाय देखतां नयनीं । जालें जनीं वनीं समाधान ॥ २
समाधान घडे बहुता सुकृती । सज्जनाचे चित्तीं मिळों जातां ॥ ३
मिळतां मिळणी ऐक्यरूप होता । वेगळें पडतां पतन ची ॥ ४
पतनीं पडिले शब्दज्ञानी जाले । साउटीच[2] बोले वाउगीची ॥ ५
वाउगे बोलिले वेष पालटिले । हिंडो चि लागले दारोदारीं ॥ ६
दारोदारीं जैसे श्वान हिंडतसे । कामक्रोध वसे[3] हृदयामाजीं ॥ ७
हृदयामाजीं काळकूट हे कल्पना । दिसे वृंदावना बाह्याकार ॥ ८

---

( १ ) सद्गुरुच्या-५८; श्रीगुरुचे – १७७३; ( २ ) चाउटीचे बोल वाउगे चि । – ५८, १७७३; ( ३ ) बळेंसे – ५८.

बाह्याकारें स्नान बाह्याकारें संध्या । बाह्याकारें विद्या दावीतसे ॥ ९
दावीतसे जना नानापरी भाव । बुडतयाचा पाव खोलाकडे ॥ १०
खोल हा संसार तयांत बुडाला । धोका हा लागला रात्रंदीस ॥ ११
रात्रंदिवस धोका वाहात चि गेला । काष्ठवत जाला वाळोनिया ॥ १२
वाळला आपण बोलतसे पण । पोरें वणवण करीताती ॥ १३
करिताती चिंता लग्नाची सर्वदा । मागुती वेवादा उठताती ॥ १४
उठतां बैसतां करी नाना चिंता । सज्जनाच्या चित्ता कानकोंडें ॥ १५
कानकोंडें जालें तया मुक्ति कैंची । जितां चि पावती नर्कपात ॥ १६
नर्कपात चुके सज्जन सेवितां । सर्व शास्त्र गीता बोलतसे ॥ १७
बोलतसे माझ्या स्वामीचें वचन । सर्व हि सज्जन समाधान ॥ १८
समाधान जालें सज्जना सेवितां । मुक्ति सायोज्यता घर रीघे ॥ १९
घर रीघे ऋद्धिसिद्धि हे पहातां । मनांत तत्त्वता रामरूप ॥ २०
रामरूप सर्व **कल्याण** अंतरीं । कीर्ति निरंतरीं जगामाजीं ॥ २१

## ( ५ )

## गुरुकृपा

( बाडांक ५२ वरून )

जनीं जनार्दन हें तो वाक्य खरें । परंतु विचारें विवरावें ॥ १
विवरावें बरें वंद्य निंद्य काया । रंक आणि राया येक कैसे ॥ २
कैसे विषामृत[1] मूर्ख आणि संत । पापी आणि भक्त येक नव्हे ॥ ३[2]
नव्हे येक कांहीं उपाधी पहातां । भेद हा तत्त्वता नाना परी ॥ ४
नाना परी स्वाद वल्लीचा कळेना । येक चि जीवना भेद तैसा ॥ ५
भेद तैसा देहीं विचारूनि पाही । इंद्रियांच्या ठाईं भिन्न कार्यें ॥ ६
कार्याकारण हें कर्तृत्व पाहातां । त्रिपुटी तत्त्वता वीवरावी ॥ ७
विवरावें[3] पिंड ब्रह्मांड अष्टधा । साक्षी हा तत्त्वता तयामध्यें ॥ ८

---

( १ ) विष आणि अमृत–५८; विष अमृत–१७७३; ( २ ) येक कैसे विष आणि अमृत । मूर्ख आणि संत येक नव्हे ॥ ३–१३२ ( ३ ) विवरतां–१७७३

तयामध्यें देव तयामध्यें भक्त । तयामध्यें संत पाहों जातां ॥ ९
पहातां पहातां सकळ हि वाव । पहाणारासी ठाव भिन्न कैंचा ॥ १०
कैंचा हा विवेक परब्रह्म येक । तेथें येकानेक आडळेना ॥ ११
आडळेना तुर्या आडळेना ज्ञान । पुढें हें विज्ञान ब्रह्मरूप ॥ १२
ब्रह्मीं ब्रह्म पूर्ण कल्याण संपूर्ण । गुरुकृपे खूण प्राप्त जाली ॥ १३



# श्री कल्याणकृत स्फुट श्लोक

## ( १ )

## भजे रे मना रामदूता समर्था

( बाडांक ५२ वरून )

हरादी विधी विष्णु हे गूणरासी । तया चिंतितां तत्त्वता पुण्यरासी ।
परी अंतरीं चाळकू वातसत्ता । भजे रे मना रामदूता समर्था ॥ १
पहा वात चक्री रवी चंद्र तारा । महा शेष वाराह कूर्मासि थांरा[1] ।
परी अंतरीं चाळकू वातसत्ता । भजे रे मना रामदूता समर्था ॥ २
इती ते किती संत साधू कृपाळू । मनस्वी तपस्वी बहू भक्तपाळू ।
परी अंतरीं चाळकू वातसत्ता । भजे रे मना रामदूता समर्था ॥ ३
पहा स्थावरीं जंगमीं सर्व कर्ता । किती शक्ति भूतावळी भूतधर्ता ।
परी अंतरीं चाळकू वातसत्ता । भजे रे मना रामदूता समर्था ॥ ४
समर्थे समर्था तुला नीरवीलें । तुझें नाम कल्याणसें[2] मीरवीलें ।
तुझे नामधारी तुझी सर्व सत्ता । भजे रे मना रामदूता समर्था ॥ ५

## ( २ )

## हे राम विश्राम कल्याणरासी

( बाडांक ५२ वरून )

तारापती द्वंद्वदुःखें भिकारी । तो सीघ्र केला राज्याधिकारी ।
नवाजणें भक्त धनोर्धरासी । हे राम विश्राम कल्याणरासी ॥ १
कृष्णात्मजारी अनिळात्मजू तो । श्रीरामपायीं येकात्मजू तो ।
अद्‌भूत शक्ति देणें बिरासी । हे राम विश्राम कल्याणरासी ॥ २
पीयूषरंगीं समता उडाली । कपीकूळवल्ली गर्जे बुडाली ।
रघूराजसत्तां[3] पुरंधरासी । हे राम विश्राम कल्याणरासी ॥ ३

---

( १ ) मुळांत " तारा " आहे, पण बाडांक ५८, १०३, २४२ व १७७३ वरून " थारा " घेतलें आहे. ( २ ) कल्याण हें–५८, १२३, ११७४; ( ३ ) सीता–१३६

सुरेंद्र वृष्टी[1] करी सूमनेंसी । तो राम माझा धरी सूमनेंसी ।
प्रतापसिंधू सोडी सुरासी । हे राम विश्राम कल्याणरासी ॥ ४
पदोपदीं नाम घेतां जिवासी[2] । ते जीव तुकती सदा शिवासी ।
लंघूनि जाती या भवपरासी[3] । हे राम विश्राम कल्याणरासी ॥ ५

## ( ३ )

## नव्हे तो चि तो शिष्य मोक्षाधिकारी

( बाडांक ५२ वरून )

गुरूसी करी तोंडपीटी विकारी । पुन्हा दावितो भाव नाना प्रकारीं ।
भृकूटी कुटीळा विलोकी मकारी । नव्हे तो चि तो शिष्य मोक्षाधिकारी ॥१
समस्तांमध्यें मी च श्रेष्ठाधिकारी । अनार्थे दिनातें कुशब्दें धिकारी ।
टवाळी टवाळी करी तो विकारी[4] । नव्हे तो चि तो शिष्य मोक्षाधिकारी ॥ २
आम्ही शिष्य तों चालताहे प्रतिष्टा । आम्हां वेगळे मानिती[5] कोण श्रेष्ठा ।
आम्ही पदूमहस्ती गुरु तो भिकारी । नव्हे तो चि तो शिष्य मोक्षाधिकारी ॥ ३
बहू मान्यतेकारणें तळमळीतो । जसा ग्राम गर्भीं रसें जळमळीतो ।
देहेबुद्धीनें ताडिला षड्विकारी । नव्हे तो चि तो शिष्य मोक्षाधिकारी ॥४
जनीं सज्जनीं तें गुरुदास्य केलें । गुरूचे कृपें सर्व कल्याण जालें ।
असें जाणतो सांगतो स्पोटिकारी[6] । नव्हे तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥५

## ( ४ )

## जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी

( बाडांक ५२ वरून )

अनूरक्त वीरक्त माया प्रपंची । गुरूभक्त तो शक्त दश्या विसंची ।
क्षमासील वेची देहे ऊपकारीं । जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥१
मनीं आवडे तो गुरुराज कैसा । बहू प्रीय प्राणाहुनी देव जैसा ।
गुरु ब्रह्म भावी मनीं निर्विकारी । जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥२

---

( १ ) माळी–५८; ( २ ) विरासी–२४२; ( ३ ) भवपदासी–५८, १७७३; ( ४ ) चिकारी–५५; चकारी–१५६; ( ५ ) मानितो–१५६; ( ६ ) स्पोट विकारी–५५, स्फोटकारी–१५६

देहे पुत्र दारा गुरूलागि वेचीं । वृथा सर्वथा काळ तो ही न वेची ।
बळें साधुचीं लक्षणें अंगिकारी । जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥३

गुरूला न वंची न संची पदार्था । विसंचीत संचीत अध्यात्मग्रंथा ।
दयाळू दिनाचा दिना अंगिकारी । जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥४

गुरुदास जे दास्य त्यांचें करीतो । कदा गूणदोषा मनीं नातळे तो ।
विदेही जसा जनकू मोक्षकारी । जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥५

नसे गोडग्रासी नसे सूखवासी । जसे दत्त गोरक्ष वैराग्यवासी ।
तया दर्शनें सर्व कल्याणकारी । जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥६

(५)

## स्थळ येरमाळे येडेस्वरीचें

(बाडांक ५२ वरून)

स्थळ येरमाळें येडेस्वरीचें । वसताति साधू मोक्षश्रियेचे ।
पानीय पानार्थ सन्नीध गुंफा । जन्मांतरींचा उगऊनि गुंफा ॥ १

हे धर्मशाळा जनपावनाची । रमणीय छाया रंभावनाची ।
जाली च वस्ती जगजीवनाची । आखंड आर्ती वृंदावनाची ॥ २

जाली च नवमी रघुनाथजीची । गेली दिगांताप्रति कीर्ति ज्याची[३] ।
ते संत साधू श्रवणें चि पुष्टी । संतर्पणें ब्राह्मण लोक तुष्टी ॥ ३

अखंड यात्रा अगणीत पर्वे । निःकाम बुद्धी करिती अपूर्वें ।
अध्यात्म श्रवणें जो बद्ध तारी । मननें चि ध्यासें जना उतारी ॥ ४

रमापतीची रमणीय कीर्ती । अखंड गीती ते धन्य मूर्ती ।
विश्रांति मोठी तपोधनाला । कल्याण जननी जनार्दनाला ॥ ५

---

(१) वेची–५५; (२) जगीं–५५; (३) जीची–१३९, २४२, १७७३; (४) नमनें–१७७३; (५) ध्याती–५८, १७७३

( ६ )

## श्रीपत्रिका

( बाडांक ५२ वरून )

श्रीपत्रिकेला लिहिलें विधीनें । हनुमंत आला निरावधीनें ।
सौमित्र वाची सुख राघवाला । अत्यंत प्रेमा कपिपुंगवाला ॥ १
विबूध बंदीं पडिले कृपाळा[1] । किंचीत वार्ता ऐके भुपाळा ।
गाळीप्रदानें वर मार सूरा । दया न दीसे कपटी असूरां ॥ २
त्रैलोक्य वंदी गजाननाला । तो भीत हृदयीं दशाननाला ।
आखंड कष्टी वळितो खरासी । हे दीनबंधू करुणैकरासी ॥ ३
सटवेश्वरीचा तो दोष मोटा । प्रसूतिकांच्या शिरीं वस्त्र मोटा ।
अपमान द्वारीं दीवाकरासी । हे दीनबंधू करुणैकरासी ॥ ४
सुरेंद्र माळी करि पुष्पमाळा । नाना प्रकारें झळके उमाळा ।
देखोन दचके दशाशिरासी । हे दीनबंधू करुणैकरासी ॥ ५
चत्वारशृंगी त्रिपदीं च चाले । त्रिकूटसिखरीं कांहीं न चाले ।
प्रक्षाळिता वस्त्र मळीण रासी । हे दीनबंधू करुणैकरासी ॥ ६
तो येम नैॠत्य जळाधिकारी । लंकेश देखोनि तया धिकारी ।
पानार्थ[2] पाणी विंशतीकरासी । हे दीनबंधू करुणैकरासी ॥ ७
वारा भरारा दरबार लोटी । शषांक बोटी[3] दिनमान लोटी ।
तो मुख्य छत्रा फिरवी करासी । हे दीनबंधू करुणैकरासी ॥ ८
मल्हार[4] मार्तंड हज्यामतीचे । उत्पाटितो वाळ लंकापतीचे ।
सन्नीध भीतो दशकंदरासी । हे दीनबंधू करुणैकरासी ॥ ९
चंडी प्रसंगें फिरत्री दुराई । जयेसि म्हणती माता चिराई ।
प्रगटोनि मारी म्हैसासुरासी । हे दीनबंधू करुणैकरासी ॥ १०
**कल्याण** दासां करी रामराया । लंकार्णवीं देव जाले मराया ।
सांगे विधाता तिथि वार रासी । हे दीनबंधू करुणैकरासी ॥ ११

---

(१) दयाळा–५८, १७७३; (२) पानीय पानार्थ–७७, १४९; (३) पोटीं–१७७३; (४) मल्हारी–१४९

## ( ७ )
## वदा रे वदा राम रामेति वाणी
( बाडांक ५२ वरून )

पतितासि तारी उतारी कृपाळू । वसेना दिसेना असेना भुपाळू ।
बहू भक्त ते तारिले प्रेमखाणी । वदा रे वदा रामरामेति वाणी ॥ १
धरीतो शिरीं भक्तवोझें न बोले । पुराणीं पुराणी कवीवाणी बोले ।
अनाथें सनाथें करी व्यापपाणी । वदा रे वदा रामरामेति वाणी ॥ २
उमाकांत नीवांत ध्यातो जयाला । वनीं भिल्लटी पूजिताहे तयाला ।
तिचें शेष सेवी करी श्लाघ्यवाणी । वदा रे वदा रामरामेति वाणी ॥ ३
प्रभूचें जनीं सर्व कर्तव्य आहे । जिवा मानवाला प्रतीपाळिताहे ।
प्रितीनें जपे[१] शांभवी ते भवानी । वदा रे वदा रामरामेति वाणी ॥ ४
करीं व्याप संताप दुष्टास देता । करी पाप निःपाप हें नाम घेतां ।
दिनानाथ कल्याण दानी निदानी । वदा रे वदा रामरामेति वाणी ॥ ५

## ( ८ )
## तें नाम घेतां अघ सर्व जाळी
( बाडांक ५२ वरून )

सुखार्णवाचे गुण आठवावे । मनांतरीं ते मग[२] सांठवावे ।
जनीं जनाचे गम नाठवावे । पदार्थ रामार्पण लूटवावे ॥ १
उदास वृत्ती हृदयीं वरावी[३] । अध्यात्मविद्या मग वीवरावी ।
प्रपंचमाया झट आवरावी । रतीपतीची चट ना वरावी ॥ २
निरावलंबी वीवरीत जावे[४] । सोहंपणाला मन नित्य जावें ।
आचार्यपद्मीं कमळीं पुजावे । गोविंद जिव्हे स्मरणीं रिझावे ॥ ३
हरादिकांचे निज गूज गावें । निःकाम बुद्धी सज्जनीं जगावें ।
मायीक सर्वै निरसीत जावें[५] । श्रीराम नस्तां मग ना जगावें ॥ ४

---

( १ ) भजे – ५८, १७७३ ( २ ) गम – ५९२ ( ३ ) धरावी – ५८, ११७४, १७७३; करावी – २४२ ( ४ ) विवरी त्यजावे – १३९, २४२ ( ५ ) मुळांत " निरसी जगावें " आहे, पण बाडांक ५८ वरून " निरसीत जावें " घेतलें आहे.

श्रीरामनामीं रत सूमना रे । सध्यां च सर्वै मनकामना रे ।
सर्वस्व वाहे[1] बळी वामना रे । ब्रह्मांड भेदी मग जा मना रे ॥ ५
भ्रूभंगमात्रें त्रैलोक्य जाळी । त्या शंकराते विष पंक जाळी ।
श्रीरामनामामृत वीष जाळी । तें नाम घेतां अघ सर्व जाळी ॥ ६
चराचरीं ठाण रघोत्तमाचें । हें वाक्य गर्जे भविष्योत्तमाचें ।
ममताश्रमी[2] जे रजोत्तमाचे । त्या प्राप्त कैंचें सुख उत्तमाचें ॥ ७
अनाथबंधू निजसूखदानी । भक्ताभिमानी पुरवी निदानी ।
जडजीव नामें नामाभिधानी । अगणीत केले कल्याणदानी ॥ ८

## ( ९ )

## नाम छंद वदनीं वदवीत जावें

( बाडांक ५५ वरून )

तेजबंधुरिपुचा रिपुराज भोळा । अजपुत्रसुत[3] तो[4] जपतो तयाळा ।
हे दोने[5] हृदयांत सुमनांत ध्यावे । नाम छंद वदनीं वदवीत जावे ॥ १*

## ( १० )

## मना सूमना तूं स्मरे च्यापपाणी

( बाडांक ५८ वरून )

जगन्नायकें अन्न निर्माण केलें । जिवा मानवालागि भोक्तृत्व जालें ।
तया दातयाचे मना प्रेम तोषे । वदे आदरें नाम घोषें विशेषे ॥ १
मुखीं ग्रासग्रासीं हरी आठवावा । जिवींचा जिव्हाळा जिवीं सांठवावा ।
ऋषी अंबरीष धृवादीक ध्याती । इती ते किती तुंबरादीक गाती ॥ २

---

( १ ) हा रे – ५८; ( २ ) समताश्रमीं – ५८, १७७३ ( ३ ) जो – ५८; ( ४ ) जो – १७७३; ( ५ ) मुळांत " दोघे " आहे.

* हा श्लोक ५८, १०३, १३९, ५९२, ११७४ व १७७३ या बाडांत स्वतंत्र च दिलेला आहे. म्हणून तो तसा येथें दिला आहे. पण बाडांक ५५ त या श्लोकानंतर " करकर सितबोटी... " व " कर्कराट सुटतां... " हे दोन श्लोक दुसरा आणि तिसरा असे दिले आहेत; बाडांक २४२ त या तीन श्लोकांनंतर " सुराचा आरी... " हा चौथा आणि " सुखार्णवाचे गुण... " हा पांचवा, असे दोन श्लोक दिले आहेत.

कवी व्यास वाल्मीक वाणी पुराणी । बहू आवडी वर्णिला चक्रपाणी ।
इशानी स्मशानीं जपे शूळपाणी । मना सूमना तूं स्मरे व्यापपाणी ॥ ३
मना राम तो धाम कैवल्यदाता । तयाचे दरी ऊदरी तो विधाता ।
विधीसूत गातो हरीचीं चरित्रें । तळी तो बळी शेष वर्णी विचित्रें ॥ ४
अनूरक्त वीरक्त ते भक्त तारी । महा दुष्ट आरिष्ट वारी निवारी ।
मना[1] सुंदरा इंदिराकांत ध्यायी । त्यजी कामना पूर्ण कल्याण गाई ॥ ५

## ( ११ )

## करी नाम कल्याण सर्वा जिवांसी

( बाडांक १०३ वरून )

करी नाम कल्याण सर्वा जिवांसी । परी नेम नेमस्त नामीं शिवासी ।
भवाची भवानी जपे रामवाणी । नसे नाम तें बापुडीं दैन्यवाणीं ॥ १
सदा सर्वदा काळ भक्षी जगा या । परी वासना वास पाहे जगाया ।
जनीं सज्जनीं पाहिलें ना जगाया । दयासागरा बुद्धि दे तूज गाया ॥ २

## ( १२ )

## स्मरत नाम तुरे अघमोहरी

( बाडांक १०३ वरून )

परम सुंदर वाजवि मोहरी । रतिकळा विकळा व्रज मोहरी ।
सकळ ही म्हणती च नमो हरी । स्मरत नाम तुरे अघमोहरी ॥ १

## ( १३ )

## श्रीराममंत्रें निरसी भवाळा

( बाडांक ५२ वरून )

द्वयाष्टदीशा निज कोंदले रे[2] । हें संतकृपें[3] गुज काधलें रे[2] ।
जन्मांतराचें मुळ शोधिलें रे । ब्रह्मार्पणीं मीपण बोधलें रे ॥ १

---

(१) मुळांत " महा " आहे, पण बाडांक १०३, ११७४ व १७७३ वरून " मना " घेतलें आहे. (२) - सें - ५८; (३) संतकृपा - १०३, २४२, ५९२, ११७४

वर्णाश्रमीची विधि चालवा रे । आशा दुराशा दुरि घालवा रे ।
साही जणाचे दिप मालवा रे । मग रामनामें श्री बोलवा रे ॥ २
त्रिकांड वेदू वदला भला रे । तो अर्थ पाहे[1] जो तो भला रे ।
स्वधर्म कर्मीं मग शोभला रे । वेदांत सिद्धांत तो लाभला रे ॥ ३
विवर्त माया विवरी सुटा रे । रिपुषष्ट यातें आधीं कुटा रे ।
शुकादिकांचें सुख तें लुटा रे । मग रामनामें टाळी पिटा रे ॥ ४
श्रीराममंत्रें निरसी भवाला । निरंतरीं ध्यास मनीं भवाला ।
जयवात पद्[2]मीं गर्भोद्भवाला । आधार पुष्टी सज्जनोद्भवाला ॥ ५

## ( १४ )

## ब्रह्म तें संत जाणे

( बाडांक ५८ वरून )

डगमग करिताहे सर्व ब्रह्मांड जातें । आगम निगम शास्त्रीं शुद्ध बोधें त्यजा ते ।
विमळ मळ असेना ब्रह्म तें संत जाणे । तदुपरी सुमना रे तें चि होऊनि जांणे[3] ॥ १
डिमी डिमी डिमी नादें डौर वाहे हराचा । हर हर हर शब्दें शेष डोले हराचा ।
घन घन घन नादें वाजती घंटमाळा । दुम दुम दुम नादें येकमेळा समेळा ॥ २

## ( १५ )

## बहु वात होता व बहुतां बरा रे

( बाडांक ५५ वरून )

पौळस्ति पूजा बहु वात होता । घननीळ पावा बहु वात होता ।
झाडी झडाडी[4] बहु वात होता । प्राणी थैरारी[5] बहु वात होता ॥ १*

× ×

प्रपंच हा रे बहुतां बरा रे । हरीभक्तिवीणे बहुतां बरा रे ।
धणी च देतो बहुतां बरा रे । हरी पुर्जा[6] रे बहुतां बरा रे ॥ २

( १ ) पाहेल – ५८, १०३; ( २ ) मुळांत " पत्नी " आहे, पण बाडांक ५८, ११७४ व १७७३ वरून " पद्मीं " घेतलें आहे ( ३ ) जाई २ १७७३; ( ४ ) झडाडीत–१०३; ( ५ ) थरारीत–१०३; ( ६ ) पुजावा–१७७–

* बाडांक ५८ त हे दोन्हीं श्लोक स्वतंत्र निरनिराळे दिले आहेत. बाडांक

( १६ )

## श्री गुरु मोक्षदाता*

( बाडांक ५५ वरून )

ज्ञानी येक भला कवित्व वदला नाना घटीं बोलिला ।
त्याचा पार कळे तयासि वहिला तद्पता लाधला[1] ।
माया मोह वियोग योग सहसा तुर्येसि वोलांडिलें ।
नाना मूळ समूळ निर्मुळ बळें भेदास हि[2] खंडिले ॥ १
क्रिया कर्म स्वधर्मचरितें लोलुप्यता नाडळे ।
नाना देश विदेश फौर[3] फिरतां शांति क्षमा आडळे ।
निंदा द्वेष अगूर्ण[4] गूण न दिसे भूतकृपा वीलसे ।
प्रारब्धें चि प्रपंच संचे[5] असतां वारी ज कीं लालसे ॥ २
अज्ञान[6] ज्ञान भर्ता स्वजन वनीं वसे श्री गुरु मोक्षदाता ।
सामर्थ्या पार नाहीं अघटित विवर्णे[7] वेद वेदांत वक्ता ।
नाना पंथें पहातां अगणित गणिता दूसरा नाहीं त्राता ।
कृपेचा सिंधु मोठा सकळ जन पदीं तारणें हे चि सत्ता ॥ ३

---

१३९, ११७४ व १७७३ यांत या दोन्ही श्लोकांना १ व २ असे क्रमांक दिले असून पुढील " श्री गुरु मोक्षदाता " हे तीन श्लोक त्यांचेपुढें दिलेले नाहींत. पण यांत म्हणजे बाडांक ५५ त " श्री गुरु मोक्षदाता " या पुढील ३ श्लोकांपैकीं पहिले २ श्लोक तिसरा व चौथा असे दिले आहेत. या अशा ४ श्लोकांनंतर बाडांक २४२ व ५९२ त " अज्ञान ज्ञान भर्ता... " हा श्लोक दिला असून त्या तीन श्लोकांना बाडांक २४२ त १, २, ३ असे क्रमांक दिले आहेत, म्हणून ते तसे पुढें दिले आहेत. बाडांक ५९२ त ते तीन श्लोक १-१ असे स्वतंत्र दिले आहेत.

* पृष्ठांक ६२ वरील * अशी टीप पहा.

( १ ) पावला – ५८; ( २ ) हो – १०३, १३९, २४२; ( ३ ) मुळांत हा शब्द नाहीं, पण ५८, १०३, १३९, २४२, ५९२ व १७७३ वरून तो घेतला आहे. ( ४ ) मुळांत " अगूर्णी " आहे, पण बाडांक ५८, १०३, १३९ व २४२ वरून " अगूण " घेतलें आहे. ( ५ ) मुळांत हा शब्द नाहीं, पण बाडांक १०३, १३९, २४२ व १७७३ वरून तो घेतला आहे. ( ६ ) अज्ञाना–२४२, ५९२, ११७४; ( ७ ) करणी–११७४

## ( १७ )

## वामनावतार

( बाडांक ५५ वरून )

सुरारीचा आरी विलसत लघू विप्र प्रतिमा ।
गुरारीचा आरी त्रिभुवन पदीं[१] पाद महिमा ।
बळीचा तो द्वारीं निशिदिनिं उभा कल्पभरि[२] तो ।
तया गातां गीतीं हिनदिन जना थोर[३] करितो ॥ १

## ( १८ )

## गुरूचा शाप

( बाडांक ५५ वरून )

गुरुश्राप संताप गाजे तडाखा । पुढें नर्क नर्कांतरीं थोर वाखा ।
विधी शीवविष्णूदिकांचें न चाले । असें[४] मुख्य ग्रंथांतरीं वाक्य चाले ॥ १

## ( १९ )

## रामदास चढती गड घेती

( बाडांक ५५ वरून )

करकर सितबोटी वाममुष्टीस मेढा । भरभर शरसूटी राक्षसां मृत्य गाढा ।
कर[५]कर पुर[६]वासी शोक[७]सिंधू कळाली । अमरपुर विलासी गर्जती नाम टाळी ॥ १
कर्कराट सुटतां शरच्यापीं । थर्थरा भयभीत रिपु पापी ।
घडघडा वदती ऋषिमूर्ती । रामदास चढती गड घेती ॥ २

---

( १ ) पता–५८; तुळी–१०३, १३९, २४२; ( २ ) मुळांत " कल्पभितरीं " आहे, परंतु बाडांक ५८, १०३, १३९, २४२, ५९२, १७७३ वरून " कल्पभरि तो " पाठ घेतला आहे; ( ३ ) पार–५८; मुळांत " थार " आहे, परंतु बाडांक १०३, १३९, २४२, ५९२, १७७३ वरून " थोर " पाठ घेतला आहे. ( ४ ) मुळांत " ऐसें " आहे; पण बाडांक १०३, २४२ व ११७४ वरून " असें " पाठ घेतला आहे. " स्वामीद्रोह जया घडे । तो यावश्चंद्र नरकीं पडे । तयास उपाव चि न घडे । स्वामी तुष्टल्यावांचुनी ॥ " ५–३–७३ ( ५ ) कलकल – १०३, १३९, २४२, ११७४; ( ६ ) मुळांत " रिपुवासी " आहे, पण बाडांक ५८ वरून " पुरवासी " पाठ घेतला आहे. ( ७ ) लोकसिंधु – ५८

# श्री कल्याणकृत अष्टपदी

## ( १ )

## रामा पतीतपावना

( बाडांक २५४ वरून )

**अष्टपदी उच्चारा रा मा प ती त पा व ना ।**
आत्माराम स्मरण[1]भावें वारी यातना ।
अखंड चित्तीं चिंतन जाल्या उन्मनी ∠[2] मना ।
आनंदाचे ठाव रंगी नाहीं अनुमाना ॥ ध्रु० ॥

राम नाम उफराटें पावे वाल्मिक उद्धारा ।
राम[3] नाम ध्यातां[4] चि[5] प्रचीत[6] आली[7] शंकरा ।
राजीवेश दाविला सूर्यवंशी साजिरा ।
राजित शरयूतीरा आले अयोध्यापुरा ॥ १

मागुनि विश्वामित्रें राया ऋषीच्या कामा ।
मारुनि राक्षस बाळिये सिद्धी पावविले होमा ।
मार्गीं शिळा करुनी बाळा धाडी आश्रमा[9] ।
माहा विक्रमें पर्णुनि सीता आले निजधामा[9] ॥ २

पट्ट रामराज्यांचा[10] कैकै केला विक्षेप ।
परदेशीं वनवासीं करणें लागलें तप ।
परेश फणिवर सीता देवी लावण्यरूप ।
पञ्चवटिके येउनि[11] रावण हरी पापरूप ॥ ३

---

( १ ) स्मरणें वारी भवयातना – ९७९, १२०९; ( २ ) ∠ या–१६३८ ( ३ ) राम राम – १६३८; ( ४ ) जपतां – १२१८; ( ५ ) १६३८ वरून; ( ६ ) प्रतीति – १२०९; " प्रचीत आली " ऐवजीं " जाली प्रचीती "–९७९; ( ७ ) जाली – १६३८; ( ८ ) तारुनि – ९७९ ( ९ ) मुळांत " निजधामा " व " आश्रमा " असें आहे, पण बाडांक १२१८ वरून " आश्रमा " आणि " निजधामा " असे पाठ घेतले आहेत. ( १० ) मुळांत " रामरायाचा " आहे, पण बाडांक ९७९, १२०९, १६३८ वरून " रामराज्याचा " घेतलें आहे. ( ११ ) असतां–१२०९

स. क. ९

तीकारणें[1] उभयतां नाना वनें धुंडितीं ।
तीव्रे[2] विरहानळ मानसीं[3] लागली खंती ।
तीगुणांपरता[4] जो कवणा नेणवे[5] गती ।
तीर्थे[6] वंदी कार्या कार्या कारण शिव हा मुक्ती ॥ ४

तये अटव्यीं फीरत पंपा सरोवरा येतं[7] ।
तत्काळिक सैन्येसीं सुग्रिव भेटे हनुमंतं[7] ।
तये चि[8] वेळीं रामें वाली केला निःपात ।
तीर्थे[9] वंदी जो श्री राघव ऋष्यमूक पर्वत ॥ ५

पाठविले हनुमंता सीता शुद्धी स्वरूपा[10] ।
पाहुनि माता भीमें[11] मोडी वनीं पादपा ।
पाडुनि[12] राक्षस बळिये जाळी लंकेच्या पडपा ।
पाउनि[13] वार्ता क्षेम सांगे अयोध्याभूपा ॥ ६

वहिले सिंधू तरोनि टाकी सूवेळा ठाव ।
वधिला रावण सहपरिवारीं विजयी राघव ।

---

( १ ) तीलागी–९७९; तियेलागी–१२०९, १२१८, १६३८; ( २ ) तिये समयीं नेतां वाटे मानसीं खंती–१२०९; ( ३ ) " मानसीं लागली " ऐवजीं " वाटे मानसीं " – १६३८; ( ४ ) तिही गुणा–१६३८; तिन्ही गुणा जो परता कवणा नेणवे गती–१२०९; ( ५ ) न पवे–१२०९; ( ६ ) तीर्थे वंदी शिवकार्या कारण हे आहे युक्ती–१२१८; तिये वंदिती शिवकार्या जाणली युक्ती–१२०९; तीर्था वंदुनि सिद्ध कार्या कारण हे युक्ती – १६३८ ( ७ ) मुळांत " येतां " आणि " हनुमंता " आहे, पण बाडांक १६३८ वरून " येत " आणि " हनुमंत " हे पाठ घेतले आहेत. ( ८ ) समयीं – १२०९; काळीं – १२१८; क्षणीं – १६३८; ( ९ ) तरुपाणीसी राघव जेथें ऋष्यमूक पर्वत – १२१८; करुनि पानेसी राम जेथें सुग्रिव हनुमंत – १६३८; ... ... त कृपासागरें जेथें ऋष्यमूक पर्वत – १२०९ ( १० ) शुद्धीच्या रूपा – १२१८; ( ११ ) भीम मोडी वनपादपा – १२०९, १२१८; क्षेमा मोडी वनापादपा – १६३८; मुळांत " मोडी " ऐवजीं " वंदी " आहे. ( १२ ) मारुनि–१६३८; ( १३ ) मुळांत " येऊनि " आहे. पण – " पाउनि समूळ क्षेम " – १२०९ व " पावन क्षेम वार्ता " – १६३८.

वधूसि अंकीं घेउनि स्थानीं[1] स्थापीले देव ।
वचन खेरें[2] करुनी[3] आले अयोध्ये[4] सर्व ॥ ७
नाना[5] सोहळे रामराण्या आनंदघना ।
नागर चवघे बंधू माता सुख जाळें जनां[6] ।
नायक[7]सहीत गौरव केला बोळविली सेना ।
नाना[8] महोत्छाव जाला आनंद त्रिभुवना ॥ ८
नाहीं संशय पाहातां रामदासाच्या दासा ।
कृपाळू[9] कल्याण जाणे[10] भावें[11] कोंवसा ।
येश कीर्ती प्रताप महिमा[12] प्रत्ययो ऐसा ।
पूर्ण वर दीधला स्वामी[13] रामदासा ॥ ९



---

(१) ठाई - १२०९, १६३८; (२) सत्य - १२१८; (३) मानुनि - १२०९; (४) विजयी राघव - १२१८; (५) नाना महोत्सव सोहळा - १२०९; नाना सोहळे होती राम स्वानंदघना - १२१८; नाना परिमळ सोहळा रामा आनंदघना - १६३८; (६) मना - १२०९, १६३८; (७) नाविक सर्व हि जाणुनि ते ही बोलविली सेना - १२०९; (८) नामरूपात्मक प्राणी अखंड वदताती वदना - १२०९ (९) कृपाळू कल्याण स्वामी पावे पुरवी तूं आशा - १६३८; (१०) स्वामी पावे परीयेसा - १२१८; (११) मुळांत "भाव कायसासा" आहे, पण बाडांक १२०९ वरून "भावें कोंवसा" घेतलें आहे. (१२) हा हो - १२०९; (१३) बाडांक १२०९ व १६३८ त "रामदासाच्या दासा" आहे. रामी राम ही दासा - १२१८

# श्री कल्याणकृत सवायी

## ( १ )

## हें महिमान स्मरणाचें

( बाडांक १२४ वरून )

श्रीराम

जेथें श्रीरामनामाचा कडकडाट । तेथें भवसमुद्रीं पायेवाट ।
पायेरि करूनिया वैकुंठ । होती प्रविष्ट परब्रह्मीं ॥ १
रामनामांकित नर । बुडऊं न शके भवसागर ।
श्रीराममुद्रांकित मी वानर । सुखें परपार पावलों ॥ २
नित्य श्रीरामनामस्मरण । तेथें वीर्य धैर्य कल्याण ।
ब्रह्म पावती सनातन । हें महिमान स्मरणाचें ॥ ३
जेथें श्रीरामनामविस्मरण । तेथें अकीर्ति अपेश अकल्याण ।
अतिनिंद्यत्वें पापी पूर्ण । अधःपतन महा नरकीं ॥ ४
यालागी साक्षपें आपण । समूळ सांडावें विस्मरण ।
नित्य करितां श्रीरामस्मरण । कीर्ति कल्याण निज विजये ॥ ५



# श्री कल्याणकृत भूपाळ्या

## ( १ )

## भूपाळी श्रीरामाची

( बाडांक ५२ वरून )

उठी उठी रे सखया । गाया राघवराया ।
क्षणभंगुर हे काया । कां रे वायां दवडीसी ॥ ध्रु० ॥
प्राचीभाग उजळला । भ्रमतम निवळत निवळला ।
श्रीगुरुस्वामी आठवला । वाचे आला श्रीराम ॥ १
जंवरी समुदाये आपुला । मेळा दशक सार्ह्ये जाला ।
तंवरी नरदेह लाधला[१] । विनटला भजनासी[२] ॥ २
नाम[३] जगाचें[४] जीवन । जन वन भुवन पावन ।
हरीजन[५] कल्याण स्मरण । जन्ममरण नीवारी ॥ ३

## ( २ )

## भूपाळी बारा ज्योतिर्लिंगांची

( बाडांक ५२ वरून )

उठोनीयां[६] प्रातःकाळीं । शिव शिव जपा नित्य काळीं ।
महा पापा होये होळी । सर्वकाळीं सुखदाता ॥ ध्रु० ॥
मुख्य काशी विश्वेश्वर । श्वेतबंद रामेश्वर ।
लिंगाकार तो गिरिवर । मलकेश्वर[७] नीळगंगा ॥ १
ओंकार ममलेश्वर । घृष्णेश्वर भीमाशंकर ।
गंगाधर त्रिंबक शिखर । हिमकेदार हिमाचळीं[८] ॥ २
नागनाथ काळनाथ । सोमनाथ वैजनाथ ।
कल्याणस्वामी श्रीगुरुनाथ । दीनानाथ कृपाळू ॥ ३

---

( १ ) लाभला–१०३; ( २ ) हरीभजनासी–२३९; ( ३ ) राम–२३९; ( ४ ) जीवाचें–१०३; ( ५ ) तारी जन – २३९ ( ६ ) उठा उठा – १०३; ( ७ ) मलकार्जुन – १०३; ( ८ ) मुळांत " हीमचळीं " आहे, पण बाडांक १५८ वरून " हिमाचळीं " घेतलें आहे.

( ३ )

## भूपाळी श्रीमारुतीची

( बाडांक १५८ वरून )

उठोनिया प्रातःकाळीं । चिंतन करीती भीमाचें ।
सकळ ही दुरितें नाशन । दंडण चुके यमाचें ॥ ध्रु०
ठकार ठाण मंडित काया । कास कनकाची ।
प्रतापशक्ती पहातां । तुळणा नसे जनकाची ॥ १
राघवसुग्रिवसख्य करुनी । राहो पुढें दंडिला ।
तेहतीस कोटी मघवा त्याचा मान खंडिला ॥ २
कल्याण राघव चौघे बंधु । जनकदुहिता ।
पुढें सन्मुख मारुती । संरक्षी[1] आपुल्या दूता ॥ ३



( १ ) मूळांत " शिव रक्षी " आहे.

# श्री कल्याणकृत आरत्या

## ( १ )

## आरती सद्गुरूची *

( बाडांक १३५ वरून )

जय[1] जय आरति सद्गुरु[2] स्वामी समर्था ।
काया वाचा जिवें[3] प्राणें ओवाळिन आतां ॥ ध्रु. ॥

ब्रह्मा विष्णू हरादिक मानसीं ध्याती ।
सुरवर[4] किन्नर नारद तुंबर कीर्तनीं गाती ।
आगम निगम शेषें[5] स्फूर्ती[6] मंदली गती[7] ।
तो तूं आम्हां पूर्ण कामा मानवा प्राप्तो ॥ १

ऋषिवर कविवर मुनिवर ज्ञानी तुझे[8] स्थापीले ।
षड्दर्शनीं मत्तें[9] गुमांनी[10] पंथें[11] चालीले ।
अपरांपरें[12] परात्परा पार ना[13] कळे ।
पतीत प्राणी पदालागुनी कल्याण[14] जाले ॥ २

---

* बाडांक २३९ त हें नांव दिलें. आहे.

( १ ) मुळांत " जय " शब्द चारदां आहे, ४११ त तीनदां व १५८, २३९ यांत दोनदां आहे. ५१२ त " जय जय जया " आहे. ( २ ) श्रीगुरु – १५८, ४११, ५१२, ५५६, १७९९; ( ३ ) मनें – ५१२ ( ४ ) मुळांत " सुरनर " आहे, पण " सुरवर " पाठ बाडांक १५८, २३९, २७८, ४११, ५५६, ११६७, १७९९ वरुन घेतला आहे. ( ५ ) वदती – ५१२; ( ६ ) श्रमले – २७८; स्तवितां – २३९, ४११; ( ७ ) मती – २३९, २७८ ( ८ ) तुझेनि – ४११; तुझोंचे – ५५६; ( ९ ) मस्त – २७८; ( १० ) " मत्त गुमानी " ऐवजीं " मस्तकमणी " – ४११; ( ११ ) महंत– ४११; ( १२ ) अपरंपारा – २३९; अपरांपरा – १७९९; ( १३ ) न–१५८; २३९, ५१२; ( १४ ) कल्याणाचि – ११६७

( २ )

## ॥ आरती रामदास ॥*

( बाडांक २३९ वरून )

साक्षात शंकराचा । अवतार मारुतीचा ।
कलीमध्यें ते चि झाले । रामदासाची मूर्ती ॥ १
आरती रामदासा । भक्तविरक्तईशा ।
उगवला ज्ञानसूर्य । उजळुनी प्रकाशा ॥ ध्रु०
वीस ही दशकांचा । दासबोध ग्रंथ केला ।
जड जीवा उद्धरीले । नृप शिवाजि तारीला ॥ २
ब्रह्मचारी व्रत ज्याचें । रामरूप सृष्टि पाहे ।
कल्याण तिहीं लोकीं । समर्थ सद्गुरुचे पाय ॥ ३

( ३ )

## काकडआरती श्रीसमर्थांची

( बाडांक २३९ वरून )

वोवाळा वोवाळा श्री गुरु रामदास राणा ।
पंचप्राणांचा दीपक लाविला जाणा ॥ धृ० ॥
तिमिर अज्ञान योगें उजळल्या वाती ।
ज्ञानयोगें प्रगटला तेणें प्रकाशली ज्योती ॥ वोवा० ॥ १ ॥
निर्गुण निरंजन श्री गुरु रामदास ।
दर्शन मंगलप्रद कल्याणाचा कळस ॥ वोवा० ॥ २ ॥

( ४ )

## आरती दासबोधाची

( बाडांक १०६ वरून )

वेदांतसंमतीचा काव्यसिंधु भरला ।
श्रुति शास्त्रग्रंथ गीता सौक्ष[1] संगम केला[2] ।

---

* बाडांत च असें नांव दिलें आहे.

(१) शास्त्र – २७८; (२) जाहला – ५१२, ५५६

महानुभाव संतजनीं अनुभव चाखीला ।
अज्ञान जड जीवा मार्ग सुगम जाला ॥ १
जय जयां दासबोधा ग्रंथराज प्रसिद्धा ।
आरती वोवाळीन विमळज्ञान बाळबोधा ॥ ध्रु० ॥
नवविधा भक्तिपंथें रामरूप अनुभवी ।
चातुर्यनिधी मोठा मायाचक्र उगवी ।
हरिहरहृदयींचें गुह्य प्रगट दावी ।
बद्ध चि सिद्ध जाले असंख्यात मानवी ॥ २
वीस हि दशकींचा अनुभव जो पाहे ।
नित्यनेम विवरितां स्वयें ब्रह्म चि होये ।
अपार पुण्य गांठीं तरी श्रवण लाहे ।
कल्याणलेखकाचें भावगर्भ हृदईं ॥ ३ ॥

( ५ )

## आरती मारुतीची

( बाडांक ५२ वरून )

जय जया प्राणनाथा । प्रियजानकीकांता ।
आरती वोवाळीन । कपिराज समर्था ॥ ध्रु० ॥
अठरा पद्में कपिराजे । तयामधें रुद्र साजे ।
सिंधु हा वोलांडूनी । अशोकवृक्षीं वीराजे ।
मुद्रिका देऊनीयां । सुखी केलें विश्व बीजें ।
लंकापुर जाळुनीया । भुभुकारें घोष गाजे ॥ १
द्रोणागिरि आणुनीया । कपिवीर उठवीले ।
भुभुकारें गर्जोनीया । मृत्य मारूनि ठेले ।
मुख्य तूं प्राणनाथ । प्रेम प्रीती राम बोले ।
लक्ष्मुमणा प्राणदाता । यश अद्भूत आलें ॥ २

(१) केल्ल - ५१२, २७८; (२) देवा - २३९, ५१२, ५५६

अहिरावणें[1] महिरावणें । राम चोरुनीया नेले ।
पुष्टिभागीं उडी ओली । निमिषार्ध सोडवीले ।
दुष्ट पापी संव्हारूनी । जयत गुढीसी आलें ।
कपिवीर गर्जिन्नले । सर्व कल्याण जालें ॥ ३

(६)

## आरती कृष्णाची

(बाडांक ५२ वरून)

वोवाळा वोवाळा तूळसी । वृंदावनवासी ।
कमळावर वर राहे तेथें । क्षीरनीवासी ॥ ध्रु० ॥
सत्यभामा झकली[3] चकली[4] । बुद्धी वैभवा ।
कनक जोखितां तुकितां सिणल्या मुकल्या श्रीदेवा ।
भीमकनंदिनी राहे सदनीं । झडकरी बोलावा ।
त्वरीतें[5] येउनि तुळसी वंदुनी पसरी पल्लवा ॥ १
रुक्मिणी बाळा भावें सबळा लक्षी[6] गोपाळा ।
तन मन धन जन वाउनि[7] तुळसी सोडवी कृपाळा ।
तुळसी गंगा[8] भजनें[9] श्रीरंगा मंजुरीमाळा ।
धन कल्याणा श्रीगुरुचरणा पूजन मनमाळा ॥ २

(७)

## आरती श्रमहरणीची

(बाडांक ५९ वरून)

रघुविरदेहश्रम हरुनी प्रवाह तूं घेसी ।
भवश्रमहारक म्हणुनी नामातें धरीसी ।

---

(१) मुळांत "ऐरावणें" आहे. (२) घाली - १५८ (३) झुकली-४११; (४) चुकली-४११; (५) सत्वर-४११; (६) रक्षी-४११; (७) लाउनि-१५८, ४११; (८) संगा-१५८; (९) पूजन-६६; भजनें - १२४

दर्शनमात्रें हरती असंख्य अघरासी ।
आदिशक्ती परमेश्वरी कैवल्या देशी ॥ १
जय देवी[1] जय देवी[1] जय जी श्रमहरणी ।
दर्शन स्नानें पानें दुस्तर भव तरणी ॥ ध्रु० ॥
तव तीरीं ज्याचा वास मोक्षप्रद त्यासी ।
अगणित गुण न कळे अगमानिगमासी ।
त्रितापहरके काय वर्णूं महिमेसी ।
श्रीगुरुवर कल्याणपद[2] दायक होसी ॥ २

## (८)

## आरती ब्राह्मणाची

(बाडांक ५२ वरून)

सुरवर वर मुनिवर [3] ∠ वंदिती द्विजवर्या ।
विधिवर हरिहर सुंदर पुजीति[4] गुरुवर्या ।
शम दम साधन शांती ब्राह्मण निज चर्या ।
निगमागम षष्टक वरदेश[5] अष्टकसूर्या ॥ १
जय देव जय देव जय वेदमूर्ती ।
सद्भावें[6] आरती जनपावन कीर्ती[7] ॥ ध्रु० ॥
मधुरागर[8] क्षीरसागरं[8] निज तनया वरतो ।
कौस्तुभधर भवपरतीर[9] उतरी सत्वर तो ।
ब्राह्मणपद[10] हृदयावरि लांछन मिरवीतो ।
सद्गुरुवर[11] कल्याण स्मरणीं तत्पर तो ॥ २

---

(१) मुळांत "देव" आहे; (२) स्मरण तत्परसी – ४११
(३) ∠ वर – ६३, १०६, १२४, १६३; (४) वंदिती – ४११
(५) वरदशक – १०६; (६) सद्भावें आरती भावार्थें आरती – ६३;
(७) तीर्थी – ६३, १०६, १२७, १६३, १५८, ४११; (८) री – १६३;
(९) वर पर तीर – ६३; (१०) ब्राह्मण निजचर्या – १६३;
(११) श्रीगुरुवर – १६३

# श्री कल्याणकृत पदपदांतरें

## [ १ ] श्री गणपतीचीं पदें

### ( १ )

### कल्याणदायक तूं आमुचा

( बाडांक ५२ वरून )

सुरवरवरदा गणराया । दे वर रघुविरगुण गाया ।
निजपद सुंदर विवराया । भवपर[1] परतिर उतराया ॥ ध्रु० ॥
मुनिवर कविवर वरमूर्ती । मंगळमूर्ती तुज ध्यांती[3] ।
सर्वारंभीं स्तवितीती[2] । गायक गुणीजन गाताती ॥ १
संकट वारी नीवारी । तारीं सत्वर भव वारी ।
तुजविण न दिसे संसारीं । अनाथबंधू कैवारी ॥ २
अंकित रामदासाचा । भाकित करुणा दिन साचा ।
मयोरस्वामी सकळांचा । कल्याणदायक तूं[4] आमुचा ॥ ३

### ( २ )

### कल्याण करी

( बाडांक ५२ वरून )

नाम तुझें संकटें वारी रे ॥ ध्रु० ॥
मंगलमूर्ती मंगलकीर्ती । मोरेश्वरा मंज[5] दे स्फूर्ती ॥ १
सर्वारंभीं मूळारंभीं । चिंतामणी ∠[6] चिंता हांरी[7] ∠ ॥ २
सकळीक कार्यसिद्धी । आगमनिगम विधी ।
करितां कल्याण[9] करी ∠[8] ॥ ३

---

( १ ) भवभय-६१; ( २ ) नमिती-११९१; ( ३ ) तुज ध्याती-१६३; ( ४ ) वर साचा-११९१ ( ५ ) मुळांत " निर्धारी " आहे, पण " मज दे स्फूर्ती " हा पाठ बाडांक ५८ वरून घेतला आहे. ( ६ ) ∠ मय - ५८, ६१, १८६; ( ७ ) वारी - ५८; ( ८ ) ∠ रे - १८६, २४२; ( ९ ) कल्याणकारी रे - १८६

( ३ )

## मोरेश्वरा तूं कल्याणदाता

( बाडांक ५२ वरून )

नमन गणराया । मति दे । माधवगुण गाया ॥ ध्रु० ॥
मंगलमूर्ती मंगलकीर्ती । मंगलविद्या मज दे स्फूर्ती ॥ १
सकळ कलावर विद्यामूर्ती । पूर्वापर कवि गुणेश म्हणती ॥ २
सर्वारंभीं पूजिती गणपती । श्रुती परात्पर तुजला स्तविती ॥ ३
चिंतामणि[1]मय चिंता वैरी[2] । विघ्नविनाशन दुरित निवारी ॥ ४
मोरेश्वरा तूं कल्याणदाता । दे वर श्रीवर उत्तम गातां ॥ ५

---

# [ २ ] श्री शारदेचीं पदें

( १ )

## विजयी कल्याण करीं

( बाडांक ५२ वरून )

ब्रह्मसुते माते [3]∠ वर दे दे ॥ ध्रु० ॥
सज्जनजीवनी मुनिजनमोहनी । राघववरदा तूं वो वो[4] ॥ १
सकळीक त्रैलोक्य हरिहरादिक । जीवनकळा सकळां तूं वो वो[5] ॥ २
रामउपासक चिंतिती अंतरीं । विजेयी कल्याण[6] करी तूं वो वो[4] ॥ ३

( २ )

## दे वर सत्वर

( बाडांक ५२ वरून )

रघुवीरवरदे वर मातें । दे वर सत्वर[7] मम मातें ॥
अंतर वीवरवी निगमातें । परतर पाववी ऊगमातें ॥ ध्रु०

---

( १ ) स्वयें – ५८; पण गाथ्यांत " भय ". ( २ ) हारी – २४२
( ३ ) ∠ हो–५५; वो–५८, ६१, १०३, १२८, २०७, २४२; वो वो–१८६;
( ४ ) मातें–२०७; ( ५ ) सकळां – २०७; ( ६ ) कल्याणकारी – १८६;
( ७ ) रघुवीर – ५८

सुरस[1] नवरस रसदानी । नारद तुंबर वरदानी ।
फणिवर विधिहर सुखदानी । अखंड ध्याती तुजे[2] ध्यानीं ॥ १
महिजळ नळनिळ व्यापक तूं । रज तम सात्विक रूपक तूं ।
जनवनसज्जनदीपक तूं । भवभय भ्रमतमलोपक तूं ॥ २
सकळिक जननी जनमाया । काया माया मूळ माया ।
साधु मुनिजन उन्मनिया । हरिजन कल्याण उपाया ॥ ३

( ३ )

## बुद्धि देई मातें, माते शारदे

( बाडांक ५२ वरून )

रंगीं येई[3] माते माते शारदे । बुद्धि देईं मातें, माते शारदे ॥ ध्रु० ॥
हरिहरांतरीं सकळिक अंतरीं । व्यापक अंतरीं जीवनकळा ॥ १
रघुवीरवरदा कविवरवरदा । कल्याणवरदा योगलीळा ॥ २



## [ ३ ] श्री रामाचीं पदें

( १ )

## आत्मा रघुवीर

( बाडांक ५२ वरून )

तो मज भेटवा भेटवा । आत्मा रघुवीर दावा ॥ ध्रु०
अहिल्या उद्धारिली उद्धरिली । दिव्य बाळा केली ॥ १
रीसवानरें पाळिलीं । निज पदीं बैसविलीं ॥ २
धर्म स्थापिला स्थापिला । दुष्ट संहारिला ॥ ३
शंभू शूळपाणी शूळपाणी । अखंड ध्यातो मनीं ॥ ४
गणिका तारिली तारिली । विमानीं वाईली ॥ ५
दीनबंधू तो बंधू तो । सज्जनमेळीं वसतो ॥ ६
करुणा भाकितो मानसीं । कल्याण साधुसी ॥ ७

(१) सुरसा – ११९१; (२) तंव – ११९१; (३) येईं – ५८

( २ )

## त्रिदशबंदविमोचक राम

( बाडांक ५२ वरून )

देवदेवा[1] राघवा सुरवंदना[2] रे तूं ॥ ध्रु० ॥

स्मरहरस्मरणा जडमूढतरणा । त्रिदशबंदविमोचना रे तूं ॥ १
दशरथनंदन दशकंठछेदन । प्रचंड भवच्यापभंजना रे तूं ॥ २
कलिमळदहना कलिविरगहना । कल्याणमानसमोहना रे तूं ॥ ३

( ३ )

## कृपासागर राम

( बाडांक ५२ वरून )

धीर उदारा राजसा गुणगंभीरा रे[3] तूं ॥ ध्रु० ॥

विधिहर[4] सुरवर तत्पर भजना । श्रुतीपरात्परा अंतरा रे तूं ॥ १
रविकुळटिळक ऋषिकुळपाळक । पटाधिशा सुंदरा रे तूं ॥ २
त्रिभुवननायक पूर्ण प्रतापी । कल्याण कृपासागरा रे तूं ॥ ३

( ४ )

## योगीसज्जनजीवन राम

( बाडांक ५२ वरून )

अरिकुळखंडण रविकुळमंडण । योगीसज्जनजीवना रे तूं ॥ १
करुणालया माझया सुखसदना रे तूं ॥ ध्रु० ॥
सुरवरवंदना मुनिवररंजना । सुंदर पंकजलोचना रे तूं ॥ २
त्रिभुवनकारणा भवभयवारणा । कल्याण अंतरभावना रे तूं ॥ ३

---

( १ ) देवाधिदेवा – ६१; ( २ ) सुंदरवदना – ६१; ( ३ ) मुळांत 'रे तूं' नाहीं, पण बाडांक १०३, १२४, १३७, २४२, ३९९, ५५४ व १७७३ वरून तें घेतलें आहे. ( ४ ) सुरवर मुनिवर तत्परभजना – १३२; ( ३ ) अंतरा – ५५; राघवा – ७७

(५)

## पतीतपावन राम

( बाडांक ५२ वरून )

मुनिवरमंडण अरिवीरखंडण । दंडण दानव रे ॥ १

राम माझा पतीतपावन रे ॥ ध्रु० ॥

काग भृशंडी, मुरडुनी मुंडी । शोभत दशरथभूवन रे ॥ २
कौशिकवंदन[1] ताटिकाछेदन । पाहोनि घोर वन रे ॥ ३
पतिव्रता पुण्यशिळा, गौतमशापें शिळा । उद्धरिली चरण लाउनि रे ॥ ४
सैवर साधुन, सुरवरबंधन । ऐकत धावन रे ॥ ५
चित्रकूटपर्वतीं, काग पीडी युवती । येतां शरण कृपाजीवनें[2] रे ॥ ६
द्विजकष्टवारण, दुष्टसंव्हारण । निर्मुळ दंडवन रे ॥ ७
भिलटी उद्धरी, घेउनि बदरी । उचिष्ट करी सेवन रे ॥ ८
वाळीनिग्रहण, सुग्रीवरक्षण । तारेचें शांतवन रे ॥ ९
सीताशोधन हरी, रावणमुगुट हारी । पाडुनी दहन भूवन रे ॥ १०
रावण मर्दुनि बाणीं, विबूध गर्जति वाणी । आनंदलें त्रिभुवन रे ॥ ११
अयोध्येसी सुख पूर्ण, ब्रह्मानंद परिपूर्ण । जन आत्मनिवेदन रे ॥ १२
वरद बिभीषण मारुति कल्याणघन । सुखरूप जनवन रे ॥ १३

(६)

## भक्ति पहिली आर्धी साधी

( बाडांक ५२ वरून )

राघव ध्यायी पद पाही दाता तो ॥ ध्रु० ॥

अरे सखया काये सांगो ।

करुणाघन तो कृपा करीतो । तरी तूं लीन होई, पद पाही दाता तो ॥ १

अरे सजणा[3] स्वामी माझा ।

---

(१) नंदन – २४२; (२) कृपानिधी – ५८; (३) सजना – ५८, १०३, १२८, १७७३

श्रीदासाठीं दासापाशीं उभा । लीन होई, पद पाही दाता तो ॥ २

महिमा मोठा कोण जाणे ।

भक्ति पहिली आधीं साधी । बापा लीन होई, पद पाही दाता तो ॥ ३

नामासाठीं शरयूवासी । कल्याणकारी, तारी सारी माया ॥ ४

( ७ )

## देई चौथी भक्ति रे रामा

( बाडांक ५२ वरून )

अनाथबंधू करुणासिंधू । उतरवी भवसिंधू ॥ १

अहो जयरामा [1] ॥ ध्रु० ॥

मेघशामा उत्तमोत्तमा । तारी तारी आम्हां ॥ २

दुर्घट वाटे अंतरीं दाटे । काय करूं राघवा ॥ ३

मायाजाळ हा भवव्याळ । डंखूं पाहे आम्हां ॥ ४

मनाच्या कामना अनंत भावना । निरसी तूं मेघशामा ॥ ५

नाम [2] कल्याण म्हणोनि शरण । देई चौथी भक्ति रे रामा ॥ ६

( ८ )

## फडकतसे जयवंत निशाण

( बाडांक ५२ वरून )

हरिवर गिरिवर जळनिधि तरले । जड मूढ पावन जाले ।

रजनीचरवर शरणांगत तो । आक्षे बिभीषण नामा ॥ १

कविवर वदला रे वदला राघवमहिमा[3] ॥ ध्रु० ॥

रावण शिवगण शिववरदानें । अगणित नें[4] गणी[5] कोणा ।

अभंग ठाणें अमोघ बाणें । छेदुनि निर्मुळ निःसीमा[6] ॥ २

हरिगण ऋषिगण सुरगण गणपति । पशुपति रघुपति भेटी ।

देव दुंदुभी गर्जती गजरें । जय जय श्रीरामा ॥ ३

---

( १ ) हो – १०३; ( २ ) हें – ५८, १७७३; ( ३ ) राघव रघुपति महिमा – १६३; ( ४ ) नागणीत – ५८; ( ५ ) गणिती – ६१, गणीत – २४२, १७७३; ( ६ ) सीमा – १६३, २४२

जयजयकारी[1] पुष्पक भोरी । झळकतसे नभमंडळीं ।
फडकतसे जयवंत निशाण । कैकैसुतवरक्षेमा ॥ ४
सुंदर माता सुंदर भ्राता[3] । सुंदर सीता कांता ।
सुंदर पट्टाधीशा सुमनें । पुजिती विश्रामधामा ॥ ५
मंगळ जन नीवासी जन हें । सकळीक मंगळकारी[4] ।
मंगळ भगिनीवीर[5] हा रघुवीर । कल्याणदायक प्रेमा ॥ ६

( ९ )

## जड जीवा कल्याण

( बाडांक ५२ वरून )

अहो जय रामा हो । पतीतपावन पूर्णकामा हो ॥ ध्रु० ॥
सुरवरवरदा रघुवरवेशा । दीनोद्धरणा दिनकरवंशा ।
अयोध्याधीशा तूं जगदीशा ।
ध्याती मुनीवर हरिवर ईशा, भक्तवछळसर्वेशा ॥ १
दशरथनंदना तूं जगजीवना । अहिल्याउद्धरणा तूं मनमोहना ।
हीनदीनपावन अरिवीरकंदना ।
योगीमंडण तूं सुखसदना, पाहे पाहे तूं अनन्या ॥ २
गिरिजापति वर अंतर[6]जीवासी । सकळ चराचर अंतरवासी ।
धर्मपरायण धार्मिकरासी ।
पुण्यपरायण शरयुनिवासी । [7] जड जीवा कल्याण करीसी ॥ ३

( १० )

## देव आमुचा

( बाडांक ५२ वरून )

राम दीनबंधू रे । भक्तपाळ । तो कृपाळ । देव आमुचा ॥ ध्रु०
दुष्टासि मारितो । दासासि तारितो । संकटें वारितो । सत्य वाचा ॥ १

---

( १ ) जयजयकारे – ६१; ( २ ) पुष्पकभारें – ६१; ( ३ ) पिता – ५८; ( ४ ) मंगलकार्ये – १६३; ( ५ ) विर – २४२; ( ६ ) मुळांत " अंत " पडलें आहे, पण बाडांक ५८ वरून " अंतर " घेतलें आहे; ( ७ ) अहो – १०३

सुबाहु ताटिका । संव्हार सैन्यका । आनंद कौशिका । येजनाचा[1] ॥ २

तत्काळ पावला । लाउनी पाउला । उद्धार जाहला । अहिल्येचा ॥ ३

काननीं पेटला[2] । पादपा भेटला । सप्रेम दाटला । कंठ ज्याचा[3] ॥ ४

भीलटी वेधली । भावार्थे लोधली । शेष फळें खादलीं । विकल्प कैंचा ॥ ५

हिमाद्रिदुहिता । माईक मोहिता । ना कळे तत्वता । अंत [4] ज्याचा ॥ ६

त्रैलोक्यनायकू । कल्याणदायकू । भक्तांसि रक्षकू । रुद्र साचा ॥ ७

( ११ )

## कल्याणदायक गुरुभक्ता

( बाडांक ५८ वरून )

राजीवनयना रघुवीरा । शिवहरमानसमंदीरा ।

अरिविरमर्दन रणधीरा । अगणित तव गुण गंभीरा ॥ ध्रु० ॥

अगम्य न गमे हे करणी । जड मूढ पावन श्रीचरणीं ।

वैंशाभरणा[5] तूं तरणी । नामें तरले दमपाणी ॥ १

हरिवर[6] सुरवर अवतारी । गिरिवर तरुवर नळ तारी ।

दशमुखछेदन शरधारी । बंदमोचन[7] वृत्रारी ॥ २

मंगळ जननी ज्या माता । वाल्मिक तरला[8] ज्या माता ।

श्रवणें तरले भव मातां[9] । कल्याणदायक गुरुभक्तां[10] ॥ ३

---

( १ ) यजनाचा – ५८; यज्यनाचा – १७७३; ( २ ) " बैठला " चें " पेटला " केलें आहे. बाडांक ५५ व १२४ त " पेटला " च आहे; आणि बाडांक ५८, १०३, २४२ व १७७३ मधील ".पैठला " म्हणजे " पेटला " च. ( ३ ) त्याचा – २४२; ( ४ ) अंतर ज्याचें – १७७३; ( ५ ) मुनिजन स्मरती तुज स्मरणीं ॥ – १०३, १२७, १३७, २४२; ( ६ ) हरिविर – १७७३; ( ७ ) बंदविमोचन – १०३, १२७, २४२, १७७३; ( ८ ) वदला – १२७, १३७, २४२, १७७३; ( ९ ) माया – १२७; ( १० ) निजभक्तां – १०३, १२७, १३७, २४२

( १२ )

## स्मरहरमानसविश्रामा

( बाडांक ५८ वरून )

जय जय जय[1] श्रीरामा । वामे राजित निज रामा ।
मुनिवर गुरुवर गुरु रामा । स्मरहरमानसविश्रामा ॥ ध्रु०
सुर[2]नरवानर प्रतिपाळा । सृष्टि चराचर कृपाळा ।
वेष्टित पंडित ऋषिपाळा । धरणीधरवर भूमिपाळा ॥ १
फणिवरशयना सुखकरणा । दीनोद्धारण तमहरणा ।
वंशाभरणा भवतरणा । पतीतपावन तूं स्मरणा ॥ २*
शचीवरमानसमंदीरा । चरणसंव्हाहन इंदीरा ।
दितिकुळकंदन रणधीरा । जड मूढ पावन परतीरा ॥ ३
रघु[3]वीर कल्याण पददाता । मुक्ती न [4]लगे गुण गातां ।
भजन निवेदन विवरीतां । मांईक सकळिक मोहममता ॥ ४

( १३ )

## शंकरमानसविश्रामा

( बाडांक ५८ वरून )

सुं[5]दर सुंदर रुप साजे । सीतावर वर वीराजे ।
अठरा पद्में कपिराजे । भुभुकारें नभ गाजे ॥ १
जय[6] जय जय जय श्रीरामा । शंकरमानसविश्रा[7]मा ।
सर्वांपर तूं परमात्मा । विश्वीं व्यापक विश्वा[8]त्मा ॥ ध्रु० ॥

---

( १ ) मुळांत नाहीं, पण १७७३ त आहे; २४२ त चारदां " जय " आहे. ( २ ) सुरवर – १७७३; ( ३ ) माधव – २४२; ( ४ ) " न लगे " ऐवजीं " वारीन " – २४२; ( ५ ) हा चरण मुळांत नाहीं, तो २४२ वरून घेतला आहे. सरली – १७७३. ( ६ ) जय जय रामा सुखधामा । – १२८, २४२; ( ७ ) आरामा – १२८, २४२; ( ८ ) मुळांत " विश्रामा " आहे, पण बाडांक २४२ वरून " विश्वात्मा " घेतलें आहे. * हें कडवें मुळांत नाहीं, तें २४२ वरून घेतलें आहे.

प्रतापविजयी रघुराजा । मोचन सुरवर सुरफौजा ।
वोळगती राजाधिराजा । रंक मी म्हणवीती निज काजा ॥ २
अहं रावण मारुनियां । भाव बिभीषण स्थापुनिया ।
वानरगण रण उठउनियां । कल्याणदायक म्हणउनियां ॥ ३

( १४ )

## मुनिजनमनविश्रामा रामा

( बाडांक ५२ वरून )

श्री जयरामा मेघशामा । शिवआरामा संपूर्णकामा ।
मुनिजनमनविश्रामा रामा ॥ १
श्री सुखधामा नित्य निःकामा । तारक ब्रह्म आतुळ सीमा ।
मुनिजनमनविश्रामा रामा ॥ २
श्री गुणग्रामा आत्मयारामा । पुरुषोत्तमा कल्याणधामा ।
मुनिजनमनविश्रामा रामा ॥ ३

( १५ )

## स्मरणें कल्याण जालें

( बाडांक ५२ वरून )

शरयूतीरीचा रावो पवित्र परिकरु वो ।
भुक्तिमुक्तीचा अभयंकरु वो ॥ १
तेथें मन गुंतलें वो ॥ ध्रु० ॥
उत्तम कुळींचा स्वामी येकपत्नीवरु वो ।
ज्याते चिंतितो चित्तीं हरु वो ॥ २
स्मरणें कल्याण जालें भक्त अपारु वो ।
धीर गंभीर मनोहरु वो ॥ ३

---

( १ ) सज्जनमनविश्रामा – ५८, १७७३; ( २ ) योगीमनविश्रामा – ५८, १७७३; ( ३ ) राजा – ५८, १०३, २४२, १७७३; ( ४ ) भक्ति – २४२, १७७३; ( ५ ) हो – १०३, २४२

## ( १६ )

### दासां कल्याण होतसे

( बाडांक ५२ वरून )

या रामचंद्रीं मानस वेधलेसें ॥ ध्रु० ॥

सुंदर सुंदर लावण्यमनोहर । राजाराम शोभतसे ॥ १

धनुष्यबाण करीं ठाण निरंतरीं । जेथें तेथें दिसतसे ॥ २

त्रिंबकभंजन मुनिजनरंजन । महादेव ध्यातसे ॥ ३

नित्य निरंतरीं ध्यान हें अंतरीं । दासां कल्याण होतसे ॥ ४

## ( १७ )

### तारक नाम तुझें

( बाडांक ५२ वरून )

त्रिदशबंदविमोचन देवा । वारी हे भवमाया ॥ १

श्री राघवराया ॥ ध्रु० ॥

निश्चळ रूप पुरातन तूझें । दाखवी नयना या ॥ २

पावन ब्रीद खरें चि करावें । दीनासी उद्धरीं[1] या ॥ ३

तारक नाम[2] तुझें गुणराशी । हरिजना गाया ॥ ४

राम उपासक ध्याती निरंतर । कल्याण पदठाया ॥ ५

## ( १८ )

### कृपाळू राम

( बाडांक ५८ वरून )

राजीवलोचन बंदविमोचन । नाम तुझें दिनबंधू ।

गणिका अजामेळ पापिणी कुंटणी । उतरवी[3] भवसिंधू ।

अंध मुकें दीन दरिद्रदोषी । ऐसियातें नाम छंदू ।

ब्रीदासाठीं भक्त तारिले अनंत । गुण गाती संतसाधू । रे रामा ॥ १

---

( १ ) उद्धरावे – २४२; ( २ ) मारक – ५८, १७७३; ( ३ ) उतरली – २४२

रामा कृपाळुवा दयानिधो । कृपाळुवा ॥ ध्रु० ॥
ऋषिशापें वर पावली सत्वर । उद्धरिले अहिल्येसी ।
पादप पाषाण तृण भूमीवरी । आलिंगीसी प्रेमरासी ।
भिलटीचीं फळें सेविलीं निर्मळ । भाविकें प्रेमळें निववीसी[1] ।
कबंध विराध शरें मुक्त केले । खग मृग वनवासी ॥ २ ॥
वदे सीता सीता, काननीं हिंडतां । पार्वती तत्त्वता छेळूं आली ।
देव परात्पर नित्य निरंतर । जाणतो अंतर चंद्रमौळी ।
जगद्गुरुवर सुंदर श्रीवर । साक्षी चराचर वनमोळी[2] ।
ब्रह्मस्थिती [3] आगमनिगम । वेढावली बहु[4] काळीं ॥ ३ ॥
पवित्र करणी पवित्र धरणी । पवित्र वर्णी नाम तुझें ।
पवित्र परिकर वंश दिवाकर । सांगतो शंकर विश्वबिजे ।
रिपुवरखंडण दानवदंडण । सुरवरमंडण राम राजे ।
सज्जनभुवन **कल्याण** जीवन । पतीतपावन ब्रीद गाजे । रामा ॥ ४

## ( १९ )

## आपुल्या ब्रीदा राखे स्वामी

( बाडांक ५२ वरून )

राघव माये दावी पाये आतां वो ॥ ध्रु० ॥
त्रिविध तापें पोळविले । साही वैरी मजला पिडिती ।
हीण मी करूं काये दावी पाये आतां वो[5] ॥ १
मानस माझें आवरेना । याच्या संगें वृत्ति भंगे । हीण मी० ॥ २
पूर्वापारा[6] करुणाअपारा[7] । नाहीं थारा वारा पारा । हीण मी० ॥ ३
विश्वपाळा विश्वनाथा । ऐके माझी विनती आतां । हीण मी० ॥ ४
नाम तुझें **कल्याण** माझें । आपुल्या ब्रीदा राखे स्वामी । हीण मी० ॥ ५

---

( १ ) मुळांत " निववि़ली " आहे, पण २४२ वरून " निववीसी ".
( २ ) मनमाळी – २४२; ( ३ ) ∠ गम – १५७३; ( ४ ) भवकाळी-२४२;
( ५ ) " आतां वो " मुळांत नाहीं, पण बाडांक १०३, २४२ वरून घेतलें आहे.
( ६ ) पूर्वापर – १५७३; ( ७ ) करुणापारा – १५७३

## ( २० )

## तो चि देव आठवावा

( बाडांक ५२ वरून )

ज्याचे चरणींचें पाणी । माथा वंदी शूळपाणी ॥ १

तो चि देव आठवावा । हृदयांत सांठवावा ॥ धृ० ॥

ज्याचे चरणींची मा[1]ती । चिरं[2]जीव तो मारुती ॥ २

[3]ज्याचे चरणाची ख्याती । सिंधु पाषाण तरती ॥ ३

चरणं[4] वंदितां चि शिरीं । विभीषण राज्य करी ॥ ४

चरणं[5] वंदि[6]तां चि माथां । दिव्यदेही गौतमकां[7]ता ॥ ५

ज्याचें चरणप्रसादें । स्थिरावलीं इंद्रपदें ॥ ६

ज्याचे आठवितां पाय । सिद्ध कल्याणउपाय ॥ ७

## ( २१ )

## वाचे राम बोला

( बाडांक ५२ वरून )

शेष श्रमला श्रुति म्हणती नेति नेती । काय करूं मी स्तुती,
मानव मंदमती ॥ १

धन्य सद्गुरु रामा, मज न कळे तुझा महिमा । सिमा च होती निसिमा,
पुराण पुरुषोत्तमा ॥ २

ब्रह्मा विष्णू हर, त्याहुनि परात्पर । विश्रांतीची थार,
मायेविण माहेर ॥ ३

---

( १ ) ख्याती – ५५, पण ५५ व्या बाडांत च पुन्हां हें च पद उतरलें आहे, तेथें " माती " असा च पाठ आहे; ( २ ) तृणवल्ली उद्धरितीं – १०३, २४२; शिवाय " चिरंजीव तो मारुती " असा चरण निराळा आहे च; ( ३ ) हा चरण मुळांत नाहीं, तो बाडांक ५८ वरून घेतला आहे; ( ४ ) ज्याचे चरण वंदितां शिरीं – १७७४; ( ५ ) ज्याचे चरण लागतां – १०३, २४२, १७७३; ( ६ ) लागतां – १३५; ( ७ ) विभीसुता – १७७३

सद्भाग्यिकाला फळला, थोर लाभ जाला । अनुभव हा सज्जनाला,
वाचे राम बोला ॥ ४

नाम ह्मणतां वाचे, पद लाभे स्वामीचें । धा[1]मं कल्याणाचें,
तपफळ ज[2]न्मांतरींचें ॥

## ( २२ )

## हृदय कल्याणाचें

( बाडांक १०३ वरून )

घडी घडी घडी घडी आठवतें रूप तुझें रामा ।
जप जप जप राम ना[3]म नित्य नेम प्रेमा ॥ ध्रु० ॥

झळ झळ झळ कीरटी कुंडल सरळ कुरुळ साजे ।
कोटी इंदू पूर्ण [4]कळा मुख पद्मीं लाजे ॥ १

[5]मग मग मग टिळक भाळीं सुरेख[6] मृग नाभा ।
[7]झग झग झग दंतप्रभा कोटी सूर्य गाभा ॥ २

घण घण घण च्यापघंटा लख लख लख तूणी ।
सर्व काळ भक्तपाळ शोभे सिंव्हासनीं ॥ ३

कंठमाळ रत्नमाळ पदक डोलतसे ।
तग तग तग [8]तगीत पीत अंबर कासे ॥ ४

खळ खळ खळ आंदु[9] वाकी शब्द नेपुरांचे ।
ब्रह्मादिका दुर्लभ पदें, हृद[10]यं कल्याणाचें ॥ ५

---

( १ ) धाम चि – ५८; ( २ ) जन्मजन्मांतरींचे – ५८ ( ३ ) राम – १७७३; ( ४ ) ' पूर्ण कळा ' ऐवजीं ' प्रभा मुगुटीं ' – ३२८; ( ५ ) मघ मघ मघ – १७७३; ( ६ ) मुळांत हा शब्द नाहीं, तो बाडांक ३२८ वरून घेतला आहे. सुरस – ५८, २४२, १७७३; ( ७ ) कोटी इंदू प्रभा मुगुटीं कोटी सूर्य प्रभा – ३२८; ( ८ ) मुळांत हा शब्द नाहीं, तो ५८, २४२ व १७७३ या बाडांवरून घेतला आहे. ( ९ ) ' आंदु वाकी शब्द ' ऐवजीं ' शब्द वाक्य आंदु ' – ३२८; ( १० ) हृदयीं – ३२८.

(२३)

## स्मरणें कल्याण जीवा

( आडांक ५२ वरून )

राघव गावा गाईला चि [1][2] ॥ ध्रु०

चकोरा आवडे जीवा । चंद्रामृत निज ठेवा ।
अखंड सातवा आठवा । दिनबंधू ध्याइला चि ध्यावा [3] ॥ १

चातका लागला हेवा । घनानंद भेटवा ।
अनुदिनीं करिती धांवा । वानिला चि वानूं नित्य नवा ॥ २

भावार्थ बळकट व्हावा । स्मरणें कल्याण जीवा ।
येथें कांहीं नाहीं गोवा । नामामृत सेविलें चि सेवा ॥ ३

(२४)

## रघुपतिसदृशो नास्ति देवो द्वितीयः ।

( आडांक २४२ वरून )

राघवरायासम तुल्य देव नाहीं भुवनत्रै ॥ ध्रु० ॥

तंदुळ पोहे मुष्टि दोनी ।
घेउनि सुदामयालागुनि ।
नगरी दिधली म्हणती जनीं ।
विशेष करणी कैसी हे ॥ १ ॥

ऋषिवर छळितां पांडवराणी ।
धांवे ऐकत धांवा कर्णीं ।
करतळ पसरुन म्हणे बहीणी ।
घाली शेष शाकेचें ॥ २ ॥

---

(१) राम – ६१, ७९, १३६, ३५३; (२) राम गावा – १३२, ३५३; राघव गावा – १३६; (३) राम गावा – ५५; गाईला चि – २४२

त्रिपांड भुमिका घेउनि वामन ।
वाढे अद्भुत जिंकी त्रिभुवन ।
सुतळ राज्य बक्षीस देऊन ।
रक्षण तिष्ठत दारेसी ॥ ३ ॥
घेउनि देती उदंड देव ।
तैसा नव्हे राघवराव ।
नमनासाठीं बिभिषणभाव ।
[1]ज्यांनें दिधलें राज्यातें ॥ ४ ॥
ज्याच्या नामें पर्वत तरती ।
जड जीव **कल्याणीं** रातती ।
ज्याची कीर्ति शिवादि गाती ।
रामीं भजती निजनिष्ठा ॥ ५ ॥

## ( २५ )

## वारिलीं संकटें नाना

( बाडांक ५२ वरून )

तुझे चरणीं मानस [2]रामा रंगलें रे [3] ॥ धृ० ॥
जड मूढ प्राणी आम्ही । सरते केले [4]तां स्वामी ।
पतीतपावन ब्रीद । चांगलें रे ॥ १
अवगुण माझे कोटी । क्षमिले सर्व हि पोटीं ।
आठवितां ह्रदय माझें । दाटलें रे ॥ २
वारिलीं संकटें नाना । बोळलासी करुणाघना ।
जनीं वनीं जनार्दना । देखिले रे ॥ ३
नाम हें **कल्याण** तुझें । जीवनीं जीवन माझें ।
पूर्व संचित [5] चि [6] तें । लाधलें रे ॥ ४

(१) मुळांत " जानि " आहे. (२) माझें – ३९९ (३) ॥ रामा – ३९९, १७७३ (४) त्वां –१७७३ (५) पूर्वसंचितें चित्त – ५८, ६१, १०३, १७७३ (६) चित्त – ३९९

## ( २६ )

## राम माझा जीव प्राण

( बाडांक ११.९१ वरून )

आतां लावा रे पंचारती । रामलक्ष्मणसीतामारुती ॥ धृ० ॥

समदृष्टीनें राम पहा । नीट सन्मुख उभे रहा ।
राम होउनी राम तुम्ही पहा ॥ १

ध्यान आव्हान आसन जाण । पाद्य अर्घ्य आचमन ।
कांहीं नेणे मी रामाविण ॥ २

स्नान परिधान उपविती गंध । केशर कस्तुरी सुमन सुगंध ।
कांहीं नेणे मी मतिमंद ॥ ३

धूप दीप नैवेद्य जाण । विडा दक्षिणा नीरांजन ।
कांहीं नेणे मी रामाविण ॥ ४

मंत्रपुष्पादि प्रदक्षण । पंचभूतादि पांच हि प्राण ।
करा रामासी समर्पण ॥ ५

राम लक्ष्मण सीताबाई । नाम **कल्याण** * नित्य गाई ।
राम व्यापक सर्वां ठाईं ॥ ६

**रामीरामदास** * म्हणे । रामाविण मी कांहीं नेणे ।
राम माझा जीवप्राण ॥ ७



---

* हें पद कोणाचें असावें ? कल्याणाचें, का समर्थांचें ? सहाव्या कडव्यांत कल्याणांचा स्पष्ट निर्देश आहे, तर सातव्यांत " रामीरामदास म्हणे " आहे. त्यावरून दोन च अनुमानें संभवतात. हें पद जर कल्याणांचें असेल तर सहा कडव्यांचें आपलें पद कल्याणांनीं समर्थांना दाखविलें आणि सातव्या कडव्याची आपली पुस्ती समर्थांनीं त्याला जोडली, असें मनांत येतें. पण हें पद कल्याणांचें नसून तें सगळें च पद श्रीसमर्थांचें असेल, तर सहाव्या कडव्यांत समर्थांनीं केलेल्या कल्याणांच्या उल्लेखावरून कल्याणांकडे पहाण्याची समर्थांची दृष्टि दिसून येते. कोणतें हि अनुमान खरें असो, हें पद समर्थांचें असो, वा कल्याणांचें असो, या उभयतां गुरुशिष्यांना परस्परांविषयीं वाटणारी आत्मीयता आणि तादात्म्य हीं त्यावरून स्पष्टपणें दिसून येतात.

## [ ४ ] श्री मारुतीचीं पदें

### ( १ )

### रघुपतीचा कैवारी

( बाडांक ५२ वरून )

कैपक्षी भीमराया । निगमांतर विवराया ।
ब्रह्मानंद वराया । चंचल मन अवराया ॥ १

संकट दुष्ट[1] हराया । मारकु मारक राया ।
गुरुपदरेणु धराया । भाविक जन उद्धराया ॥ २

रघुपतीचा कैवारी । दुर्घट विघ्न निवारी ।
भजन पूजन मंदवारीं । कल्याण जनहितकारी[2] ॥ ३

### ( २ )

### रामदासांचा कैवारी

( बाडांक ५२ वरून )

अहो जी बलभीमा ∠[3] बलभीमा ॥ ध्रु०

भक्तजनातें निरउनि तुम्हां[4] । स्वामी गेले निजधामा ∠[3] ॥ १

रामदासांचा कैवारी साचा । तुजविण कोण ∠[5] आम्हा ∠[3] ॥ २

करुणाकरा धीर[6] उदारा । कल्याण[7] करी सुखधामा ∠[3] ॥ ३

---

( १ ) दूर – ४११; ( २ ) मुळांत ' हितवारी ' आहे, ५९२ त ' हित जनवारी ' आहे, पण ५५, ५८, ५९, १२४, २३९, २४२, २४४, ४११, ११६६ व १७७३ या बाडांवरून ' जनहितकारी ' पाठ घेतला आहे. ( ३ ) ∠हो – ८७; रे – २४२; ( ४ ) मुळांत " तूंते " आहे, पण बाडांक ५५, ५८, ६१, ७९, ८७, १०३, १२४, १२८, २४२, २५० व १७७३ वरून " तुम्हां " घेतलें आहे. ( ५ ) हें – ८७; ( ६ ) " धीर उदारा " ऐवजीं " दीनोद्धारा " – ११९१; ( ७ ) कल्याणकारी – ८७, ११९१

## ( ३ )

## मारी दुर्जन अदया

( बाडांक ५२ वरून )

पिंगाक्षीवदना[1] मदनाअंतक तूं गुणसदना ।
रजनीचरवरकदना अत्यंत प्रिय मधुसूदना ॥ १
हरिवरनंदन पवना[2] । कडकड जाळित भुवना ।
फणीवरजीवनजिवना । जगदांतर जगजीवना ॥ २
वृत्रारिरिपुहरणा । जमदाग्नी जितचरणा ।
तन्मय अंतःकर्णा । भरणामरणातरणा ॥ ३
गिरिवर उचलुनि बोटी । लंघुनि च्यारी कोटी ।
उठवित कपिकुळकोटी । कैवारी सुर[3]कोटी ॥ ४
कृपासहस्रकरउदया । करुणाजळधरहृदया ।
कल्याणदायक सदया । मारी दुर्जन अदया ॥ ५

## ( ४ )

## वानरवीर

( बाडांक ५२ वरून )

भीतरी जाऊनि कपाट लाउनि देवीस दाटीत दाटी ।
गर गर गर लोचन फिरवी, भीम भयानक जेठी ॥ १
अरिवीर ठकिले रे ठकिले वानरवीरें ॥ ध्रु०
अहिवीर महीवीर वीरवीर स[4]मवरवर निज खूणा ।
सुरस [5] रसना इछिती षड्रस सत्वर[6] नैवेद्य आणा ॥ २
रजनीचर वीर तरंतर वेघती भगवती प्रसाद माथा ।
गवाक्ष पाडुनि घबघब वोतिति दधी घृत मध दूध चळथा ॥ ३

---

( १ ) पिंगाक्ष – १०३, २४२, पिंगाक्ष भव्य वदना – १७७३ ( २ ) पावना – २४२; ( ३ ) सुरवर कोटी – ५८, १७७३; ( ४ ) " स " ऐवजीं " सकळा " मागाहून केलें आहे. बाडांक ५५, १०३, २४२ व १७७३ यांत " सकळा " च आहे ममवरवर – ५८, १०३, २४२, १७७३; ( ५ ) रस – २४२; ( ६ ) सत्वर – १०३;

घटघट घटघट रसना घोटी मोठी धारा सुटी ।
अद्भुत उदरीं शांती न दिसे त्रिभुवन ज्याचे पोटीं ॥ ४
लेह्यं पेयं चोष्य खाद्यसें गटगट गटकावितो ।
चटमट चटमट चटमट करितो मटमट मिटक्या देतो ॥ ५
आंबे निंबें आणसें फणसें अंजिरें केळें बोरें ।
असंख्य मोटा राक्षस रिचविति शिणलीं रांडापोरें ॥ ६
अरिवीरदंडण कल्याणमंडण रामउपासक ख्याती ।
ऐकुनि कीर्ती सज्जन मूर्ती ईश्वर गातीं गीतीं ॥ ७

## ( ५ )

## स्वामिनिष्ठा

( बाडांक ५२ वरून )

रामचरणीं घातली मिठी । अश्रू प्रेमपूर[1] लोटी ॥ १
माझा स्वामी[2] गांजिला जेहीं[3] । त्यास मारीन ठाईंचा ठाईं ॥ २
पूर तुंबती अशुद्धाचे । प्राण घेईन राक्षसांचे ॥ ३
मक्षिकावती घालीन पालथी । शीर्षें उडवीन व्योमपंथीं ॥ ४
राम देखुनी[4] संतोषला[5] । दास कल्याण बुद्धिवंत भला[6] ॥ ५

## ( ६ )

## प्रतापी रुद्र

( बाडांक ५२ वरून )

सुंदर कर्कश रूपी । धगधग दिव्य स्वरूपी ।
अद्भुत रुद्र प्रतापी । दानव दंडण पापी ॥ १
मंद्रातुल्य प्रतिमा । मुखारविंदी उपमा ।

---

( १ ) प्रेमें पूर – ५५, ६१, १७७३; पूर्ण पूर – ५८; ( २ ) हो–२४२; ( ३ ) जेणें – ६१; ( ४ ) देखोन – १७७३; ( ५ ) संतापला ? – ६१; ( ६ ) जाला – २४२

निशिपति राजित महिमा । अतुळ न तुळे सीमा[1] ॥ २
कुंडल कीरटी बरवी । गरगर लांगुळ फिरवी ।
ध्वजांग करें[2] वरें[3] मिरवी । अभय सुरवर धीरवी ॥ ३
कांचन चिर लंगोटी । घंटा किंकिणी दाटी ।
सामर्थ्याच्या कोटी । रुळती चरणांगुष्टी ॥ ४
प्रगटत भुभुकारें[4] । राक्षस म्हणती बा रे[5] ।
कलिमळ न थरे[6] थारे । कल्याणहृदयस्था रे ॥ ५

( ७ )

## रुद्र पूर्णावतारी

( बाडांक ५२ वरून )

वानरकुळविभूषित दिनमणी । केवळ त्रिपुरारी ॥ १
रुद्र पूर्णावतारी ॥ ध्रु० ॥
पूर्ण जळाब्धी लंघुनि सत्वर । पहात त्रिकुटगिरी ॥ २
जनकनंदिनी शोधुनि बोधिली । वंदुनि पाय शिरीं ॥ ३
समुळ काननीं निर्मुळ ते क्षणीं । आक्षे सुत मारी ॥ ४
मारुनि [7] राक्षसराज विटंबुनी । जाळित हेमपुरी ॥ ५
मुख्य प्राणनाथ स्वामी कृपावर । सुंदर मदनारी ॥ ६
द्रोण गिरीवर आणुनि मृत्सवीर । सौमित्र[8] सुख भारी ॥ ७
प्राणसंकटें[9] रक्षुनि रघुपति । आनंद सुखकारी ॥ ८
सुंदर ध्यान मनोहर मूर्ती । भाविक जन तारी ॥ ९

---

( १ ) मुळांत "भीमा" आहे, पण बाडांक ५५, ५८, ५९, ७९, १२४, २३९, २४२, २५०, ११६६ व १७७३ वरून "सीमा" घेतलें आहे. ( २ ) कविवर – २४२; ( ३ ) वीर – २३९, १७७३; ( ४ ) भुभुकारें – २३९; ( ५ ) काळ म्हणे हाका रे – १२४; ( ६ ) मुळांत "थारे" आहे, पण बाडांक १२४, २४२, २५०, ११६६ वरून "थरे" घेतलें आहे. चळे – २३९; थिरे – १७७३; धीरे तारे ७९, १०३; ( ७ ) राक्षस – ५८, मारुती – ६१; ( ८ ) सौख्य – ५८, सौख्यकारी – ६१, १७७३; ( ९ ) प्राण संकटीं – ५८, ६१, १०३, २४२, १७७३

निरउनि राघव रामउपासक । वंदित[1] वाक्य शिरीं ॥ १०

कल्याण कृपा वर पूर्ण पुरातन । हीनदीनकैवारी ॥ ११

(८)

## मारुति रघुपति आले

( वाडांक ५२ वरून )

प्रताप वदला रे वदला न वचे कोणा ॥ ध्रु०

राघवशुद्धि जाउनि बुद्धि मगरीसुतवरदानी ।
राक्षस मारुनि दधिनिधि लंघुनि महिकावतिये सदनीं ॥ १

नाटकरूपी शक्तिस्वरूपी । आपण चि होउनि ठेला ।
गोंधळ घालुन राघव[2] आणुन । बंद विमोचन[3] केला[4] ॥ २

महिविर[5] मर्दुनि भोपा रगडुनि चरणीं पीठ[6] चि केला ।
तडफड तडफड राक्षसमेळा[7] । नगरलोक हडबडिला ॥ ३

लत्ताप्रहरें कपाट फोडुनि[8] बाहेरी[9] राम विराजे ।
पळा रे पळा हनुमान आला अद्भुत बोंब गाजे ॥ ४

राक्षसवरदी शोधुनि हरदी[10] अरिकुळें[11] मारित आला ।
अहिरावण तो बाणीं जाळुनि राघव विजयी जाला ॥ ५

अहिमहि मारुनि[12] वानर घेउनि मारुति रघुपति आले ।
बिभिषण सुग्रिव तल्लीन होउनि कल्याण प्रेमें भरले ॥ ६

---

( १ ) वंदिति – ६१; ( २ ) राक्षस – २०७; ( ३ ) चि मोचन – ६१; ( ४ ) ठेला – १६३; ( ५ ) अहिविर – ५८, ६१, २०७, १७७३; ( ६ ) पिष्ठ – १०३, १६३; ( ७ ) राक्षस मेला – ५८, १०३; ( ८ ) मोडुनि – १६३; ( ९ ) बाहिर – ५५, ६१; ( १० ) अरदी – १६३; ( ११ ) मुळांत " अळिकुळ " आहे, पण वाडांक १६३ वरून " अरिकुळ " घेतलें आहे. ( १२ ) मर्दुनि – १६३;

(९)

## अंजनीबाळ कपि

(बाडांक ५२ वरून)

पाहा रे[1] पाहा अंजनीबाळ कपि ॥ ध्रु० ॥

प्रथम आवाळिला । गिळी सूर्यमंडळा । सामर्थ्ये दीर्घ रूपी ॥ १

रामलक्ष्मण । सदय हृदयघन । कल्याण आत्मरूपी ॥ २

(१०)

## मारुतीची प्रार्थना

(बाडांक ५२ वरून)

सुंदरा रे भीमा, श्रीरामा[2] दाखवी झडकरी ।

प्रताप आपुला प्रगट करी ॥ ध्रु० ॥

करुणा भाकिती[3] हरी । पडिलों तमसागरीं[4] ।

चिंतार्णवीं तारी तारी तारी ॥ १

जुत्पती बोलती वाचा । आत्मा भेटवी आमुचा ।

जीव हा व्याकुळ सकळिकांचा ॥ २

अद्भूत आवेश आला । कपिवीर सिद्ध जाला ।

अभय[5] कल्याण वदता जाला ॥ ३

# [५] श्री दत्तात्रयाचें पद

(१)

## दत्त भिक्षाहारी

(बाडांक ५२ वरून)

अत्रीनंदन वंदन जगत्रई । अनाथ दीन तारी ॥१

दत्त भिक्षाहारी ॥ ध्रु० ॥

---

(१) हो - ५८; (२) रामा - १२४, १६३, २३९, २४२, १७७३; (३) भाकित - ६१, २४२; (४) भवसागरीं - १६३; (५) अभय वर्णिता कल्याण ज्याला ॥ - १६३

सुंदर कांती सतेज मनोहर । दिगंबर वपु धारी ॥ २
सिद्ध सनातन पूर्णावतारी । विधि हरि त्रिपुरारी ॥ ३
नित्य निरंतर भागीरथी तट । नित्य नेम सारी ॥ ४
करवीर क्षेत्र मधुकर वृत्ती । योगलीळा भारी ॥ ५
अनेक पंथ ख्याति पुरातन । राहे गिरीवरी ॥ ६
श्री गुरुराज कृपाघनमूर्ती । कल्याण सुखकारी ॥ ७

## [ ६ ] श्री शंकराचीं पदें

### ( १ )

### रघुवीरमानसआरामा

( बाडांक ५२ वरून )

हर हर हर हर सुखधामा । योगींद्र सुंदर जितकामा ।
सज्जन मुनिजनविश्रामा । रघुवीरमानसआरामा ॥ ध्रु० ॥
सुरवरमंडण शुळपाणी । पिनाकपाणी शुभ वाणी ।
अगणित महिमा पुराणीं । प्रतापसिंधू गुणखाणी ॥ १
गजमुख षण्मुख निज ताता । स्मरहर भवहा भवत्राता ।
परतर पावन पददाता । भोळा शंकर हर म्हणतां ॥ २
काषा ( य ) अंबर निशाणी । दीतिकुळकंदन घमशानी ।
अखंड राहे स्मशानीं । कविवर म्हणती ईशानी ॥ ३
गिरिजावर गुरुवर सुखरासी । जन वन पावन पुण्यरासी ।
स्मरतां कर्पूरगौरासी । कल्याणदायक दासांसी ॥ ४

---

( १ ) साधु – ५८, १७७३; ( २ ) सुरवर मानुसा – ५८; ( ३ ) म्हणतां – ५८; ( ४ ) सर्वांसी – ५८, ६१, १७७३

(२)

## देवाधिदेव चंद्रमौळी

( बाडांक ५२ वरून )

वृषभारूढ जाला । कैलासाहुनी आला ॥ १

चंद्रमौळी देवाधिदेव चंद्रमौळी [1] ॥ ध्रु०

गळां रुंडमाळा । ऊर्ध पुंड्रे[2] टीळा ॥ २

चिताभस्म आंगीं । जटाधारी जोगी ॥ ३

त्रिशुळ डमरू धरी । करीं[3] खापरी धरी ॥ ४

ग्रंथशोधन कारितो । त्रैलोक्या वाटितो[4] ॥ ५

शत कोटींचें बीज । जना सांगे गुज ॥ ६

व्याघ्रांबरधारी[5] । वेष्टिला वीखारी ॥ ७

नामें[6] कल्याण करी । निवाला अंतरीं ॥ ८



## [ ७ ] श्री कृष्णाचें पद

(१)

## दीनबंधू

( बाडांक ५२ वरून )

दीनबंधू ये ये ये ॥ ध्रु० ॥

धांव पावे यादवराया । कुरवंडीन मी काया ।

तुझिया पाया । ये ये ये ॥ १

देवधीशा देवराया । [7] करुणाकारि देवा ये ये ये ॥ २

मायबापा कल्याणधामा । आत्मारामा कृष्णा हरि ये ये ये ॥ ३

---

( १ ) हा – १०३; महादेव – १६४; ( २ ) त्रिपुंड – १८६; ( ३ ) येके करीं खापरी – ५८, १०३, १६४; ( ४ ) सांगतो – ६१, १७७३; ( ५ ) मुळांत " वाघांबरधारी " आहे, पण बाडांक ५८ व १७७३ वरून " व्याघ्रांबरधारी " घेतलें आहे. ( ६ ) निज नाम कल्याणकारी " – अनंतदासांचा गाथा; ( ७ ) करुणा निधी – ५८, १०३, २४२, १७७३

(२)

## दीनोद्धारा

( बाडांक ५१ वरून )

दीनोद्धारा सुंदरा विश्ववंदना रे तूं[1] ॥ ध्रु०
गजइंद्रतारणा गणिकाउद्धरणा । अंबऋषिधृवपावना रे तूं ॥ १
गोकुळपाळा भक्तकृपाळा । गोपाळा नंदनंदना रे तूं ॥ २
कौरवकुळस्वकुळसंव्हारणा । पांडवजनप्रतिपाळणा रे तूं[1] ॥ ३
वाल्मिक व्यास कविवर वर्णिती । गोवर्धनगिरिधारणा रे तूं[1] ॥ ४
नाटक वेष विशेषे मनोहर । कल्याण भक्तमोहना रे तूं ॥ ५

[ ८ ] श्री देवाचें पद

(१)

## श्री देव

( बाडांक ५८ वरून )

सकळ कळा देव चि तूं तूं ॥ ध्रु० ॥
गणेश तूं तूं गणेश तूं तूं । सरस्वती तूं चि तूं ॥ १
श्रीगुरु तूं तूं सज्जन तूं तूं । श्रोता वक्ता तूं चि तूं ॥ २
श्रीराम तूं तूं श्रीकृष्ण तूं [3] तूं । दशअवतार तूं चि तूं ॥ ३
हरिहर तूं तूं विधिहर तूं तूं । वर कवि तूं चि तूं ॥ ४
जीवन तूं तूं त्रिभुवन तूं तूं । दासां कल्याण तूं चि तूं[4] ॥ ५

(१) मुळांत " रे तूं " नाहीं, पण ते बाडांक १०३ व १७७३ वरून घेतलें आहे. (२) मुळांत " विशेष " नाहीं, पण बाडांक ५८, १०३ व १७७३ वरून तें घेतलें आहे. (३) मुळांत " चि " आहे, पण १७७३ त " चि " नाहीं. (४) मुळांत " तो " आहे, पण १७७३ वरून तूं घेतलें आहे.

## [ ९ ] श्री समर्थांचीं — श्री गुरुंचीं पदें

### ( १ )

### मम स्वामी

( बाडांक ५२ वरून )

मज तो आवडतो[1] मम स्वामी । निशिदिनीं अंतर्यामीं ॥ ध्रु० ॥
अक्षै पदाचा सुखदाता । निरसोनी माया ममता ॥ १
भक्तीमार्गाच्या गजढाला । चालवीळ्या[2] आढाला ॥ २
काये बोलों[3] मी कीर्तीसी[4] । न दिसे तुळणेसी ॥ ३
छेत्र बहुताचें दासाचें । धांम[5] चि कल्याणाचें ॥ ४

### ( २ )

### स्वामी माझा

( बाडांक ५२ वरून )

साधू रे धन्य साधू रे ॥ ध्रु० ॥
सकळ चराचर त्रिवीध देवा । समान अंतरीं वेदू रे ॥ १
षड्‌रिपूचा संव्हार करूनी । दासासी केला बोधू[6] रे ॥ २
पंचभूतादि त्रिगुण माया । समूळ शोधिला शोधू रे ॥ ३
अहं सोहं हें गिळोनि ठेला । विवेक परमानंदू रे ॥ ४
षड्‌गुणईश्वर तो[7] स्वामी माझा । कल्याण कृपासिंधू रे ॥ ५

### ( ३ )

### स्वामी माझा योगी

( बाडांक ५२ वरून )

पतितपावन पावन योगी स्वामी माझा ॥ ध्रु० ॥
अनंत प्राणी जनीं । योगी जाहले मुनी ।
कथानिरूपणीं मननीं । लीन जाले ॥ १

---

( १ ) आठवतो – २४२, १२३५, १२५३; ( २ ) ल्या – १२३५, १२५३; ( ३ ) वर्णू – १२३५, १२५३; ( ४ ) महिमेसी – १२५३; ( ५ ) नाम – ६१, २०७, १७७३; ( ६ ) वेधू – २४२; ( ७ ) तूं – ७९, १०३

व्यापिलें हें भूमंडळ । कवित्वकळा तुंबळ ।
विवरतां केवळ । मोक्ष लाभे ॥ २
नरनारी तटस्थ । अर्थ[1] पाहाती समर्थ ।
येमपुरी ठेली वेर्थ । कलियुगीं ॥ ३
कीर्ति ऐकतां पापी । जाले अनुतापी ।
दर्शनें पुण्यस्वरूपीं । सिद्ध जाले ॥ ४
वेदगर्भा प्रगटेवीले[2] । बहुतां कळेसें केलें ।
पाषांडाते भ्रष्टविलें । नीतिन्यायें ॥ ५
मोक्षश्रिया आलंकृत । जाले संतमहंत ।
पाहोनी शरण येत । नाना मतें ॥ ६
ज्ञान वैराग्य भजन । स्वधर्म रक्षण ।
म्हणोनी [3] अवतारी जाण । योगमूर्ती ॥ ७
न कळे कैसा तो महिमा । न कळे कीर्तीची सीमा ।
बुद्धि निधी शेष नामा । काय जाणे ॥ ८
दासा कल्याण केलें । निज धाम दाखवीलें ।
श्रुतिशास्त्रां ठक पडिले । मौन्यरूपें ॥ ९

( ४ )

## स्वामी माझा योगीराजा

( बाडांक ५२ वरून )

स्वामी माझा योगीराजा आवडतो हृदयीं ।
दिवसरजनी न गमे जनीं नावडे कांहीं ॥ ध्रु०
आदिशक्ती परमेश्वर[4] षड्गुण ईश्वरें[5] ।
त्याचें अंतर परात्पर शुद्ध विचार ।

---

( १ ) मुळांत " अर्थ " नाहीं, पण बाडांक ५८, ६१, १०३, २४२ व २५० वरून हा पाठ घेतला आहे. ( २ ) प्रगटले – १०३, २४२; प्रगटिलें – २५०, १७७३; ( ३ ) त्रि ५८; ( ४ ) मुळांत " परमेश्वरी " आहे, पण बाडांक १७७३ वरून " परमेश्वर " घेतलें आहे. ( ५ ) री – ६१;

योगेश्वर अपरांपर तो चि अवतार ।
हीन दीन जना करी पावन माझें माहेर ॥ १
अध्यात्मखाणी ग्रंथ वाणी वदोन गेली ।
न कळे महिमा न गणे[१] सीमा काये बोलिली ।
भक्तमंडळी भूमंडळीं कोणें मोजिली ।
उत्तम मूर्ति अपार कीर्ति विश्वीं दुमदुमिली ॥ २
करुणानिधी[२] करुणाकरें कृपें पाहिलें ।
बद्ध मुमुक्षु साधक सिद्ध होऊनी ठेले ।
जडमूढ प्राणी चरणस्पर्शें कल्याण जाले ।
माया ममता विवरुनि पहातां निज पद लाधले ॥ ३

## ( ५ )

## योगीरायाची भेटी

( बाडांक '५२ वरून' )

अलभ्याचा हा लाभ थोर जाला । विश्वजनासी उपेगा आला ।
कीर्तिरूपें चि[३] विस्तारला । दाही दिशा भरोनि पुरवला[४] । गे बाईये ॥ १
स्वामी तो[५] आठवे [६][७] मनीं । नित्य बोलतां चालतां जनीं ।
स्वप्न सुषुप्ती जागृति मौनीं । खंड नाहीं च अखंड ध्यानीं । ग बाईये ॥ ध्रु०
भक्ति प्रेमाचें तारूं उतटलें । ज्ञान वैराग्यतीरीं लागलें ।
संतसज्जनीं साठवीलें । हीनदिनासी ते ही उद्धरिले ! ग बाई ॥ २
ज्याच्या गुणासी नाहीं गणना । ज्याच्या कीर्तीसी नाहीं तुळणा ।
जो[८] स्वयंभू श्रीगुरुराणा । ब्रह्मादिकांसी बुद्धि[९] कळेना । ग बाई ॥ ३
धर्मस्थापना स्थापियेली । न्यायनीतीनें भक्ति वाढविली ।
संतमंडळी ते निवाली । बहु दास ते भूमंडळीं । गे बाई ॥ ४

---

( १ ) कळे – १६३; ( २ ) करुणानिधे – १६३; ( ३ ) जीव – ६२५; ( ४ ) उरला – ६२५; ( ५ ) तूं – २०७, २४२; ( ६ ) तो – १०३, २४२; ( ७ ) मनीं – ७६, १०३, २४२; ( ८ ) तो हा – ६२५; ( ९ ) दुर्लभ जाणा – ६२५

जन्मजन्मांतरीं पुण्यकोटी । बहु सांचित होतें गांठीं ।
योगीरायाची जाली ज्यास भेटी । त्यांस कल्याण होये सृष्टी ॥ ५

## ( ६ )

## रामदासस्वामी जई आनंदुघन भेटे

( बाडांक १४२ वरून )

सुखरूप जालों स्वामी तुमचीया पादसेवे ।
कल्याण माझें जालें रंगळों सोहंभावें ॥ ध्रु०
चित्त हे वृत्ती माझी चैतन्यीं मुराली ।
संतोषें स्वात्मसुखी अनुभव किल्ली दिली ।
निर्विकल्प वास जाला अनुभव केवळ बोली ।
विश्व हें नाहीं अवघे श्रीराम स्वरूपीं पाही ॥ १
पावलों धांवलों देवा तुमचीया सेवाबळें ।
वेदांतश्रुती ज्यासी निर्विकल्प बोलती बोलें ।
ते मी स्वयंभ जालों हे शब्द मावळले ।
मीपण तूंपण अवघे स्वामी गिळुनी उगले ठेले ॥ २
रामावीण वृत्ती माझी आणिक न जाय कोठें ।
जिकडे पाहे तिकडे श्रीराम माझा भेटे ।
कल्याण म्हणे सकळ द्वैतपण जेथें आटे ।
रामदासस्वामी जई आनंदुघन भेटे ॥ ३

---

(१) सर्व – २०७; (२) "होये सृष्टी" ऐवजीं "कल्पकोटी" – ७९ (३) बोलूं – १६३ १२६२; बोल – २०७; (४) मुळांत "विराम" आहे, पण बाडांक १६३ वरून "श्रीराम" घेतलें आहे. (५) "हे शब्द मावळले" हे तीन शब्द मुळांत गळाले आहेत, पण ते बाडांक १६३ व २०७ वरून घेतले आहेत. (६) मुळांत पुन्हां "सकळ" आहे, पण बाडांक १६३, २०७, व २६२ वरून "जेथें" घेतलें आहे. वास्तविक "तई" असतें, तर बरें होतें नाहीं ?

## ( ७ )

## धर्मसंस्थापक दीनबंधु

( बाडांक ५८ वरून )

हरिजन संसारा आले रे । दीनबंधु संसारा आले रे ।
भक्ति हरीची कीर्ति हरीची । धर्म चि स्थापक जाले ॥ ध्रु० ॥
धर्म कलीचे चकीत ठेले । कीर्तनीं राघव डोले ॥ १
श्रोते वक्ते राम चि जाले । रविसुत मार्ग न चाले[1] ॥ २
काव्यप्रबंदी अनुभव धाले । वेद चि अवतरले ॥ ३
चिन्मय तीर्थीं पावन जाले[2] । जग चि उद्धरिलें ॥ ४
सेवक ज्याचे कल्याण जाले । ब्रह्मानंदें कोंदले ॥ ५

## ( ८ )

## सज्जनाचा वेध

( बाडांक ५२ वरून )

बाईये गे मजला वेधु लागला सज्जनाचा ।
विजय जहाला या सुमनाचा ॥ ध्रु० ॥
ज्याचे कीर्तीचा ठसा । महिमा वर्णूं मी कैसा ।
तीर्थे वंदितीं[3] चरणशेषा ॥ १
त्यांच्या[4] चरणाची माती । वंदिन मी दोहीं हातीं ।
मग मी पावन निजपदप्राप्ती[5] ॥ २
त्यांच्या[6] दासांची दासी । होईन मी त्यांची दासी ।
पतीतपावन भवभय नासी ॥ ३
कृपा कल्याण ज्याची । चुकवी संसारचीची ।
वारी बोहरी या[7] जन्माची ॥ ४

---

( १ ) मुळांत “ चले ” आहे, पण बाडांक १०३ व १७७३ वरुन “ चाले ” घेतलें आहे. ( २ ) केलें – १७७३ ( ३ ) इच्छिती – १०३, ३९९, १७७३ ( ४ ) ज्याच्या – ६१, १३२, १७७३; ( ५ ) सुख – ३९९ ( ६ ) ज्याच्या – १३२ ( ७ ) “ या जन्माची ” ऐवजीं “ जनन-मरणाची ” – ५८

( ९ )

## कल्याणदायक सर्वांसी

( बाडांक ५२ वरून )

परतर परवर श्रीरामा । अगाध महिमा गुरु गरिमा ।
श्रुतिपर पर तूं परब्रह्मा । भवहर[1] हर तूं विश्रामा ॥ ध्रु० ॥
मोक्षपाणी मम वीशा । श्रीगुरुस्वामी मुळपुरुषा ।
षड्गुणईश्वर सर्वेषा । भवहर हर तूं वरईशा ॥ १
अमुची बोळी देवाची । पतीतपावन सर्वांची ।
वर वरदायक जीवाची । प्रचीत पदवी शीवाची ॥ २
कृष्णावेण्यातिरवासी । सज्जनपर्वतनीवासी ।
सुरवर वांछिति देवासी । कल्याणदायक सर्वांसी ॥ ३

( १० )

## सर्व कल्याण त्याचिये पायीं

( बाडांक ५२ वरून )

ज्यासी दीनबंधू नाम हें साजे । ज्यासी देहीं च देवपण गोंजे[2] ।
ज्ञानवैराग्यसंपन्न राजे । ज्याच्या[3] दर्शनें चिन्मय पुण्य माजे ॥ १
गे बाईये[4] आवडी तयाची मज मोठी । चित्तीं अखंड पडिली मिठी ।
संतें[5] जनांची[6] बहु उंच[7] कोटी । कृपादृष्टी तारिल्या भक्तकोटी ॥ ध्रु०
ज्याचा परमार्थवृक्ष अंकुरला । शाखापल्लवीं विस्तारला ।
नवविधा प्रकारें मोहुरला । शुद्ध निःकाम भजनें फळा आला ॥ २
ज्याची अपार धारणा धृती[8] । ज्याची वेदांत काव्यसंमती ।
ज्यांची[9] अगम्य न गमे गती । ज्यांचीं चरित्रें सर्वत्र गाती गीतीं ॥ ३

---

( १ ) विधिहर – १८६ ( २ ) साजे – ५५४; ( ३ ) ज्यासी देखिल्या – ७८८; ( ४ ) मुळांत " ये " नाहीं, पण बाडांक ५८, ६१, ६२, ७६, ७९, १०३, १२३, १३५, १८६, २४२ व १७७३ वरून तो घेतला आहे. " गे बाईये " ऐवजीं " रे सखया " – ५५४ ( ५ ) साधु – ५५, ५८, १३२, ७८८; ( ६ ) सज्जनाची – २०७, २४२; ( ७ ) उत्कट – १२३, ( ८ ) मती – ५५४; ( ९ ) ज्यासी – १६३

सर्व तीर्थांचें तीर्थ ते[1] साधु । सर्व देवांचा[2] देव ते[1] साधु ।
अग्रपूजेसी वंद्य ते[1] साधु । सस्वरूपाचे मायबाप [3] साधु ॥ ४
ज्यासी मुळींच मीपण नाहीं । ज्यासी[4] समान देखणें देहीं ।
जेहीं[5] आपणांस सेविलें[6] ठाँयीं । सर्व **कल्याण** त्याचिये पायीं ॥ ५

## ( ११ )

## पतीतपावन साधु

( बाडांक ५८ वरून )

ग बाईये पतीतपावन साधू । चित्तीं अखंड लागला वेधू ।
मायाअविद्यातीत निजबोधू । ज्याचे हातीं वसे गोविंदू ॥ ध्रु० ॥
संतसंगाचा महिमा मोठा । लक्षचौऱ्यांसी दिधला फांटा ।
भवरोगासी लाविले वाटा । भावभजनें भरिल्या पेठा ॥ १
रामनामाचें केणें उघडें । देतां घेतां अधिक चि वाढे ।
भाग्यसंचित असतां घडे । तेथें न चले कुडे पवाडे ॥ २
स्वानुभवाचा कौल पिकला । सर्व **कल्याण** उदयो जाला ।
लुलुममताचंद्र मावळला । षड्रिपुसी पळ सुटला ॥ ३

## ( १२ )

## गुरुदेव देवा

( बाडांक ५२ वरून )

नेति नेति श्रुति म्हणताती । पार न कळे तुझा किती ॥ १
गुरुदेव देवा हा हा ॥ ध्रु० ॥

---

( १ ) तो – ७६, २४२; जे – १३२; हे – ७८८; ( २ ) देवांचे – १८६, ७८८, १७७३; ( ३ ) ते हे – ७८८; ( ४ ) ज्याचें – २०७; ( ५ ) देहीं – १३२; नाहीं – ५५४; ( ६ ) ठेवियेले – १६३; ठेविले – ७८८; ( ७ ) नाहीं – १८६ ( ८ ) भावें – २६१; मुळांत " भव " आहे, पण बाडांक १०३ तरून " भाव " केलें आहे. ( ९ ) वांकुडें – १०३

आगमनिगम गती । शेषविशेष स्मृती[1] । आकळ न कळे तुझी स्थिती ॥ २
जीवन सज्जनाचें । धाम कल्याणाचें । अधिष्ठान निज पद साचें[2] ॥ ३

( १३ )

## श्री गुरुराया

( बाडांक ५२ वरून )

जय[3] जय जी [4] श्री गुरुराया । श्री गुरुराया ॥ ध्रु० ॥
अजरामरा अलक्ष अपारा । वाईन मी निजपदीं काया ॥ १
नित्यानंदा नित्य परिपूर्णा । निरसी दुर्घट माया ॥ २
सकळ चराचर मुनिवरें[5] सुरवर । चिंतिती[6] तुझिया पाया ॥ ३
ऋद्धिसिद्धि दासी होउँनि मुक्ति तिष्ठताती । पावावया तुझिया ठाया ॥ ४
कल्याण दासा[9] हृदयनिवासा[10] । भावितसे[11] प्रेमछाया ॥ ५

( १४ )

## श्रीगुरुचरणीं चित्त लावी

( बाडांक ५२ वरून )

श्रीगुरुचरणीं चित्त लावी रे बापा ॥ ध्रु० ॥
माझें माझें बकतोसी । वाया वीण थींकतोसी[12] ।
घडी घडी काळ टप लावी रे ॥ १
द्रव्य दारा गारा सारा । सर्वांसी पाहिजे थारा ।
शेवट हे माया मोकलावी रे ॥ २

---

( १ ) स्फूर्ति – ५८ ( २ ) पदाचें – ५८; पदीं साचें १०३, २४२ ( ३ ) जय जय जय – ११९१ ( ४ ) हो – १४३, २३९ ( ५ ) विधिहर – १६३, २३९ ( ६ ) वंदिति – ५८, १६३, ११९१ ( ७ ) दोनी – १४३ ( ८ ) निजपदीं – १४३ ( ९ ) दासी – १०३, २४२ ( १० ) हृदय-निवासी – २४२; ( ११ ) करी कृपेची छाया – ११९१; ( १२ ) किकतोसी – २०७

चक्रवती आले गेले । नेणो जीव किती मेले ।
बुद्धी हे अंतरीं निवळावी[1] रे ॥ ३

येथुनिया तेथवरी । शाश्वत कल्याण हरी ।
पांच हि पंचकें निवेदावीं[2] रे ॥ ४

( १५ )

## श्रीगुरुवाक्य प्रमाण

( बाडांक ५२ वरून )

श्रीगुरुराजपदांबुजभजनीं । कायिक वाचिक मनें[3] दिनरजनी ॥ १
पतीतपावन तो । मानवसज्जनजीवन तो ॥ ध्रु०[4] ॥
ब्रह्म परात्पर श्रीगुरुमूर्ती । भावी निरंतर अंतरवृत्ती[5] ॥ २
दारासुतगृह श्रीगुरुचरणीं । कविवर वदले तैशी च करणी ॥ ३
कर्मउपासक श्रीगुरुवचनीं । भजनविधीपर वैभवरचनीं ॥ ४
श्रीगुरुवाक्य प्रमाण जयासी । वरद हरिहर कल्याण त्यासी ॥ ५

( १६ )

## श्री गुरुराजया

( बाडांक ५२ वरून )

श्री गुरुराजया माझिया स्वामी दीनबंधू ॥ ध्रु० ॥

लिंग देहे मोठे खोटे । वज्रघायें न तुटे [6] फुटे ।
अवलिळा चरणस्पर्शें केला छेदू ॥ १

भव वारी वारी स्मरणें । जडमूढालागी तरणें ।
जन्मासी येणें मरणें नाहीं खेदू ॥ २

---

( १ ) विवरावी – ५८, १७७३; ( २ ) निवळावी – २०७; ( ३ ) अनुदिनरजनी – २४२; ( ४ ) पतीतपावन तो मानव । सज्जन जीवन तो मानव ॥ ध्रु ॥० – ५८, ६१; ( ५ ) स्थिती – २४२; ( ६ ) न – २४२, १७७३;

परतर[1] वर कल्याण देवा। हीन दीन जन पावन देवा।
सज्जन[2] हृदयांतर ठेवा[3] तुझा वेदू ॥ ३

## ( १७ )

## सद्गुरु स्वामी

( बाडांक ५२ वरून )

कृपासिंधु[4] सद्गुरुराजमूर्ती। तुझा पार न कळे वेदश्रुती।
बोलों जातां म्हणती नेति नेती। तुझ्या ध्यासें अनंत सिद्ध होती ॥ १
जय रामा आराम[5] निजधामा। हरादिक चिंतिती तुज[6] रामा।
ब्रह्मानंदें डुल्लती अंतर्यामा। काये जाणे[7] मानव तुझी[8] सीमा ॥ २
दिनानाथ हें थोर ब्रीद गाजे। तेणें मानसीं परम[9] सुख माजे।
गुरुस्वामी[10] पातले हृदयसेजे। नाम कल्याण घोष टाळी वाजे ॥ ३

## ( १८ )

## श्री गुरु कल्याणस्वामी

( बाडांक ५२ वरून )

पाहा हो[11] पाहा हो[12] सये पाहा हो[12]। संगातीत निजसुख लाहा वो[13] ॥ध्रु०
मीपण तूंपण सर्व मेळउनि गुणागुण। सद्गुरूंचे[14] पदीं[15] आधीं वाहा वो[13] ॥ १
अमळ विमळ ब्रह्म सर्वगत सदोदित। साक्षिणीचें मूळ निरसाहा[16] वो ॥ २
श्रीगुरु कल्याणस्वामी पाववितो निजधामीं। मौन्यगर्भा[17] शोधुनियां राहा वो[13] ॥

---

( १ ) पर – ६१, १६३; ( २ ) सज्जन जन हृदयांतर – ५८, १०३, २४२, १७७३; ( ३ ) ठेवा – १६३; ( ४ ) करुणासिंधू – २०७; ( ५ ) हा राम – २०७; ( ६ ) निज – १३५; ( ७ ) नेणे – ६१, जाणेल – १८६; ( ८ ) तुझा महिमा – २०७; ( ९ ) प्रेम – १३५, २०७; ( १० ) सद्गुरु स्वामी – २०७; ( ११ ) वो – ७९; ( १२ ) वो – ५८, ६१, ७९, ८७, १०३, १२४, १२८, १७७३; ( १३ ) वो वो – ५८; हो – २४२; ( १४ ) श्रीगुरुपदीं – ६१, १७७३; ( १५ ) पायीं – १२०९; ( १६ ) निरसा – ५८, ६१; ( १७ ) मौन्यगर्भ धरुनिया राहा हो – १२०९.

( १९ )

## दर्शनें अपार पुण्यलाभ

( बाडांक ५८ वरून )

जे अक्रोध [1] महानुभाव । योग वैराग्य छत्रपतीराव ।
ज्यांच्या मतें हा बद्ध मोक्ष वाव । ज्यासी श्रुति म्हणती गुरुराव [3] ॥ १
रे सखया सज्जन दुर्लभ रे । ज्यासी बोलिजे सिद्ध स्वयंभ ।
जे भाविकासी अतिसुलभ [2] । ज्याच्या दर्शनें अपार पुण्यलाभ ॥ ध्रु०
भक्ति विलसती इंद्रियानंदें । शांतिक्षमेसी सुटली दोंदे ।
भूतकृपा सर्वत्र सम नांदे । जन संतुष्ट कीर्तिमकरंदें ॥ २
दृश्य पदार्थ निर्लोभ ज्यासी । जे दानशूर निज वस्तूसी ।
थापें मारिले भये शोकासी । कृपा **कल्याण** दीन जनासी ॥ ३

( २० )

## नमन श्रीगुरुपाया

( बाडांक ५८ वरून )

नमन श्रीगुरु निज पायां । साधक तारक उपाया ।
संकट दुर्घट अपाया [4] । सोहं हंसा खुण पाया ॥ ध्रु० ॥
पतीतपावन ब्रीद गाजे । श्रवणें निर्भय मन माझें ।
भाविक सात्विक सुख माजे [5] । षड्रिपुमंदिर मग लाजे ॥ १
कृपाअंजने लेउनियां । ब्रह्म परात्पर होउनियां ।
सज्जनपदरज सेउनिया । अष्टै काया निरसुनियां ॥ २
अपार महिमा गुरुराया । बद्ध [6] भवार्णव उतराया ।
**कल्याण** अनुभव विवराया । अनाथ हीन दीन उद्धराया ॥ ३

---

( १ ) स्वयें – १०३, १७७३; ( २ ) मुळांत " दुर्लभ " आहे. पण बाडांक १०३ वरून " सुलभ " घेतलें आहे. ( ३ ) गुरुदेव – १७७३; ( ४ ) उपाया – २४२; ( ५ ) मुळांत " माझें " आहे. पण बाडांक २४२ वरून " माजे " घेतलें आहे. ( ६ ) मुळांत " बंद " आहे, पण बाडांक २४२ वरून " बद्ध " घेतलें आहे.

## ( २१ )
## देवामध्यें देव
( बाडांक ५२ वरून )

देवाधिदेव मुख्य प्राप्तीचा नरदेह ठाव । तयासी नेणतां[1] वेर्थ जाये रे ॥ १
जन्मुनी साधिलें सार काये रे । मिथ्या भूत माया सर्व पाहे रे ॥ ध्रु० ॥
सर्व देवामध्यें देवें तो हा संसारीं श्रीगुरुराव । कां रे अव्हेरिले त्याचे पाये रे ॥२
पूर्ण ब्रह्म सदोदित नित्य शाश्वत संचली खूण । टाकेना कल्याण पदठाय रे ॥

## ( २२ )
## तो चि तो साधव रे
( बाडांक ५२ वरून )

तो चि [2]तो साधव रे । सखया बोधक माधव रे [4] ॥ ध्रु० ॥
प्रपंच लटिका निर्फळ दावी । सर्व भूतांतर अंतर भावी ॥ १
स्वधर्मकर्मी शुद्ध क्रिया करी । भूत कृपाघन[5] दीनास तारी ॥ २
ब्रह्मचर्यव्रत निस्पृहधारी । ब्रह्मस्थितिवर भिक्षाहारी ॥ ३
शांति छत्रपति निशाण फडके । उत्तम कीर्ति दुंदुभि धडके ॥ ४
मर्दुनि षड्रिपु भजनविलासी । सुखरूप भवभय कल्याणरासी ॥ ५

## ( २३ )
## कल्याण जपतो निशिदिनीं तो
( बाडांक ५२ वरून )

साधवपायीं । रत कांहीं साधका ॥ ध्रु० ॥
निर्विकारी देव मोठा । त्याची प्रतिमा नाहीं उपमा ।
साधुरूप पाही । रत कांहीं साधका ॥ १
मायातीतू[6] ब्रह्ममूर्ती । आशारहितू पाशारहितू ।
साधुरूप पाही । रत कांहीं साधका ॥ २

---

( १ ) म्हणतां – १६३; ( २ ) थोर – ६१, १०३, १६३, २४२, १७७३; ( ३ ) तूं – १६३; ( ४ ) सखया – १७७३; ( ५ ) दयाघन – १६३; ( ६ ) मायातीत तूं – १०३;

मोक्षपाणी भवरिपु तो । कल्याण जपतो निशिदिनीं तो ।
साधुरूप पाही । रत कांहीं साधका ॥ ३

( २४ )

**आलख जागे**

( बाडांक ५८ वरून )

आलख जागे[1] गुरु[2] गोरख जागे[1] ॥ ध्रु० ॥
आलखनिरंजन भाव न भावे । सब घट व्यापक आलख जागे ॥ १
जो कोउ राखे गोजीदीयाकू । सो ही गोरख आलख[3] जागे ॥ २
मनकी जोगिणी[4] समजत बुझे । नाथ निरंजन कल्याण जागे ॥ ३

[ १० ] श्री गुरुकृपा – गुरुसेवा

( १ )

**गुरुकृपा**

( बाडांक ५२ वरून )

रे सज्जना ऐके तूं माझया मना । दत्त माचिंद्र गोरक्षी जाणा ।
व्यास वसिष्ठ जय मुनिराणा । गुरुकृपे पावले निरंजना ॥ ध्रु० ॥
ब्रह्मादिकां दुर्लभ रामपाये । तेथें मानवी बापुडे केवी जैये[5] ।
मत्तामत्ता विरोध वाद पाहे । शास्त्रें भांडतीं न पडे ठायीं सोये ॥ १
गुरुकृपा वरदवर ज्यासी । रामपदीं मिळणी सीघ्र त्यासी ।
सिद्धिसामर्थ्य कोण पुसे यांसी[6] । गुरुकृपे अगम्य पुण्यरासी ॥ २
बरें शोधिलें आगमनिगमांला[7] । जिवा शिवा संगम[8] उगमालें[9] ।
माया अविद्या गलबला निर्गमळीं[10] । विनवी कल्याण सज्जनसुगमाला ॥ ३

---

( १ ) ज्यागे – २४२; ( २ ) गुरुजी – २४२; ( ३ ) मुळांत " आलख जागे " नाहीं, पण बाडांक १०३ व २४२ वरून तें घेतलें आहे. ( ४ ) जोगीण – २४२; ( ५ ) जाय – ५८, २६१, जाये ६१, ७६, १०३, १२४, ४४५, १७७३; ( ६ ) त्यासी – १७७३; ( ७ ) निगमासी – ६१; ( ८ ) सुगम – १२४; सज्जन – २६१; ( ९ ) उगमासी – ६१; ( १० ) निर्गमाला – २४२;

## ( २ )

## नवविधा दुभतें घरीं

( बाडांक ५२ वरून )

माधव तारी भाविकासी ॥ ध्रु० ॥

अजामेळ अनुतापी । नारायण नामोच्चारी ।
निजपुत्रा पढवी हरी । आरुढ विमाना परिवारीं ॥ १
पापिणी कुंटिणी शुका । रघुपती पाचारी ।
बैसोनि पुष्पकांतरीं । दीनबंधु दीन अंगिकारी ॥ २
वेश्या पिंगळा नारी । विरक्त विषयावरी ।
चढोनी वैकुंठगिरी । रविसुतदुत[1] मारामारी ॥ ३
कलियुगीं संतमुनी । ब्रह्मनिष्ठ भजनांतरीं ।
अनुदिनीं कीर्तनगजरीं । हरिहर भासे जगदाकारीं[2] ॥ ४
गुरुकृपा वरद ज्यासी । भजनें कल्याण करी ।
नवविधा दुभतें घरीं । भयातीत निर्भय भिक्षाहारी ॥ ५

## ( ३ )

## गुरु सेवी रे

( बाडांक १७४२ वरून )

ब्रह्म वैराग्य लक्षण । सिद्ध साधका कथन ।
किती बोलती ते जन । आम्ही वैरागी ॥ १ ॥

॥ गुरु सेवी कां रे रे ॥ ध्रु० ॥

गुरु सेवी कां सत्वर । झणी लाविसी उशीर ।
गुरुभजन प्रकार । आहे सर्व हि सिद्ध ॥ ७ ॥
नाहीं मत्स्यासि भक्षिलें । मद्या नाहीं जो प्राशिले ।
कन्ये नसतां भोगिलें । वेश्ये आलिंगन ॥ २ ॥
माता नाहीं वधियेली । गौ नाहीं भक्षियेली ।
तेहीं डोई जे मुंडिली । नव्हे योगेश्वर ॥ ३ ॥

---

( १ ) बाडांक १७७३ त " दुत " नाहीं. ( २ ) जगदांतरीं – १७७३;

योगाभ्यासाचें लक्षण । हे जो नाहीं पै साधन ।
तेहीं वेर्थ चि बोलणें । आम्ही वैरागी ॥ ४ ॥
नव्हे इतुकें साधन । असो येक तर्‍हीं चिन्ह ।
तया किंचित बोलणें । शोभे वैरागी ॥ ५ ॥
नाहीं येक हि ज्या योग । तें तो सहज चि अभाग्य ।
त्याचें स्मशानवैराग्य । शब्द लोकोत्तर ॥ ६ ॥
आत्मनिष्ठा लोकोत्तर । साध्य साधावें सत्वर ।
मग बोलावें उत्तर । शोभे वैरागी ॥ ७ ॥
नव्हे सत्संगावाचुन । श्रीगुरूचें दर्शन ।
गुरुवांचुनी साधन । नव्हे **कल्याण** ॥ ८ ॥

( ४ )

## जीवाचें कल्याण

( बाडांक २०७ वरून )

बा रे करी तूं साधन । गुरुपदीं होय लीन ॥ १
नको गुंतूं तूं संसारीं । मुखें[२] राम तो उच्चारी ॥ २
सदा रामध्यान करी । होयें[१] विषयांचा वैरी ॥ ३
ऐसें साधन होय ज्याचें । हें चि **कल्याण** जीवाचें ॥ ४

## [ ११ ] नाममहिमा

( १ )

## नाममहिमा

( बाडांक ५२ वरून )

अनाथहीनदीनपतितपावन नाम तुझें[३] ।
जडमूढतारण शतकोटीकारण वाणी कुजे[३] । वाल्मीक ॥
अविधी अपसव्य कविवर तो भव्य काव्य माजे[३] ।

( १ ) होय विषयाचा वैरी–२०७; ( २ ) मुखें राम तो उच्चारी–२०७;
( ३ ) दयाळा – १३२

विधिहर वंदिती त्रिभुवनपद्धती घोष गाजे । कीर्तनीं ॥ १
सोपें [1] सुगम पवित्र परिकर सौख्यकारी ।
परवर परब्रह्म चिदानंदपददानी निर्विकारी । नाम हें ॥
आजाती नीच याती वर्णावर्ण स्थिती अंगिकारी ।
गुणीजन मुनिजन जनवन सज्जन पुण्यकारी । नाम हें ॥ २
सहस्रनामातुल्य समतुल्यमहिमा कोण जाणे [2] ।
मावर सुंदर पुरहर ध्यातसे तो चि जाणे । महिमा ॥
तो वर वहन कल्याण गहन खूण बाणे ।
अष्टमा ही जरी बोळल्या क्षणभरी पाहु नेणें । त्याकडे [3] ॥ ३

## ( २ )

## जन्माचें सार्थक

( बाडांक ११४ वरून )

श्री रामाचें, जय रामाचें । जय जय रामाचें ।
ध्या रे ध्या तुम्ही नाम या श्री रामाचें ॥ ध्रु०
आसनीं शयनीं गमनागमनीं । सांडुनि भान कामाचें ॥ १
तारक याविण न दिसे कांहीं । बंधन नाहीं येमाचें ॥ २
[4]रामकल्याण विनवी भावें । सार्थक होईल जन्माचें ॥ ३

## ( ३ )

## नाम जपतां कल्याण अहर्निशीं

( बाडांक ५२ वरून )

जग जगासी गुंतलें कामा । निजानंदा जि पूर्ण घनशामा ।
तुझें नाम गाईन पूर्णकामा । तुजवीण न येती कोणी कामा ॥ १

---

( १ ) हें – १२४; ( २ ) महिमा – १३२; ( ३ ) पाहू नेणे – १३२; ( ४ ) " रामकल्याण " कोण ? कल्याणांचें समजून हें पद उतरलें खरें, पण, न जाणो, कल्याणांचे शिष्य, बारामती येथील मठपति, रामाजी दादा यांचें तें असावें.

विधिसुत वाल्मिक साक्ष ते ही । ध्रुव प्रल्हाद अंबऋषी पाही ।
तीर्थांव्रताची फळश्रुती पाही[1] । रामनामें पवित्र पुण्य देहीं ॥ २
बिभीषण विदुर नीच याती । निज ध्यासें वैष्णव धर्ममूर्ती ।
अजामीळ कुंटणी नीच वृत्ती । नाम घेतां उत्तम थोर कीर्ती ॥ ३
व्यासवसिष्ठहरादिक ख्याती । संतवृंदें कीर्तनीं गर्जताती ।
नामस्मरणें उत्तम पदप्राप्ती । नामनिष्ठे कामना पूर्ण होती ॥ ४
सर्व सिद्धी त्या सर्व काळ दासी । काय बोलों मी कोण महिमेसी ।
नाम जपतां कल्याण अहिर्निशीं । दीनापाशीं तिष्ठतु हृषीकेशी ॥ ५

( ४ )

## नामरुपाची करा तुम्ही लुटी

( बाडांक ५२ वरून )

नारद वीणा वाहे गगनीं । घोर मंद्र तार रुणझुणी ।
तंत ऐकों येती श्रवणीं । धन घमंडे[3] करितो मुनी ॥ १
देवा[4] तूं तूं तूं तूं [5] ॥ ध्रु० ॥
परा पश्यंती मध्यमा नादें । वैखरी ते नाचती[6] छंदें ।
सोहं जप होतो[7] ब्रह्मानंदें । ताळ तोडिला तत्त्वबोधें ॥ २
देवाभक्तांची जाली थोर भेटी । काय सांगों मी तेथींच्या गोष्टी ।
नामरुपाची करा तुम्ही लुटी । मग कल्याण कल्पकोटी रे ॥ ३

( ५ )

## रामनामाचें भांडार लुटा

( बाडांक ११९१ वरून )

रामनामाचें भांडार लुटा । काळ गिळोन टाका गटगटा ॥ ध्रु० ॥
कीर्तनरंग भरला मोठा । येकमेकासी स्वानंद भेटा ॥ १

---

( १ ) कांहीं – १०३, २४२; ( २ ) मुळांत " बोली " आहे पण बाडांक ५८, १०३, २४२ व १७७३ वरून " बोलो " घेतलें आहे. ( ३ ) घमंडी – १७७३; ( ४ ) अरे देवा – ५८, ६१, १७७३; ( ५ ) रे – १०३; ( ६ ) नाचवी – ५८; ( ७ ) होताहे – ६६;

लाज सांडोनी मारी हाक मोठा । नामबळें फोडूं काळपोटा ॥ २
साधुसंतासी अवळोनी भेटा । मग कल्याण नांदा वैकुंठा ॥ ३

## ( ६ )

## हरिस्मरणें चुकतीं जन्ममरणें

( बाडांक ५२ वरून )

हरिस्मरणें रे चुकतीं जन्ममरणें रे ॥ धृ० ॥
उगम[1] दुर्गम तीर्थे सरिता । जन्म चि ने[2] पुरे पृथ्वी फिरतां ॥ १
वर्णाश्रम गुरु ब्राह्मण पुजितीं । ते[3] पूज्य मरतां नाम पढविती[4] ॥ २
प्रा ( य ) श्चित्त कोटी आन्हिक वदती । हरि हरि म्हणतां सकाळिक शांती ॥ ३
विष्णुस्मरणें जडजीव तरती । नारद तुंबर ते गुण गाती ॥ ४
श्रीगुरुराज दयार्णवमहिमा । नित्य निरंतर कल्याण[6] प्रेमा ॥ ५

## ( ७ )

## म्हणउनि स्मरा रामराया

( बाडांक ५२ वरून )

विशेष स्मरणें देव चि होतो । जनास उद्धरितो ।
महादेव तो अखंड ध्यातो[7] । स्मशानवास करीतो ॥ १
म्हणउनि स्मरा रे स्मरा रामराया ॥ ध्रु० ॥
स्मरण जातें दगाच खातें । कानकोंडें होतें ।
लक्ष चौऱ्यासी पडिले फासी । स्वहित करी ना तें[8] ॥ २
पळ पळ चळतें देही च कळतें[9] । आयुष्य निघोनिया जातें ।
निमिष्य येक स्मरणीं रहातां । कल्याणस्वरूप[10] होतें ॥ ३

---

( १ ) सुगम – ७९, १२४, १७७३; ( २ ) नु पुरे – १२४, २४२; ( ३ ) तो – ५८; ( ४ ) पढती – २४२; ( ५ ) वाक्य – ५८; ( ६ ) कल्याणी – ५८; ( ७ ) जपतो – १०३, २४२; ( ८ ) तो – ५८; ( ९ ) कळें तें – २४२; ( १० ) कल्याणरूप – ५८;

## ( ८ )

## म्हणउनि राम जपा हो

( बाडांक ५२ वरून )

तळमळ तळमळ कलिमळ वारी । चिंता शोक निवारी ।
नानाकारी चित्त विकारी । जड मूढ प्राणी तारी ॥ १
म्हणउनी राम राम जपा हो । भले साधु राम राम जपा हो ।
श्रीराम जय राम जय जय राम राम जपा हो ॥ धृ० ॥[1]
गज गणिका आणिका कोटी । मोचन सुरवर कोटी ।
हीन दीन प्राणी[2] नामस्मरणें । तरले उठाउठी ॥ २
आसनीं शयनीं गमनागमनीं । जनवनभूवन जीवनीं[3] ।
कल्याणमानस राममय जालें । विकल्प सांडि म्हणउनी [4] ॥ ३

## ( ९ )

## नित्य करितां श्रीरामस्मरण

( बाडांक ७७ वरून )

रामनामाचा कडकडाट । भवसिंधूस पायवाट ।
पायरी करून वैकुंठ । होती प्रविष्ट परब्रह्मीं ॥ १
रामनामांकित नर । बुडऊं न शके भवसागर ।
श्रीराममुद्रांकित मी वानर । सुखें परपार पावलों ॥ २
नित्य श्रीरामनामस्मरण । तेथें वीर्य धैर्य कल्याण ।
ब्रह्म पावती सनातन । हें महिमान स्मरणाचें ॥ ३
जेथें श्रीरामविस्मरण । तेथें अकीर्ति अपेश अकल्याण ।
अति निंद्यत्वें पापी पूर्ण । अधःपतन महा नरकीं ॥ ४

---

( १ ) राम जपारे राम जपारे राम जपारे भले साधु । श्रीराम जय राम जय जय जय राम ॥ ध्रु० ॥ – ६१, १६३; ( २ ) मुळांत " पावन " आहे, पण बाडांक ६१ वरून " प्राणी " घेतलें आहे. ( ३ ) भूवनीं – १६३; ( ४ ) जपा हो – १०३;

यालागीं साक्षपें आपण । समूळ सांडावें विस्मरण ।
नित्य करितां श्रीरामस्मरण । कीर्ति कल्याण निज विजयी ॥ ५

## [ १२ ] ब्रह्म

### ( १ )

### ब्रह्म

( [illegible] )

तुझें तुजचिपाशीं आहे । [illegible] तूं चि तूं पाहे ॥ १
सर्वां सर्वत्र दिसतें पाहीं । [illegible] तें ग्रासूनी राही ॥ ध्रु०
रक्त पीत ना श्वेत [illegible] । [illegible] ना वर्णी आनाम ॥ २
गुण निर्गुण रूपातीत । पूर्ण कल्याण [illegible] ॥ ३
तेथें ( उरे ) ना [illegible] [illegible] )णें येणें नाहीं ॥ ४

### ( २ )

### स्वरूपाची भेट

( [illegible] )

उपाधीं नस्तां जें आकाश । तें चि [illegible] निराभास ।
भास नाहीं तें आभास [illegible] पाहे गुरुकृपे सावकास रे ॥ १
ब्रह्म निर्मळ निश्चळ । ब्रह्म अचळ [illegible] ।
जेथें नाहीं मायामळ रे रे रे रे । निजरूप चि तें केवळ रे ॥ २
तेथें उद्भव जाला कैसा । पाहा विचार आभासा ।
बुद्धियोगें होतो तमासा रे रे रे रे । पाहाणार [illegible] विरे आप ऐसा रे ॥ ३
कासवीचें दूध काढीलें । [illegible] आदिपेलें ।
द्रव्य दर्पणींचें आणिलें रे रे रे रे । मुनी आधासी वेचियेले रे ॥ ४
पाणीतळीं कबरी थोर । मृगजळीं हस्तीचे भार ।
भीष्मराया पर्णी सुंदर रे रे रे रे । राजकन्या ते [illegible] चतुरे ॥ ५

( १ ) हा चरण [illegible] ४८, [illegible], १७७३ वरून घेतला आहे. ( २ ) तैसें – १०३, २४२; ( ३ ) [illegible] – ५८, १७७३; ( ४ ) अति – १०३

आकाशाची साली काढिली । वाळवेची वेठी वळियेली ।
वाऱ्याची वाति लाविली रे रे रे रे । चंद्रकांतास उजळिले रे ॥ ६
माया पहातां पहातां ऐसी । सत्संगाची महिमा कैसी ।
दास कल्याण गुरुकृपेसी रे रे रे रे । भेटी जाली स्वरूपेसी रे ॥ ७

## [ १३ ] दुर्जन

### ( १ )

### अधम जाणावा

( बाडांक ५२ वरून )

[१] अधम जाणावा । तो नर उत्तम न म्हणावा ॥ ध्रु० ॥
मंगी चंगी पगडीं बींगी । दारापरधनविषयासंगी ॥ १
पुत्रसुतावर अर्जी तयासी । भूतकृपाशठ गुरुपदद्वेषी ॥ २
न मनी कीर्तन सज्जननिंदा । लक्षित क्षुद्रें वादविवादा ॥ ३
राजस तामस कर्म[३] जयासी । अंतीं रवरव नर्क तयासी ॥ ४
तारक मारक आपली करणी । वचन गीतावर कल्याण वाणी ॥५

### ( २ )

### तो मज मानेना

( बाडांक ५८ वरून )

तो मज मानेना । सज्जनमनांसी[४] मन मिळेना ॥ ध्रु० ॥
मार्ग सांडून[५] चावळतो । पुसतां ची चावळतो ॥ १
देहबुद्धीनें बरळतो[६] । जाणपणें तो रेंडतो ॥ २
गुरुसी वंचितो[७] वंचितो[८] । धनदारा अर्चितो ॥ ३

---

( १ ) तो नर – २४२; ( २ ) अर्ची – ५८, १७७३; ( ३ ) कर्मे – १७८३; ( ४ ) सज्जना मनासी – १०३, सज्जना मानस – २४२; ( ५ ) सांडुनिया वावळतो – १०३, २४२; सांडुनिया – १७७३; ( ६ ) हुंबरतो – १०३, २४२; ( ७ ) डरतो – २४२; ( ८ ) संचितो – १०३, २४२

राजस तामस वाढे करीतो । सत्वगुणाला छळितो ॥ ४
नरदेह गेलियां पावेना । कल्याणपद पावेनो ॥ ५



## [ १४ ] स्फुट पदें

### ( १ )

### संकीर्तन

( बाडांक ५२ वरून )

टाळी टाळी हा काळ काळें टाळी ।
टाळी टाळी हें [3] जन्मदुःख टाळी ॥ ध्रु० ॥
भागवतीं बोलिला वनमाळी । कथेमध्यें जो वाजवी टाळी ।
त्याची वंदितो चरणधुळी । माथा वोढवी श्री चंद्रमौळी ॥ १
भक्तिभावा तुकला महाराजा । तुळसीदळ वंदी [4] यदुराजा ।
वामनें सेविला बळिराजा । भीमातीरी नांदतो स्वामी माझा ॥ २
कथेमध्यें मी तिष्ठत आहे । ब्रह्मपुतेसी बोल बोलताहे ।
प्रेमटाळीसी नाम गर्जताहे । सर्व कल्याण त्यास चिंतिताहे ॥ ३

### ( २ )

### नरदेह गेला रे

( बाडांक ५२ वरून )

नरदेह गेला रे । घात जाला रे ।
नस्ती बला देहबुद्धी । घेउनिया मेला [5] रे ॥ १
काय केलें रे । वय गेलें रे ।
माझें तुझें घेउनि वोझें । स्वामी अंतरला रे ॥ ध्रु० ॥
रिपु साही रे । लुटिलें पाही रे ।
संचित रुका नेला फुका । दैन्यवाणा जाला रे ॥ २

( १ ) तो वादक तो – १०३, २४२; ( २ ) पावना – १०३; ( ३ ) हा जन्ममृत्य – ५८, ६१, १७७३; ( ४ ) वंदित – ५८, ६१, १०३, १७७३; बंदिती – २४२; ( ५ ) आला – २४२

नीच योनी रे । न चुके जनीं रे ।
मनुष्यदेह[1] आंचवला । अंधकार जाला रे ॥ ३
ज्ञान नाहीं रे । ध्यान नाहीं रे ।
भक्ति नाहीं भाव नाहीं । नाहीं वोळखिलें कल्याणाला[2] रे ॥ ४

( ३ )

## श्रोते सज्जन सुखमूर्ती

( बाडांक ५२ वरून )

करकर करकर न करावी । कवित्तर बुद्धि विवरावी ।
स्मरहरस्मरणीं स्थिरवावी । भवरिपुचरणीं निरवावी ॥ ध्रु० ॥
त्यागुनि रघुवीर निजसदनीं । वणवण हिंडसी दीनवदनीं ।
सेवक म्हणविती जन सधनी । शेवट सकळिक गत निधनी ॥ १
श्रवणीं मननीं मन घाला । घाला षड्रिपुवरी घाला ।
भवपर परतोनि घाला । जाळीत कडकड आघाला ॥ २
श्रोते सज्जन सुखमूर्ती । तुमची अपरांपर कीर्ती ।
जन वन पावन निज तीर्थी । कल्याणदायक गुरुमूर्ती ॥ ३

( ४ )

## सज्जनवृंद मिळे

( बाडांक ५२ वरून )

प्रचितीविना करिती तनाना । बोलती नाना अपार वचना[3] ॥ १
सज्जनवृंद मिळे । तरी मग ब्रह्मस्थिती निवळे ॥ ध्रु० ॥
वणवण वणवण तीर्थे फिरती । भग्न देउळें भणभण करिती ॥ २
लौकिक सकळिक माईक भ्रांती । देव परात्पर न कळोनि शिणती ॥ ३
नाना शास्त्रें पठण लौकिकीं । नाना दैवत पूजन अनेकीं ॥ ४
मी कोण कोठिल न कळे जयासी । गर्भगीता वर वचन तयासी ॥ ५
रामउपासक कल्याणदायक । दीनोद्धारक षड्रिपुहारक ॥ ६

( १ ) जन्मा - १७७३, ( २ ) कल्या. प्र. - १७७३, ( ३ ) रचना - १२७

(५)

## रामदास्य फळा आलें

( बाडांक ५८ वरून )

स्मरण धरावें स्वयें उद्धरावें । अंतरें अंतर विवरावें रे ॥ ध्रु० ॥
अंतरें शोधितां देव । मीपणें चि जालें वाव ।
देवाधिदेव । प्रगटला रे ॥ १
जनाचें जें आर्दन । तो चि [2] जनार्दन ।
प्रगट निशाण । राघवाचें रे ॥ २
येकीं अनेक येक । पाहों जातां येकवेक ।
शोधावा विवेक । सज्जनाचा रे ॥ ३
रामदास्य फळा आलें । सर्व हि कल्याण जालें ।
साक्षत्व विरालें । रामपायीं रे ॥ ४

## [ १५ ] प्रार्थना

(१)

## श्री रामाची प्रार्थना

( बाडांक ५२ वरून )

कां रे निष्ठुर राजसा रामा । राघवा रे ॥ ध्रु० ॥
चाड हे नसतां आम्हा । कां रे निर्मीलें रामा ।
अपराधी मज तां केलें । माधवा रे ॥ १
अनंत ब्रह्मांडमाळा । न कळे विचित्र कळा ।
बहुरूपी नारायणा । केशवा रे ॥ २
सकळीक करणें तुझें । संचित प्रारब्ध माझें ।
बोलणें उचित नव्हे । या जीवा रे ॥ ३
जन वन विजन सज्जना । व्यापक तूं जनार्दना ।
ठाव हा न दिसे कांहीं । या भवा[3] रे ॥ ४

(१) जन – ८७; (२) तो – ८७, १२४; (३) जीवा – ५८

तन मन धन माझें । सांडणें सांडिलें सहजें ।
दासां कल्याण करी । तुं देवदेवा रे ॥ ५

( २ )

## श्री समर्थांची प्रार्थना

( बाडांक ५२ वरून )

अपराधाच्या कोटी । हे चि माझी कोटी ।
फेरे फिरलों जन्म कोटी । नीच अविवेकी हिण कोटी ॥ १
शरण आलों श्रीगुरुराया । हा भवजळनिधि उतराया ।
दावी आपुल्या पाया । हे काया निववावया ॥ ध्रु० ॥
विधिहर सुरवर ध्याती । नारद तुंबर गाती ।
संतवृंदें गर्जताती । धन्य सद्गुरुमूर्ती ॥ २
न लगे द्रव्यदारा । मज न लगे हा पसारा ।
माईक लटिका सारा । घेऊं नेदी उपसारा ॥ ३
बोधमूर्ती अंगीकारी । दास कल्याण हा पुकारी ।
नाना परी मी विकारी । परी तुझा चि टेहळकरी ॥ ४

( ३ )

## श्रोत्यांची प्रार्थना

( बाडांक ५२ वरून )

तुम्ही श्रोते जी महाराजमूर्ती । तेथें माझी जी वित्पत्ती किती ।
काय गावें हें आठवेना चित्तीं । बुद्धिहीण मी महा मूढमती ॥ १
व्याघ्रसिंह्याचे जनीं भय मोठें । परी तयाचीं पिलीं नेटपाटें ।
तयापुढें खेळती येके वाटे । मायबापाअंतरीं मोह दाटे ॥ २
प्रभू बोवडे बोल विवरावे । माझे दोष जी गुण न मानावे ।
तुम्हां कल्याण चिंतितो भावें । माझ्या स्वामीचे शब्द परिसावे ॥ ३



---

( १ ) वोझें – ५८; ( २ ) अभय कल्याण करु – १६३; ( ३ ) या जीवा रे – ५८; ( ४ ) नाठवे – १३५; ( ५ ) नेटपाटें – ५८

[ २ ]

# श्री कल्याणस्तवन

[ अनंत, आत्माराम, केशव, जगज्जीवन, जना, दिगंबर, नरहरी, निरंजन, पुरुषोत्तम, बाळकरामाचा दास, मोरोपंत, रंक, राघव, लक्ष्मण, शामा, शिव, शिवदिन, शिवराम, सामराज, वगैरे कृत श्री कल्याणांवरील पदें, श्लोक, अभंग, आरत्या, सुभाषितें, भजनें, पुण्यतिथीचे श्लोक, वगैरे ]

## मसूर येथील कल्याणचरित्र

( शकांक १७९९ बद्दल )

जगीं धन्य ते ब्रह्मपुरी मसूरी । अधिष्ठान ते जाहले आसुरारी ।
असंख्यात ते सामर्थ्य या मारुतीचें । बहू चालिलें काम ईमारतीचें ॥ १

महा माघ नौमीस आरंभ केला । प्रतिष्ठेसि तो लोक ऊदंड आला ।
महा थोर विद्वांस पंडीत पाटे । मिळे लोक संगीत वाद्ये अचाटे ॥ २

बहू काम ते द्वाढि लोकें अपारें । कुपा खाणिती गर्जती नाम थोरें ।
प्रतिष्ठा तये दीवसीं सर्व जालें । पुजेचे प्रसंगीं कुपीं तोय आले ॥ ३

दुपारा खरें तीं मोहोछाव कामें । करीती असंभाव्य ते लोक नेमें ।
नव्हे कार्य कोणासि वेघावयासी । समर्थें मुखें नेमिले निस्पृहासी ॥ ४

चढे थोर वृक्षावरी योगरासी । वरी नेमिलें कार्य कर्तव्य त्यासी ।
पडे देह अद्‌भूत तें कार्य होतां । समर्थापुढें सांगती त्या वृतांता ॥ ५

समर्थीं बरें ऐकिलें वार्तिकाचें । पडे देह मुर्छीत त्या निस्पृहाचें ।
समर्थें मुखें बोलिजे त्यासि साचें । असे क्षेम तो नाम कल्याण त्याचें ॥ ६

प्रभूचे अशिर्वाद हे वाक्य आले । तैपासुनी सर्व आरोग्य जाले ।
नसे ते सिमा ग्रंथ हो लेखनाची । जगीं कीर्ति हे नाम कल्याण त्याची ॥ ७

महा तीव्र वैराग्य स्वामी समर्थें । सदा सेविलें थोर आरण्यपंथें ।
पुढें चालतां सिंधु कल्याण त्यासी । महा अंधकारें मिठी सावजासी ॥ ८

भयासूर त्या गर्जना सावजाची । पडे मेघ अद्‌भूत विद्युल्लतेची ।
प्रसंगीं तये सांगती जेथ जेथें । मुखें जातसे सिंधु कल्याण तेथें ॥ ९

बहू पाणजंजाळ ते व्याळ वाटे । मर्वी कार्य उदीत कांहीं न वाटे ।
चपेटे असे वर्ष काळीं च केले । बहू सर्प आंगावरूनी च गेले ॥ १०

असो पर्वता स्वामि येणें जहालें । गडा सज्जना नृपती नाम ठेलें ।
मोहोछाव तो नित्य यात्रा जनाची । चहूं देशींचे लोक विस्पन्न त्यांची ॥ ११

कथा रम्य कल्याण नामें तयाची । निवे वृत्ति निवृत्ति त्या श्रोतयाची ।
कथा ऐकतां तो कृपापूर आला । समर्थें बहू श्रेष्ठ सन्मान दिल्हा ॥ १२

असा सार्थकाचा बहू काळ गेला । समर्थीं पुढें पूर्ण अवतार केला ।
पुजा पादुकांची स्थळीं निश्चयासी । भजों लागले भक्त विज्ञानरासी ॥ १३

भीमातीर गोदातीरा मध्यदेशीं । सीनेचे तीरीं राहिले योगवासी ।
तटाकीं च त्या नेटक्या रम्य गुंफा । जपा नेमिल्या योग कल्याणदीपा ॥ १४

मुसांडि निघे झुंडि त्या निस्पृहाची । वयें द्वादशा षोडशा विंशताची ।
रुपें नेटके घेति कल्याणदिक्षा । सदा मागती पिष्ट ते मुष्टिभिक्षा ॥ १५

सदा वाळवंटीं कथेचीं घमंडें । सुखें ऐकती धांवती मुंडमुंडे ।
यती भूपती येति अष्टा दिशांचे । स्वयें लोक ते सेवकातुल्य साचे ॥ १६

बहूसाल संतर्पणें ब्राह्मणांचीं । प्रबोधून अध्यात्म ऊपासकाची ।
बहू लोक तो रंगला सज्ज साजे । जगीं रामऊपासनाघोष गाजे ॥ १७

कल्याणस्वामीस नमून प्रेमें । (अं) कीत ते चालती नित्य नेमें ।
(दे) खोनी वैराग्य चक्कीत जाले । (ऐ) कोनिया लोक दूरूनि आले ॥१८

जनीं वाढलें बंड पाषांड होतें । सदा लालची सांगती ती नव्हे ते ।
उलंडून ती चंड थोतांड वाले । प्रतीष्ठून ते सत्य कल्याण केले ॥ १९

अविनाश जें नाम कल्याण त्याचें । करी सर्व कल्याण सर्वा सिसाचें ।
समर्थें जना ऊतरायासि पारीं । असे ठेविली मूर्ति कल्याणकारी ॥ २०

युगानयुगें हरि अवतारी । +हे चि तो चंचळ वेषधारी ।
श्री (रा) मदासांकित बंधु जाला । **अनंत** तेथें नमनें मिळाला ॥ २१

(२)

## समर्थांचें लेखक

(बाडांक १७९९ वरून)

स्वामींचा कवितासमुद्र अवघा कल्याण लिहीतसे ।

(३)

## महंती करूं जाणे

( दासविश्रामधामावरून )

ऐसा स्थितीवान या जगीं दुर्लभ । परमार्थाचा लाभ जया प्राप्त ॥ १
सर्वांजन सुखी असावे हा हेत । कापट्य किंचित नाहीं चित्तीं ॥ २
परोत्कर्षी सहन उपकार चि करी । गुरुसेवेवरी प्रीत मोठी ॥ ३
गुरुपुत्र कोणी निष्ठल्या सावरी । आनंद चि भरी बुद्धिदाता ॥ ४
न रमोन विरवीं बहुता करी सुखी । अंतर पारखी भक्तीवंत ॥ ५
महंती करूं जाणे न संडी च प्रेम । ज्याचा आत्माराम साह्यकारी ॥ ६

(४)

## गावें ध्यावें मनीं श्री कल्याण नाम

( दासविश्रामधामावरून )

कल्याणाचें नाम कल्याणकारक । जपतां लाभे सौख्य अनुपम्य ॥ १
कल्मष हराया नलगे वाड वेळ । जपतां भावबळें नाम मुखें ॥ २
समर्थाच्या कृपें अद्वय अनामी । प्रगटला स्वामी श्री कल्याण ॥ ३
कल्याणीं च राहती कल्याण करिती । सुमंगळ वाति होय भक्ता ॥ ४
गावें ध्यावें मनीं श्रीकल्याण नाम । सखा आत्माराम होय त्याचा ॥ ५

(५)

## गुरुमहिमा

( दासविश्रामधामावरून )

धन्य तो गुरुमहिमा काय कीं न कळे । विश्वासिका फळे वरदानें ॥ १
भैरवभट्टासी कांडोनि उखळांत । पुन्हां मूर्तिमंत केलें त्यासी ॥ २
नरसिंह सरस्वतीं मेल्यासी उठवीलें । कबिरानें केलें चोज मोठें ॥ ३
तळोन घेतला शिष्य तो गोरख । केलें कवतुक नानकानें ॥ ४
कल्याण स्वामींचें आश्चिर्य परम । खेळे आत्माराम ज्या सबाह्य ॥ ५

( ६ )

## संगति तैशाची घडो सदा

( दासविश्रामधामावरून )

धन्य तो सत्शिष्य विरक्त विश्वासी । सर्वदा मानसीं गुरुध्यान ॥ १
तनुमनधन वेची गुरुकार्जी । तयाचे पदाब्जीं मुक्ति खेळे ॥ २
विषयाचा अध्यास लेश तो हि नाहीं । पाडीना निग्रहीं वुजयासी ॥ ३
आत्मारामदेवा विज्ञापना हे चि । संगति तैशाची घडो सदा ॥ ४

( ७ )

## तरी गुरुपाय स्मरे जीवी

( दासविश्रामधामावरून )

ऐसा व्हावा शिष्य निश्चयी पुरुष । गुरुवचनीं विश्वास दृढ केला ॥ १
सिद्ध दशा पूर्ण बिंबती हि आंगीं । इच्छा सेवेलागीं अखंडित ॥ २
करूनियां दूरि अश्रत्धादि ऊर्मी । उपासनाक्रमीं सावधान ॥ ३
तो चि आत्माराम गुरु शिष्य स्वयें । तरी गुरुपाय स्मरे जीवीं ॥ ४

( ८ )

## भवभय कैंचें राघवाच्या नामीं

( बाडांक १०३ वरून )

कल्याण तो स्वामी प्राप्त होय कैसा । जरी घडे ऐसा भक्तिभाव ॥ १
भावें भक्ति घडे नवविधा जरी । ते चि पै विवरी परीक्षीती ॥ २
परीक्षीती राया श्रवण घडलें । कीर्तन जोडलें नारदासी ॥ ३
नारदाच्या मुखें प्रल्हादा श्रवण । अखंड चिंतन हरीनाम ॥ ४
हरीचें पै चरण करी संवाहन । लक्ष्मी आपण निज हस्तें ॥ ५
निज हस्तें अर्चन प्रभुरायें केलें । वंदन घडलें अक्रूरासी ॥ ६
अक्रूरा वंदन घडलें देवाचें । दास्य राघवाचें हनुमंता ॥ ७
हनुमंता दास्य भक्तीचें घडलें । सख्यत्व जोडलें अर्जुनासी ॥ ८
अर्जुनासी सख्य देवासी जोडलें । आत्म निवेदिलें बळीरायें ॥ ९

बळीराया ऐसा करितां निश्चय । तरी मग काय भवभय ॥ १०
भवभय कैंचें राघवाच्या नामीं । कल्याण तो स्वामी केशवाचा ॥ ११

( ९ )

## सद्गुरु कल्याण

( बाडांक २०७ वरून )

सद्गुरु सखा तारक जनीं । मोक्ष तो नसे अन्य साधनीं ॥ १
सद्गुरुकृपा नाहीं ज्यास रे । बांधिला असे मोहपाश रे ॥ २
शुकनारदा शंकरादिका । हे नसे जया त्यासि जन्म पाहा ॥ ३
म्हणुनि मानवा सद्गुरूपदीं । बुद्धि साधी रे निश्चयें आधीं ॥ ४
सद्गुरु कल्याण भावीत असे । जगज्जीवन हा तत्पदीं वसे ॥ ५

( १० )

## स्वामि कल्याण राजा

( बाडांक २३९ वरून )

कल्याणाचें नाम कल्याणकारी । कल्याणाचें ध्यान सर्वांसि तारी ।
कल्याणाचा हस्त माथा जयाचे । चारी मुक्ति वंदिती पाय त्याचे ॥ १
कल्याण होणें जरी तूज आहे । कल्याणपायीं मन स्थीर राहे ।
कल्याणवाणी पडतां सुकानीं । कल्याण जाले बहुसाल प्राणी ॥ २
अविनाशि हें नाम कल्याण ज्याचें । करी सर्व कल्याण सर्वां जिवाचें ।
समर्थें जनीं ऊतरायासी पारी । अशी ठेविली मूर्ति कल्याणकारी ॥ ३
श्रमहरणितटाकीं स्वामि कल्याणराजा ।
परम दिनदयाळू नांदतो स्वामि माझा ।
सदय हृदय ज्याचें ध्यान हें आठवीतां ।
परम सफळ येतो मोक्ष कल्याण दाता ॥ ४
बहु भक्तभक्तांतरी दाटि जाली । तयांचे पदीं चित्तवृत्त्यादि ठेली ।
जगज्जीवनाचा प्रभू जो अनामी । नमस्कार साष्टांग कल्याणस्वामी ॥ ५

---

( १ ) परी या पदीं वृत्ति निवृत्ति ठेली । – ७९, १७८

## ( ११ )

## नमस्कार साष्टांग कल्याणस्वामी

( बाडांक १७८ वरून )

जया दर्शनें सर्व ही भ्रांति नासे । तुरे दैन्यसाम्राज्य मीं ब्रह्म भासे ।
स्फुरेना अहो कल्पना दुष्ट कर्मी । नमस्कार साष्टांग कल्याणस्वामी ॥ १
पहा वाक्यमात्रें चि जन्मांतरींचा । महा संशयो नाशिला अंतरींचा ।
पुरें सौख्य दे जो दयेनें अनामी । नमस्कार साष्टांग कल्याणस्वामी ॥ २
असंख्यात ज्या संग्रहीं पुण्य गांठी । असे तैं अकस्मात त्या होय भेटी ।
भवाब्धी तुटे नांदवी पूर्ण धामीं । नमस्कार साष्टांग कल्याणस्वामी ॥ ३
कसा भेद बुद्धीसि लागों चि नेदी । अवस्था हुनी अक्षयी बोध सांदी ।
देहेप्राक्तनालागि खंडूनि नेमी । नमस्कार साष्टांग कल्याणस्वामी ॥ ४
सुखें राजवी नाशुनी सर्व चिंता । दयाळू असा काय वर्णू अचिंता ।
महा उद्धवी डोम जो पूर्ण नामीं । नमस्कार साष्टांग कल्याणस्वामी ॥ ५
बहू मत्तमत्तांतरीं दाटि जाली । परी या पदीं वृत्ति निवृत्ति ठेली ।
जगजीवनाचा प्रभु जो आनामी । नमस्कार साष्टांग कल्याणस्वामी ॥६*

## ( १२ )

## कृपादृष्टि कल्याण हा जैं विलोकी

( बाडांक ११६ वरून )

मुकें शास्त्र पौराण वेदासि सांगे । स्वपादें ध्रुवामस्तकीं पंगु वेघे ।
परीक्षा करी रत्न गर्भांध लोकीं । कृपादृष्टि कल्याण हा जैं विलोकी ॥ १
तृणाळी शिरीं सर्व ब्रह्मांड वाहे । लघू जीव कल्पाग्नि प्राशूनि राहे ।
महा दुष्कृती मान घे देवलोकीं । कृपादृष्टि कल्याण हा जैं विलोकी ॥ २
भुगाळ्नि दे शेष थोटाळ लंडी । स्वयें लोकनाशाप्रती तो उलंडी ।
महा सूर्य खद्योतया कींव भाकी । कृपादृष्टि कल्याण हा जैं विलोकी ॥३

* हा श्लोक पृष्ठांक १३३ वर एकदां आला च आहे. ( १ ) मासूनि – १७८

+[1]अनंगासि कुश्चीत दे तेजराशी । अभागी अहो कल्पवृक्षासि तोषी ।
लवें पिप्पलीकाऽर्णवा सप्त शोखी । कृपादृष्टि कल्याण हा जैं विलोकी ॥ ४
अती मूढबुद्धी जिवा ज्ञान सांगे । महा कामिकाचे पदीं मोक्ष लागे ।
पहा मारुता मश्यकू येक धोकी । कृपादृष्टि कल्याण हा जैं विलोकी ॥ ५

( बाडांक १७८ वरून )

सुवासोक्त वाळू द्रवे तेल भारी । स्वशृंगें क्रिमी इंद्रवज्रा विदारी ।
तृणाग्राणी मेरू शिशू साम्य जोखी । कृपादृष्टि कल्याण हा जैं विलोकी ॥ ६
मृणाळी गजाधीप तंतूसी बांधे । महामूर्ख शक्रासनीं क्षेम नांदे ।
सदोषा पदीं धन्य गोदा अहो कीं । कृपादृष्टि कल्याण हा जैं विलोकीं ॥७
खगेंद्रा जिणी मक्षिका हे सवेगें । समस्तां ग्राह्यां पृष्ठिसी मूढ लागे ।
विलासे अवीरक्त साम्राज्यसौख्यीं । कृपादृष्टि कल्याण हा जैं विलोकी ॥८
अनूरेणूगर्भी विधीगोळू माये । शिवा साम्य अल्पायुषा प्राप्ति होये ।
पशू श्वान ब्रह्मादिकांतें न लेखी । कृपादृष्टि कल्याण हा जै विलोकी ॥ ९
अहो बाल अज्ञान पांचा दिसांचें । करी पिष्ठ चाऊनिया त्या लोहाचें ।
जगजीवनू काम्यकर्मासि ठोकी । कृपादृष्टि कल्याण हा जैं विलोकी ॥१०

( १३ )

## जगज्जीवनाचा प्रभू

( बाडांक २०७ वरून )

रामदास सद्गुरु अविनाशी अवतरला पाहीं ।
निशिदिनीं त्यासी हृदयीं चिंतुनि चरणीं ठेवी डोई ॥ ध्रु०
नाशिवंत पसारा अवघा जाणुनि दूर केला ।
स्वस्वरुपाचा अनुभव घेउनि उन्मनिसी ठेला ॥ १
चरणाश्रित निज समीप त्यासी पूर्ण कृपा करी ।
नामरुपासी त्यजुनी भवभय अपहारी ॥ २
लीनवृत्ति कल्याण स्वरूपीं आपण ची प्रगटला ।
अंतर्बाह्य जगज्जिवनाचा प्रभू तो चि जाला ॥ ३

( १ ) अनंगासी – १७८

( १४ )

## जगदोद्धारक कल्याण

( बाडांक ६६ वरून )

जय जय जी कल्याणा पतीतपावन जगदोद्धरणा हो ।
गुणमयी सरिता दुर्धर तरकों तरलों संशय हरणा हो ॥ ध्रु० ॥
निगमागमश्रुतिसारा विमला निर्द्वंदा अविकारा हो ।
षड्गुणवरदा भेदा अद्वय सिंधू हे सुखकारा हो ।
तव स्मरणें षड्वैरी यांचा मोडुनि गेला थारा हो ।
सत्‌चित्‌घन अद्वैता नमितां नेश्वर करीसी मारा हो ॥ १

तव पदकंजस्पर्शें अवघें जीवपण जिवें चि मेळें हो ।
शिवभावा वोलांडुनी निरतेशै अक्षयीं ठेले हो ।
पुनरपि जननामरणामार्गीं काढियलें बिदुळें हो ।
आण्यांचें दधी पुन्हां शर्कर युक्षापरी तां केलें हो ॥ २

परइच्छे तो तरु जैसा वातस्पर्शें हाले हो ।
आयुष्याच्या योगें तद्वत् सहजें हे तनु चाले हो ।
विस्मरणें करी कर नृत्याते परी ते वाचा बोले हो ।
अगम्य महिमा जगज्जीवन प्रभु भावें धरी पाउलें हो ॥ ३

( १५ )

## कल्याण तो सद्गुरु गा विनाशी

( बाडांक १२८ वरून )

कल्याण जो दीन जना करीतो । ध्याई मना रे अजि लौकरी तो ।
तो भेद भ्रांतीस दये विनाशी । कल्याण तो सद्गुरु गा विनाशी ॥ १

---

( १ ) गा + अविनाशी. असे प्रयोग रामदासी वाङ्मयांत वारंवार आढळतात.

( १६ )

## सद्गुरु माझा कल्याण

( बाडांक १०२ वरून )

सद्गुरु माझा कल्याण दीनानाथ । धणीवरी आठऊं रघुनाथ ॥ ध्रु० ॥
गुरु माझा परब्रह्मवासी । जिवीं माझे जडला अहिर्निशी ॥ १
गुरु माझा संचला निराकार । ब्रह्मादिका न कळे त्याचा पार ॥ २
गुरु माझा अनंत अपार । होते जाते माया चराचर ॥ ३
वेदश्रुती न कळे त्याचा अंत । अंतर्बाह्य व्यापक सदोदित ॥ ४
जना म्हणे हे रंक नवाजिलें । मोक्षपदीं नेउनी बैसवीलें ॥ ५

( १७ )

## सद्गुरु दयाळ मोठा

( बाडांक १०२ वरून )

सद्गुरु दयाळ मोठा गे बाई ये ॥ ध्रु० ॥

सखी पुसे सखीयेसी । सद्गुरूची महिमा कैसी ।
गुह्य सांग मजपाशीं गे ॥ १

सद्गुरूचे चरण धरी । भूत भूत वीवरी ।
चुकती चौऱ्यासीं फेरी गे ॥ २

सखी म्हणे आवो बाई । शरण जा सद्गुरुपाईं ।
जन्ममृत्य मग नाहीं ॥ ३

मीपणाचा सोडी ताठा । सद्गुरु कृपाळू मोठा ।
बैसवी सायोज्यापटा ॥ ४

कायावाचामनोभावें । सद्गुरूसी शरण जावें ।
पूर्वजासीं उद्धरावें ॥ ५

जना म्हणे सखीयेसी । विश्वासें कल्याण होसी ।
सद्गुरु तो पाप नाशी ॥ ६

## ( १८ )

## कल्याण स्वामी ध्यातों अनुदिनीं

( बाडांक ६२ वरून )

गुरुराज राज राज विराज रे ॥ ध्रु० ॥

ज्याचेनी सत्य त्रैलोक्य जालें। त्यास मी बोलों काय रे काय रे काय रे ॥१

त्रिभुवनपावनी ज्यापुनि अनुरणी। श्रुती तूं तटस्त धाय रे धाय रे धाय रे ॥२

कल्याणस्वामी ध्यातो अनुदिनीं। दिगंबर शरण जाय रे जाय रे जाय रे ॥३

## ( १९ )

## सद्गुरु वर्णवेना

( बाडांक ६२ वरून )

सद्गुरु वर्णवेना । ज्याचा पार चि न कळे कोणा ॥ ध्रु० ॥

सा अठरा आणि चार । तेही न कळे त्याचा पार ॥ १

जो कां अनंत अपार । स्वामी निर्गुण निर्विकार ॥ २

धर्मस्थापनेकारणें । जेंही अवतार चि घेणें ॥ ३

रामदासांचिये वंशीं । स्वामी कल्याण अहिर्निशीं ॥ ४

वृत्ति निवृत्ति निमाली जेथें । जाला नरहरी तल्लीन तेथें ॥ ५

## ( २० )

## रामदासदास्य पूर्ण जह्यालें

( बाडांक ५९ वरून )

कल्याण भज मना तूं नित्य रे । सर्व सांडि हे अनित्य रे ॥ ध्रु० ॥

कल्याण स्वस्वरुप जाणिजे । सदा तद्रप चि होइजे ।
ब्रह्माहमस्मि असे वर्णिजे । गुरुमुखें अकार्णि जे ॥ १

जन्मासी येउनि केलें काय रे । व्यर्थ शिणाविली माय रे ।
परमार्थें धरी गुरुपाय रे । वेदें दाविला उपाय रे ॥ २

रामदासदास्य पूर्ण जाह्लें । अलभ्य रुप लाधलें ।
निरंजनीं निरंजन शोभलें । द्वैत असतां चि नाडळे ॥ ३

## ( २१ )

## कल्याणांची आरती पुरुषोत्तमकृत

( बाडांक ७९ वरून )

भवहरणा सुखकरणा निज स्मरणा वरदा ।
तव चरणाप्रति शरणांगत करुणानीरदा[1] ।
आकळ[2] छिळावीग्रह निगमागमबादा[3] ।
स्थावर जंगम जग [4] या नातळसी भेदा ॥ १

जय देव जय देव जय जी [5] कल्याणा ।
भावातीतानंता सहजा[6] परिपूर्णा ॥ ध्रु० ॥

हरिहर ब्रह्मादिका न कळे पदमहिमा ।
विंसीतें[7] शत रसना [8] ही नेणे तव सीमा ।
कुंठित होये [9] वाचा नाकळवे[10] नेमा[11] ।
पुरुषोत्तम तव कृपे विगळितें[12] रुप नामा ॥ २

## ( २२ )

## काकड आरती कल्याणांची

( बाडांक २०७ वरून )

काकड आरति श्रीगुरु कल्याणस्वामी ।
जिवेंभावें बोवाळितां प्रगटसि अंतर्यामीं ॥ ध्रु०

ज्ञान अज्ञान वळुनी भ्रांती घृतें तिंबिला ।
स्वात्मबोध प्रगटला तेणें जळोनी गेला ॥ १

---

(१) नीरुद्रा – १५८; निर्द्वंदा – २३९ (२) न कळे – २३९ (३) बाधा – १७९९ (४) सखया – ८७ (५) जय – २३९ (६) सहसा – १५८ (७) विंशति – १५८, २३९, २४४, ४११, ५१२ (८) रसनायक – १५८, ४११ (९) भवभय – ४११ (१०) नातळसी – ४११ (११) निगमा – ८७, ११४, १५८, २३९, ४११ (१२) विरहित – ११४

अनंत अपार नाहीं पार तुझ्या स्वरूपाचा ।
स्वामी कल्याण दास रामदासाचा ॥ २
अंतर्बाह्य व्यापुनि स्वरुपीं रहिवास ।
निशिदिनीं तुझे स्वरूपीं बाळकरामाचा दास ॥ ३

( २३ )

भरतावतार कल्याण

( बाडांक ५५४ वरून )

श्रीरामदाससेवारत जो भरतावतार कल्याण ।
दुर्वार कामसिंव्हीं ज्या वीरें घातलें चि पल्याण ॥ २

— मोरोपंत

( २४ )

तो कल्याण चि केला

( बाडांक १७९९ वरून )

× × ×

निज वचनें वटशाखा तोडुनि जो शिष्य पावला पतन ।
तो कल्याण चि केला जीव ( न ) दानें करूनिया जतन ॥ १

× × ×

— मोरोपंत

( २५ )

सत्पदा त्वरित दे

( बाडांक १२४ वरून )

कल्याण स्वामी सदये जगजीवनासी ।
दावी स्वप्रत्यय हरी ममता घनासी ।
ऐसा भजोनि म्हणवी निज रंकदास ।
तो सत्पदा त्वरित दे न करी उदास ॥ ५२ ॥

( २६ )

## कल्याणस्मरणें तरती जडजीव

( बाडांक १२८ वरून )

कल्याणस्मरणें तरती जडजीव या भवडोहीं ।। ध्रु० ।।

+ + कर्तृत्व ज्याचे नाहीं ।
कारणीं पाहतां आत्मा रघुवीर तो चि पाही ।
महाकारणीं + + ज्याते, स्वसुखानंद वाचे गर्जती वेद पाही ।। १

लिळावेश सगुण जाला, अवघी जन भुलला,
लावुनी रामवेध सकळा, लघीत + + + कळा,
असा सद्गुरु स्वामी माझा, स्वसुखानंद सह ज्या गर्जती वेद पाईं ।।२

नाहीं संशया रामदासी. न कळे अवित्तासी, नाना
साधन सुकृतराशी, नवविध भजनासी,
होईल + + त्याची आणा, दीन राघव
तव पद नमना, सप्रेम करुणा पाही + ।। ३ ।।

( २७ )

## कल्याणांची आरती लक्ष्मणकृत

( बाडांक ५५६ वरून )

श्रीगुरुवेचा उत्कर्ष केला । केलेपणाचा अभिमान गेला ।
जग उद्धराया अवतार धरिला । परब्रह्मरुपें सहज प्रगटला ।। १

जय देव जय देव जय सद्गुरुराया ।
कल्याण हे नाम आरति तव पाया ।। ध्रु० ।।

निस्पृहतेनें जैसा दिसे मारुती । विदेहीपणें पहातां शुकाची स्थिती ।
मन उन्मन स्वरूप विश्रांती । चरण लक्षूं जातां आपुणें पण देती ।। २

( २८ )

## कल्याणानुग्रह

( बाडांक १०२ वरून )

कृपाकरा ठेउनी मस्तकीं हो । धरूनि मातें निज हस्तकीं हो ।
केलें पहा मानस स्वस्थ कीं हो । दिल्हें मला सौख्य समस्त कीं हो ॥ १

आलिंगना देउनि आजि मातें । पाहा दयाळें हरिले श्रमातें ।
नेऊनिया मंगल आश्रमातें । केलें सुखी दाउनि ऊगमातें ॥ २

पीयूषदृष्टी मज न्यहाळिलें हो । धरूनि मातें कुरवाळिलें हो ।
बोधामृता पाजुनि पाळिलें हो । मी तूंपणापासुनि गाळिलें हो ॥ ३

कृपाळू माझा गुरु बापमाये । ब्रह्मांड गेहीं सहसा न माये ।
जो मोक्षदाता सकळा समाये । तो आजि माझ्या हृदयीं समाये ॥ ४

गुरूपदीं ठेउनि मानसा हो । स्वहीत त्याला तुम्ही तें पुसा हो ।
छेदूनि टाका अरिवर्ग सा हो । कल्याणठायां मग जा बसा हो ॥ ५

संसार हा रे अवघा पसारा । माईक जाणा ममता पसारा ।
शोधीत जावा भवआपसारा । मनास तेथें मग ऊपसारा ॥ ६

ज्या पादपद्मा चुरिते रमा रे । त्या पादपद्मीं सुमनें रमा रे ।
वारी त्रितापा हरितो श्रमा रे । शामा म्हणे त्या भज उत्तमा रे ॥ ७

( २९ )

## कल्याणानुग्रह

( बाडांक १०२ वरून )

ठेवोनियां मस्तकीं पद्महस्त । केलें पहा मानस पूर्ण स्वस्थ ।
दाऊन मातें निज मूर्ति रामा । कल्याण केलें म्हणे दास शामा ॥ १

बोधोनियां मंगळ वाक्य बोध । नेला लया माइक सर्व भेद ।
निर्नाम जालों असतां रिकामा । कल्याण केलें म्हणे दास शामा ॥ २

जो पिंड ब्रह्मांड पदार्थ झाडा । सांगीतला सर्व सुखें निवाडा ।
डोळां मला दाउनि मोक्षधामा । कल्याण केलें म्हणे दास शामा ॥ ३

हृत्पंकजिं देशिक पाय ध्यातां । जालों स्वयें मंगलरूप आतां ।
देऊनि माते निज मोक्षधामा । कल्याण केलें म्हणे दास **शामा** ॥ ४

( ३० )

## कल्याणमोक्षदानी

( बाडांक ७९ वरून )

धन्य हा सद्गुरुपाणी कल्याणमोक्षदानी ॥ ध्रु० ॥
माथां ठेउनिया हात । श्रवणीं सांगोनिया मात ।
केला स्वरूपीं येकांत । ऐसी ज्याची पै करणी ॥ १
हातें पातक वाताहात । केला संसार निःपात ।
**शामा** म्हणे जगंनाथ । जेणें दाविला नयनीं ॥ २

( ३१ )

## कल्याण सद्गुरुराजा

( बाडांक ६१ वरून )

तगतो धणी माझा धणी माझा । कल्याण सद्गुरुराजा ॥ ध्रु० ॥
श्रमहरणीतिरीं साजे । ज्याची समाधी हो विराजे ॥ १
ब्रह्मचर्य व्रतधारी । जो कां निःसंग निर्विकारी ॥ २
निस्पृह महंत विरागी । जो कां संगातीत निःसंगी ॥ ३
रामउपासक ज्ञानी । ज्याचे शतपथ तो गुण वानी ॥ ४
**शाम** म्हणे मी ज्याचा । चाकर आज्ञाधारक साचा ॥ ५

( ३२ )

## कृपा कीजे कल्याण गुरुराया

( बाडांक १२८ वरून )

आलों शरण तुजलागी जिवेंभावें । भवार्णवापासोन सोडवावे ॥ १
कृपा कीजे कल्याण गुरुराया । वेळोवेळा लागेन तुझ्या पाया ॥ ध्रु० ॥
करूं नेणे सद्भक्ती तुझी सेवा । परी म्हणवीतो दास गुरुदेवा ॥ २
**शामा** म्हणे अपराध माझे कोटी । दयाघना तूं घाली सर्व पोटीं ॥ ३

## ( ३३ )

## कल्याणांची आरती *शिवकृत

( बाडांक ९१ वरून )

अविनाश ब्रह्म जें कां नाम कल्याण ज्याचें ।
विज्ञा१न बोलताती सार सर्व शास्त्रांचें ।
न खंडे अखंडीत ध्यान योगीवृंदाचें ।
पहातां मुहूर्ते मूर्ती । कोड पुरे लोचनाचें ॥ १
जय जया मोक्षपाणी । स्वामी कल्याणराजा ।
आरती वोवाळीन । विश्वंभरा विश्वबीजा ॥ ध्रु० ॥
अवतार ब्रह्मवौंसीं । शक्ति अद्‌भुत देहीं ।
मारुती स्वरूप भासे । जिंकिले हे रिपु साही ।
जितेंद्रिय ब्रह्मध्यारी । पूर्ण लक्षणें दे३हीं ।
षड्‌गुण ईश्वराचीं । पार न कळे कोण्हा हि ॥ २
धन्य हे वौंशावळी । हंस विधी वसिष्ठ योगी ।
रामचंद्र भीम पुढें । रामदास कलयुगीं ।
सद्गुरु कल्याणस्वामी । चित्सुखानंदभोगी ।
नातुडे द्वैतभावा । शिव निःसंग संगी ॥ ३

## ( ३४ )

## क ल्या ण

( बाडांक ६३ वरून )

क ल्या ण हें तीन अक्षरें कल्याणकारी ।
नाम गातां ध्यान ध्यातां सर्व जना तारी ॥ ध्रु० ॥
करी पावन जो दासजनातें तो पुण्यश्लोक ।
कर्ता कारि कारण सद्गुरुराज तो येक ।

---

* आरती भजन परिसमाप्तीची – ४११

( १ ) वित्पन्न – १२२, १५८, ४११, ११६७ ( २ ) अमूर्त – १२२; अमूर्तीं – १५८; मोक्ष – ११६७ ( ३ ) दाही – १२२, १५८, ११६७; तेही – ४११ ( ४ ) विश्वराजा – ११६७

कपट वेशधारि नव्हे चि सुखसाम्यक ।
करुणासागर कृपाकटाक्ष दासतारक ॥ १
त्याला आंगीं अनुभवलेणीं प्रभा प्रकाशल्या ।
त्याहावया बहुत कुशळ ग्रंथ सटीका लिहिल्या ।
त्याहाक जाणोनी रामदासवृत्ती तोषविल्या ।
त्यावादेवीनकरि विषयीं वृत्ति त्या विरल्या ॥ २
नरोप नाम देह गेहें सर्व नीरंजन ।
नन्दन नंदन सर्व घटीं भावी सज्जन ।
नम्र मानस ज्यां सम साधू दुर्जन ।
नमीं पदें ज्याचीं शिव सु व्हावया पातकभंजन ॥ ३

( ३५ )

## तो ब्रह्मचारी

( बाडांक ६९० वरून )

नित्यानित्यविवेकें अंतरीं जाला निर्विकारी । तो ब्रह्मचारी ॥ ध्रु०॥
स्नानसंध्या जप हा अखंड करितो दशमद्वारीं ।
सद्गुरुवचनें भिक्षा दृढ विश्वासें स्वीकारी ।
येकीं येकपणाची निद्रा मीतूंपणेंविण सारी ॥ १
मूळ अडबंदाचा कौपिन सहजीं सहज नेसे ।
सत्वशुद्धभस्मोद्धळणाचें अखंड ज्याला पिसें ।
त्यावरी अक्षमाळाभूषण सर्वांगीं ज्या विलसे ।
सत्यवचनलीनतेचें चिन्ह सबाह्य अंतरीं दिसे ॥ २
सच्चिद्‌आनंदाचें यज्ञोपवीत राहे स्कंधीं ।
यमनियमप्रत्याहारें वासनांतर जो छेदी ।
कर्णीं कुंडलदीसी झळकती आदिसिद्धांतादि ।
चहुं देहाच्या सुटल्या गांठी जीवशिवउद्बोधी ॥ ३
आठवनाठवातीत ज्याला बाणे स्थितिमुद्रा ।
अबोल बोले बोलत त्याची न कळे गति सुरइंद्रा ।

केसरिसद्गुरुसेवा करितां नेणे आळस निद्रा ।
शिवदिन ऐसा विरळा निवडे मथनीं दैवसमुद्रा ॥ ४

( ३६ )

## या चि रीतीचा योगी कैचा वो

( बाडांक ७५९ वरून )

या चि रीतीचा योगी कैचा वो माय ॥ ध्रु० ॥*
हरिरंगीं नाचत आनंदें करी ( त ) । गजर रामनामाचा वो ॥ १
आपण तरोनी तारीत जीवा । चुकउनी मार कामाचा वो ॥ २
पूर्ण सुखाचा सिंधु हेलावे । जिवलग शिवरामाचा वो ॥ ३

( ३७ )

॥ श्लोक ॥ स्वामीचे

## जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची

( बाडांक १३७ वरून )

सिनेच्या तटाकीं महा पुण्यभूमी । समाधी विराजे तये डोंबग्रामीं ।
बहू रम्य शोभा दिसे गोपुराची । जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ॥ १
गुरुभक्त वीरक्त जो ब्रह्मच्यारी । महा तीव्र वैराग्य तें निर्विकारी ।
क्षमा शांति अद्‌भूत त्या निस्पृहाची । जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ॥२
जगीं बद्ध अज्ञान ते सिद्ध केले । बहू संत ते महंत होऊनि ठेले ।
कृपा आगळी सौम्य लीळा जयाची । जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ॥३
प्रतापें बळें आगळा योगिराणा । नसे ते सीमा वर्णितां पूर्ण ज्ञाना ।
पदीं लागतां मुक्ति लाभे फुकाची । जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ॥४
मही मंडळीं रामउपासना हो । बहू नेटकी शुद्ध दीक्षा जना हो ।
प्रिती लाविली भक्ति त्या राघवाची । जगीं धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ॥ ५

---

* संशोधनखंडांत देव म्हणतात, " हें पद श्रीकल्याणस्वामीवर त्यांचें शिष्य आपचंद मठपति शिवराम यांनीं केलेलें असावें, असें मी एकवार मानलें होतें, पण तें पद त्या शिवरामांचें नसून पूर्णानंदांच्या शिवरामांचें दिसतें. "

## ( ३८ )

## योगी कल्याणराजा

( चाडांक ७९ वरून )

श्रमहरणतटाकीं योगी कल्याणराजा ।
परम दीन दयाळू नांदतो स्वामी माझा ।
सदय हृदयीं ज्याचें ध्यान ( तें ) आठवीतां ।
परम सफळ येतो मोक्ष कल्याण हाता ॥ १

कल्याणमूर्ति हृदयांबुजीं आठवितां ।
आलें अनाम पद निश्चयपूर्ण हाता ।
नांदो निजात्म निज मंगळ मोक्ष गेहीं ।
सामराज पूर्ण सुख सेउनि सर्वदा ही ॥ २

## ( ३९ )

## साम्राज्यसौख्य विलसे गुरुराजपाईं

( चाडांक १३७ वरून )

कल्याणध्यान नयनांबुजिं दाटलें हो ।
मायामृगांबु जग सर्व हि आटलें हो ।
बाह्यांतरीं सम हरी दिसे सर्व ठाईं ।
साम्राज्यसौख्य विलसे गुरुराजपाईं ॥ १

## ( ४० )

## कल्याणस्वामि वंदा

( चाडांक १३७ वरून )

कल्याणस्वामि वंदा हरुन जनमदा तारितो बुद्धिमंदा ।
सेवि वैराग्यकंदा जपत मनिं सदा रामपादारविंदा ।
वारी संसारधंदा वदनिं गुण वदा मान्य जो संतवृंदा ।
नेणे कापट्य निंदा श्रम हरि समुदा नेणवे भाग्यमंदा ॥ १

## ( ४१ )

## साधु भला

( बाडांक ६२ वरून )

स्वामीचे बहु शिष्यवर्ग जगतीं त्यांमाजि साधू भला ।
नामें मुद्गल योगीराज बरवा सत्शिष्य नामाथिला ।
भाग्याचा वर पावला गुरुकृपा कल्याण पावे पदा ।
यालागी सुख **सामराज**पदवी भोगी सदा संपदा ॥ १

## ( ४२ )

## सद्गुरुसी शरण वेगीं जावें रे

( बाडांक ७९ वरून )

काया वाचा सप्रेम मनोभावें रे ।
सद्गुरुसी शरण वेगीं जावें रे ॥ धृ० ॥
ज्याच्या पाईं अनंत तीर्थां वास रे ।
त्याच्या तीर्थें जाती महा दोष रे ॥ १
ज्याच्या हातें हातासी देव येतो रे ।
देही असतां विदेही पूर्ण होतो रे ॥ २
ज्याच्या बोधें खुंटती दृश्य भेद रे ।
सबाह्य अंतरीं कोंदाटे ब्रह्मानंद[1] रे ॥ ३
कृपा करूनी निर्वाणपदा नेती रे ।
**साम्राज्य** कल्याण सुख देती रे ॥ ४

## ( ४३ )

## तेणें कल्याण माझें जालें

( बाडांक १३७ वरून )

शिरीं ठेउनि पद्महस्त । माझें अंतर केलें स्वस्त ॥ १
त्याचें नाम मुखासी आलें । तेणें कल्याण माझें जालें ॥ धृ० ॥

---

( १ ) परमानंदु – १०३, परमानंद – १३७

ज्याच्या बोलें बोल निमाला । मीतूंपणासी पडिला घाला ॥ २
ज्याच्या कृपाविलोकनें पाहो । भवबंधन जालें वाव ॥ ३
ज्याचे वंदितां पाये माथा । पूर्ण साम्राज्य आलें हाता ॥ ४

( ४४ )

## जपे तूं कल्याण

( बाडांक २०७ वरून )

रे नर सदा मानसीं जपे तूं कल्याण । तेणें होईल तुझें कल्याण ॥१
ज्याचा निवास श्रमहरणीतीर । सकल विश्रांतीचें माहेर ॥ २
ऐसा श्री सद्गुरु योगीराज । सद्या जिवासी देई सामराज ॥ ३

( ४५ )

## कल्याण योगीराणा

( बाडांक ७९ वरून )

धन्य तो साधु जाणा । कल्याण योगीराणा ॥ ध्रु० ॥
ज्याच्या चरणाची ऐसी ख्याती । जे शरण जाती ।
ते ते साधक सिद्ध होती । हे पावन कीर्ती ।
महिमा वर्णूं मी किती । श्रुति नेति नेति म्हणती ॥ १
माथा ठेउनी मोक्षपाणी । गुज सांगोनी कानीं ।
लावी सस्वरूप निज ध्यानीं । निज दाउनी नयनीं ।
सामराज कल्याण दानी । भक्तासी जो निदानी ॥ २

( ४६ )

## सद्गुरु माझा कल्याण

( बाडांक १३७ वरून )

नभतनयानंदनरिपु जो त्या कुळीं च जो उद्भवला ।
नगारिरिपुच्या जनकासह कुळासि घात केला ।

( १ ) दावी – १३५

अनुप्रासक सारथी बंधु रिपु धराधिपति जो जाला ।
करुणालय मोठा जाणा सुरनरहि स्तविती ज्याला ॥ १

काये मी वर्णू आतां तत्पदीं च ठेविन माथा ॥ ध्रु० ॥

केशरीरिपुपति राति अतंक तो निज जवळी ।
पौलस्तिसुत काननरिपु ठेविला निजपद कमळीं ।
कुंभोद्भवअरि ज्याते रति ना हो रम्य सकाळीं ।
अनुपम्य लीळा ज्याची कंदर्प कोटि झळाळी ॥ २
अनळउद्भवधीपनंदनप्रिय तो हा चि स्वयें गुण गातो ।
नेति नेति म्हणती ज्यातें तो सज्जनहृदयीं वसतो ।
स्वामी तो सद्गुरु माझा कल्याण जननी जनक तो ।
साम्राज्य निजसुख भोगी मंगळदायक निधि तो ॥ ३

( ४७ )

## सद्गुरु पूर्ण दयाळ

( बाडॉक २०७ वरून )

रामाजीबावाचे[1] चरणीं मन माझें लागो ।
दुस्तर हा भवसागर तरेन हें चि दान मागो ॥ १
ज्याचा निश्चय सद्गुरुचरणीं तनुमन अर्पिलें ।
पूर्णत्वाचा लाभ चि पाउनि स्वसूख अनुभविलें ॥ २
कल्याणाचे समाधीतुनिया हुंकार चि निघ ( ती ) ।
+ ज्याचा दृढ त + निश्चय दीनासी + ॥ ३
पांगरीस हे पूर्ण समाधी सुशो + ही ।
दर्शनमात्रें पावन केले जनासी + ही ॥ ४
अनुष्ठान हे हनुमंता + जयानें ।
प्रसन्न होउनि वर मा ( गि ) तला भक्ताकारणें ॥ ५

---

१ कल्याणांचे शिष्य, पांगरी मठाधिपति

ऐसा सद्गुरु (पू) र्णदयाळ हरीला तारीतो ।
आपणा ऐ (सें) करुनी भवबंधाते छेदीतो ॥ ६

( ४८ )

## श्री कल्याणचरित्र

( बाडांक २५० वरून )

कल्याण नामें अति कीर्ति ज्याची । ऐका लिला पावन हो जयाची ।
सद्भक्तिनें सद्गुरु तोषवीला । सद्भावकीर्तिध्वज ऊभवीला ॥ १

गुजर प्रांतीं असतां मग तेथुनी आले ।
बंधू दोघे चाफळ पाहुनि सुखी जाले ।
माता संगें ऐसीं तीर्थें जव पाहाती ।
समर्थाला अद्भुत वाटे विश्रांती ॥ २

देखोनि डोळां हृदईं सुखाचा । तो लोटला पूर अपार साचा ।
केला नमस्कार वडील पुत्रें । आनंदलीं पाहुनि सर्व गात्रें ॥ ३

ओ० ॥

जैसी मारुतीआंगीं गुप्त शक्ती । ते श्रीरामदर्शनें प्रगटे निश्चितीं ।
कीं निशीच्या पोटीं भगस्ती । प्रगटोनी गिळी तमातें ॥ ४
तेवीं दृष्टीं पाहुनी समर्था । अति संतोष अंबाजीपंता ।
हृदईं उगऊनि विरक्ती सर्वता । आसक्तिअंधारें दवाडिलीं ॥ ५
समर्थासी प्रार्थुनी विनती । सद्भावें केली जोडिले हस्तीं ।
मजला कृपेनें कृपामूर्ती । अनुग्रह केला पाहिजे ॥ ६
ऐकोनी तयाचें वचन । समर्थीं वोळखिलें चिन्ह ।
जेवीं उकरडां सांपडलें रत्न । पारखी म्हणे अमोल्य ॥ ७
मग कृपेनें अनुग्रह केला । तो हृदयभुवनीं प्रगटला ।
पडळ निघतां देखणी कळा । नेत्रीं च जैसी उद्भवे ॥ ८
आरिसा घांसिता साहणेसीं । तेथें चि स्वच्छता प्रगटे जैसी ।
कीं भेटी होता दीपवातीसी । वाती दीप चि होय तो ॥ ९

भक्तीविण कोरडी वाती । लावितां सहज चि विझे पुढती ।
येकीं भिजउनी धरिली हातीं । ते हि विझे क्षणेकां ॥ १०
येकीं विषय आंथरू ना पुरती । शद्बज्ञान सांजवाती ।
येक झांकाझाकी पुरती । क्रियेची वार्ता दांभिक ॥ ११
येकीं भक्तिस्नेहें ठवळीं भरली । तें स्वर्गभोग वातें मोलवली ।
आस्परा उंदिरीं चाटिली । यापरी विझाली दीपज्योती ॥ १२
प्रतिष्टा धनीं वेदशास्त्रदीप । ते विप्र मानहनीस्तव आपेआप ।
मावळोनी जाले ब्रह्मराक्षसरूप । धन कोळसे प्रतिष्टा ॥ १३
येकीं तपोतेजाचा

## ( ४९ )

## " श्रीरामवंशावळी " या श्रीसमर्थचरित्रावरून

( बाडांक २५० वरून )

+ + +   + + +

श्रोते सावध परिसा जी । हे विज्ञप्ती माझी ।
तुम्ही सर्वज्ञ समजी । जाणतसा भक्तकथा ॥ ६२
पुढें सोडिलें जनस्थान । येके स्थळीं राहो नये निस्पृहानं ।
म्हणोनि कृष्णातीरा गमन । करिते जाले स्वइच्छा ॥ ६३
तो कृष्णातीरप्रांतीं । श्री कल्याण योगभ्रष्ट मूर्ती ।
खंती बहुत चित्तीं । कैं भेटे मम स्वामी ॥ ६४
ऐसी अवस्था मानसीं । तो भेटी जाली दासासी ।
वंदूनिया चरणांसी । अनन्य भावें शरण ॥ ६५
जैसें लवण सागरासी । गंगा मीनली महोदधीसी ।
कां वायो जैसा आकाशीं । मिनला जाणा सर्वथां ॥ ६६
पुढें जगदोधाराकारणें । समर्थें अद्वैतनिरूपण ।
केलें बहु व्याख्यान । वेदशास्त्रसंमत ॥ ६७

जयाचें कवित्व पाहातां । सांडूनि जाये देहेअहंता ।
श्रीहरीची संलग्नता । बोधें होय जयाचे ॥ ६८
जयाचे बोधें अंतरीं । प्रवेश करी श्रीहरी ।
आणि षड्वैरीची वारी । होऊनि जाये सर्वथा ॥ ६९
ऐसें काव्यनिरोपण । सत्सेवकें कल्याणें ।
स्वतां केलें लेखन । समर्थकृपेकरूनि ॥ १७०
श्रीरामउपासना समर्थ । पुढें सांप्रदाय बहुत ।
वाढविला अद्भुत । वैराग्यज्ञानेकरूनि ॥ ७१

ऐसा कित्येक काळ जाल्यानंतर ।
श्रीकल्याणासी पाचारुनी सत्वर ।
ठेविते जाले अभयकर ।
जगदोधार करी तूं आतां ॥ ७२

तूं जया कृपा करीसी । तो हासल विश्वामित्रासी ।
नाहीं पार गुरुदेण्यासी । कोण पुसे सृष्टी ये ॥ ७३
ऐसा प्रतापी गहन । होयील तुझिये कृपेनं ।
म्हणोनिया अभयदान । देते जाले आपण ॥ ७४
वोवी ॥ महंतें महंत करावें । युक्तिबुद्धीनें भरावें ।
जाणते करूनि विखरावें । नाना देशीं ॥ ७५
आणि हें वचन साचें । जाणावें पैं ग्रंथसंमतीचे ।
मी न म्हणे हो वाचे । रामदास बोलविते ॥ ७६
मग श्रीभीमातीरासी । कल्याण येते जाले स्वछंदेसीं ।
जे कां ज्ञानभक्तिरासी । निस्पृहपण विख्यात ॥ ७७
पुढें मुद्गलनामें विख्यात । श्रीहरीकारणे अद्भुत ।
होऊनिया विरक्त । सोडिते जाले आश्रम ॥ ७८
फिरत फिरत सायास । येते जाले भीमातीरास ।
कल्याणवेषें जगन्निवासें । भेटी दिधली तयासी ॥ ७९

जैसी चंद्रतेची चंद्रिका । सूर्यतेची प्रभा देखा ।
नाना नग परी कनका । भिन्नत्व नाहीं सर्वथा ॥ १८०

ऐसी हे सद्गुरुपरंपरा । तारक जाली संसारा ।
श्रोते हो श्रवण करा । प्रार्थना हे तुम्हांसी ॥ ८१

ऐसी ब्रह्मभावें उत्तम । कल्याणसेवा मुद्गलाभिमान ।
करिते जाले नित्य नेम । येकात्मता करूनी ॥ ८२

अहो सद्गुरुसेवेपरते । आणिक नाहीं मोक्षदाते ।
याकारणें चित्तें वित्तें । सद्गुरुसेवा करावी ॥ ८३

या संसारसागरीं तारक । सद्गुरुसेवा चि येक ।
यावेगळे उपाय आणिक । सर्वही वृथा ॥ ८४

× × ×

( ५० )

## रघुपतिसी जसा लक्ष्मण

( बाडांक १२८५ तील श्रीसमर्थचरित्रांतून )

× × ×

शाहपुर निकट सुरापुरवासी कुलकर्णिकुमर अंबाजी ।
केला कृतार्थ दासें जो पाळी गुरु गिरा कदंबाजी ॥ ३८

तों गुरुवचपरतत्पर शाखा तोडी तवें पडे कूपीं ।
सात दिसावरि देशिक बाहे तों ये वरी सुमरूपी ॥ ३९

गुरु म्हणती तुज रामें केलें बुडतां चंनांत कल्याण ।
या हेतुस्तव अद्यप्रभृति तुला तुज म्हणोत कल्याण ॥ ४०

रघुपतिसी जसा होई लक्ष्मण, दासासि शिष्य कल्याण ।
सेवी तैसा, जेणें केले स्वपदास लोक कल्याण ॥ ४१

× × ×

---

( १ ) ?

## ( ५१ )

## कैवल्यदायक सखा

( बाडांक ६२ वरून )

श्री रामदास प्रभु पावन धन्य साधू ।
कल्याण स्वामि पुढती महिमा अगाधू ।
तेथूनिया मग पुढें तिसरी पिढी हो ।
त्या मुद्गलासि नमिजे अति आवडी हो ॥ १
राजा शिवाजी प्रभु रामराजा ।
श्री शंभु शाहू हरिभक्तिकाजा ।
ब्रह्मार्पणें हें स्थळ योगवासा ।
समर्पिलें त्या गुरु रामदासा ॥ २
परंपरा नृपवरीं निजवंशवृद्धी ।
ह्या डोंबग्राम दिधला निजमोक्षसिद्धी ।
आज्ञा समर्थ वदला नृप शीव साचा ।
पाळील तो क्षितिपती सुत भोसल्याचा ॥ ३
श्री रामचंद्र कुळदैवत भोसल्यांचें ।
प्रसन्नता गुरुकृपा फळलें फुकाचें ।
दिक्षा भली शिवनृपाप्रति योगवासी ।
प्रबोधिला गुरुवरें प्रभु रामदासीं ॥ ४
समाधिचें स्थळ निकें सुखप्राप्ति दैवा ।
तो लाधला प्रभु भला निजमोक्ष ठेवा ।
यालागि हे गुरुकृपा मुळिचीं मिरासी ।
कल्याण स्वामि प्रभु पावन योगवासी ॥ ५
श्री रामदास प्रभु पावन सत्कुळीं हो ।
सत्शिष्य तो अति निष्काम हि मंडळीं हो ।
कल्याणकीर्ति वदती जगीं संतसाधू ।
कैवल्यदायक सखा महिमा अगाधू ॥ ६

( ५२ )

## आत्मपदवी

( बाडांक ४४५ वरून )

श्रीमत्सत्यस्वरूपनित्यनिखिळानंदैकबोधोदया ।
मिथ्या दृश्य प्रपंच अभ्रपटलं न्यायें प्रकाशी दया ।
मीतूंभ्रांति हरूनि आत्मपदवी देवोनियां तारिलें ।
कल्याणद्वयमूर्ति मुद्गलरुपें कीर्तीसि विस्तारिलें ॥ १

( ५३ )

## गुरुराया श्री कल्याणा

( बाडांक २४२ वरून )

गुरुराया श्री कल्याणा । नमीतो चरणा ॥ ध्रु०
हे चि माझी विनंती । मज भक्ती ध्यावी पुरती ॥ १
तुझें नाम मुखीं गातां । हरे भवभयचिंता ॥ २
तुझा कृपावर ज्यासी । तो चि मान्य सकळांसी ॥ ३
तुझें ध्यान करी सदा । अनुभवी सदानंदा ॥ ४
महारुद्र नामें हरी । तो चि होसी ब्रह्मच्यारी ॥ ५

( ५४ )

## संस्कृत सुभाषितें

( बाडांक ६१ वरून )

कल्याणेत्यभिधेयं च कल्याणं तु करोति हि ।
कल्याणपादयो र्ध्यानं सर्वेषां तारकं भवेत् ॥ १

× × ×

रामदासो जले पातु स्थले कल्याणसंज्ञकः ।
अटव्यां मुद्गलः पातु भीमराजश्च सर्वतः ॥ ५

× × ×

( बाडांक २३५ वरून )

रामदासं च कल्याणं जगन्नाथं गजाननं ।
रंगनाथं रघोर्नाथं सखारामं नमाम्यहं ॥ ६

(५५)

## भजनें

( बाडांक ४४५ वरून )

नारायण विधि वसिष्ठ राम । रामदास कल्याण धाम ॥

× × ×

( बाडांक २३९ वरून )

सज्जनगडनिवासी । माझी रामदास माय ॥
श्रमहरणीतीरनिवासी । माझी कल्याण माय ॥

× × ×

( बाडांक २३९ वरून )

पाय तुझे गुरुराजा । दावी कल्याण महाराजा ॥ १
योगीयांचा राणा । जय जय कल्याणा कल्याणा ॥ २

(५६)

## पुण्यतिथीचे श्लोक

(१)

( बाडांक १३७ वरून )

शके षोडशे त्रीदशे आणि सा हो ।
जये नाम संवछरीं पूर्ण पाहो ।
आषाढी तिथी शुद्ध त्रयोदशीसी ।
प्रयाण स्वकल्याण मोक्षालयासी ॥ १

× × ×

(२)

( बाडांक ५५६ वरून )

सोळाशेवरी तीन जाण दशकें पंचाब्दसंख्या वसे ।
तेरावी तिथि शुक्ल पक्ष मनुज्या आषाढमासीं असे ।
वर्षाचे विजय नाम जाण बरवें श्रीसद्गुरु ध्याइजे ।
साष्टांगें नमुनी तयासि वदनीं कल्याण हे बोलिजे ॥ २

[ ३ ]

# श्री कल्याण दर्शन

हें चरित्र-लेखन नव्हे, तर चरित्र-संकलन होय; तें हि पुरें आहे, असें नाहीं. यांतील दोष आमचे आम्हांला दिसत आहेत. तेव्हां त्या दृष्टीनें वाचकांनीं या भागाकडे पहावें. या दर्शनाचीं आम्ही तीन प्रकरणें योजिलीं आहेत:

( १ ) श्री कल्याणांची कविता

( २ ) श्री कल्याणांच्या गोष्टी

( ३ ) श्री कल्याणांची जीवनकथा

या प्रमाणें कल्याणांचें त्रिविध दर्शन घेण्याचा प्रयत्न करून शेवटीं ग्रंथ

( ४ ) महाराष्ट्र - वाचकांच्या सेवेसी

प्रार्थनापूर्वक सादर करावयाचा.

गणेश शंकर दवे

# श्री कल्याणांची कविता

## प्रास्ताविक

श्री कल्याणांची ज्ञात आणि उपलब्ध या दृष्टीनें संपूर्ण कविता या ग्रंथांत महाराष्ट्रास सादर करतां येत आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. याचा अर्थ इतका च कीं, धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत असलेली कल्याणांची सर्व कविता या ग्रंथांत आलेली आहे. कल्याणांची आणखी कांहीं कविता इतरत्र कोठें असल्याचें आज माहीत नाहीं. त्यांची अज्ञात अशी हि आणखी कविता असण्याचा संभव नाहीं, असें हि नाहीं. मात्र ज्ञात असून अनुपलब्ध अशी एक च बाब आतां राहिली आहे; आणि ती म्हणजे कल्याणांनीं लिहिलेलें श्रीसमर्थांचें चरित्र होय. श्रीसमर्थांच्या पश्चात् भूतलावर ३३ वर्षें वास करणाऱ्या कल्याणांनीं समर्थांचें चरित्र लिहिलें च नसेल असें मानतां येत नाहीं. सर्व दृष्टींनीं विचार करितां कल्याणांनीं समर्थांचें चरित्र लिहिलें असण्याची च शक्यता मनाला जास्त पटते. तें त्यांनीं केव्हां लिहिलें, कोठें लिहिलें, आणि आज तें कोठें आहे, हें कसें सांगतां येईल ? पण कल्याणांनीं श्रीसमर्थांचें चरित्र लिहिलें होतें असें मानावयास जागा आहे.

ज्याचीं चरित्रें सर्वत्र गाती गीतीं ॥

असें श्रीसमर्थांवरील आपल्या एका पदांत कल्याण स्वत: च सांगत असतांना कल्याणांनीं मात्र श्रीसमर्थचरित्र गायिलें च नसेल हें संभवत च नाहीं. शिवाय, कल्याणलिखित श्रीसमर्थचरित्राचा बखरींत स्पष्ट उल्लेख आहे च कीं. तेव्हां

समर्थांसी संत महंत प्रश्न करिती ।
प्राकृत ग्रंथ काळांतरें कोठें जी राहती ।
अहो आपुलाले आराध्यदैवतीं लीन ग्रंथ असती ।
यथापूर्व प्रगटती युगांतरें ॥ प्रताप १९-२०

याप्रमाणें आपलें तितकें भाग्य असल्यास तें आपल्या हातीं केव्हां तरी लागेल हि.

पण आज या ग्रंथांत प्रसिद्ध झालेल्या कल्याणांच्या कवितेचा च विचार येथें आपणांस करावयाचा आहे. या ग्रंथांत कल्याणांच्या कवितेचे

| | | | |
|---|---|---|---|
| [ १ ] स्फुट प्रकरणें : | ७ | पदसंख्या | ७२६ |
| [ २ ] चौचरणी ओंव्या : | ५ | ,, | ८२ |
| [ ३ ] स्फुट श्लोक : | १९ | ,, | ७५ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| [ ४ ] | अष्टपदी : | १ | ,, | १० |
| [ ५ ] | सवायी : | १ | ,, | ५ |
| [ ६ ] | भूपाळ्या : | ३ | ,, | १२ |
| [ ७ ] | आरत्या : | ८ | ,, | २७ |
| [ ८ ] | पदपदांतरें : | ९७ | ,, | ५११ |
| | | | | १४४८ |

याप्रमाणें आठ भाग पाडण्यांत आलेले आहेत. त्यांचा आपण आतां क्रमशः विचार करावयाचा.



## [ १ ] श्री कल्याणांचीं स्फुट प्रकरणें

### ( १ ) महावाक्यपंचीकरण ग्रंथ

" श्री समर्थशिष्य कल्याण " या ग्रंथाविषयीं आमच्या विचारण्यावरून आम्हांस कांहीं सुचना करतांना आमच्या एका मित्रानें कळविलें कीं, " श्रीसमर्थांच्या संगतींत कल्याणांची आध्यात्मिक उन्नति कशी कशी होत गेली, आंस त्यांत अनुभव कोणते कोणते आले " याची चर्चा ग्रंथांत यावी. पण तसा आमचा कांहीं च अधिकार नाहीं याचा आम्हांस खेद होतो. आमचें हें अज्ञान प्रांजलपणें कबूल करणें भाग आहे. कल्याणांचें हें प्रकरण परमार्थपर आहे. अभ्यासाच्या दृष्टीनें कल्याणांचें हें प्रकरण श्रीसमर्थांच्या तत्त्वज्ञानाच्या निकषावर घासून पाहिल्यास तें मोठें बोधप्रद होईल. कल्याणांचा पारमार्थिक अधिकार काय होता हें जाणत्यांनीं ठरवावें. हा विषय च मोठा गहन आहे. कल्याण म्हणतात च :

अत्यंत गहन अर्थ येथें आहे ।

पण पुढें सांगतात हि :

पाहिल्याविण हें काय कळे ॥ २–१५

तेव्हां आम्हांला इतकें च दिसतें कीं, हें प्रकरण वाचून त्याचा अर्थ कोणाकोणाला कळेल हि, पण नुसत्या वाचनानें आणि वाचून अर्थ कळल्यानें अनुभव येत असेल, असें वाटत नाहीं. मग त्यासाठीं काय केलें पाहिजे ?

थोर तो प्रत्ययो सत्य विवेकाचा ।
गुरुमुखें याचा शोध होय ॥ १६

तेव्हां ज्यांना असे जाणते आणि अनुभवी मानवी गुरु असण्याचें भाग्य लाभलें असेल त्यांनीं गुरुमुखें याचा शोध घ्यावा. पण ज्यांना हें शक्य नसेल त्यांनीं श्रीसमर्थांचे चरण धरावे, आणि " माझें स्वरूप स्वतःसिद्ध " असें ज्या ग्रंथांचें वर्णन श्रीसमर्थांनीं स्वतः केलें आहे त्या " आत्माराम " आणि " दासबोध " या ग्रंथांचा आश्रय घ्यावा.

पण हें सत्य ज्ञान होण्याचा आणखी एक मार्ग कल्याणांनीं च सांगितला आहे. त्या मार्गानें हि जाणें योग्य च होईल, गेलें च पाहिजे.

रामभक्ति पूर्ण तेणें सत्य ज्ञान ।

असें म्हणून कल्याण सांगतात कीं, हें " रामदासकृपें बोलिलें कल्याणें, " कल्याणांचा अधिकार आमचा नव्हे.

## ( २ ) सोलीव सुख

हें प्रकरण कोणाचें, समर्थांचें कां कल्याणांचें, असा एक प्रश्न आहे. ती. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं हें प्रकरण कल्याणाचें मानलें आहे, आणि आम्हांला हि तसें च वाटतें. या प्रकरणांत च त्याला आधार आहे :

कल्याण म्हणे जी रामदासा । ४४

हें प्रकरण हि परमार्थपर असल्यामुळें या बाबतींत आमची ती च स्थिति आहे. जेथें जेथें परमार्थपर भाग येईल तेथें वाचकांनी आमचें हें अज्ञान गृहीत धरून च चालावें. त्याचा पुनरपि उल्लेख करणें नको.

समर्थांनीं आपल्याला रोकडें ब्रह्म कसें दाखविलें याचें वर्णन कल्याणांनीं या प्रकरणांत केलें आहे.

जे भवसमुद्रीं पोळले । विषयमदें अंध जाले ।
चौऱ्यासींत वाहूं लागले । मार्ग सुचेना तयासी ॥ २
ऐसें विश्व बहुत बुडालें । मी जीव म्हणोनी धाऊं लागलें ।
मुळींचें स्मरण विसरलें । मी कोण ऐसें ॥ ३

असें संसारसागरांत गटंगळ्या खाणाऱ्या "जीवांचें" वर्णन करून कल्याण समर्थांची प्रार्थना करितात कीं,

तयासी मुक्त करावया पूर्ण । तूं बा उतरलासी ज्ञानघन ।
रोगिया औषधी देऊन । भवमोचन करसील ॥ ४
ऐसें औदार्य तुझें सघन । म्हणोनी आलों मी शरण ।
दयार्णवा कृपा करून । मज दातारें तारावें ॥ ५
आपण आपणातें पावें । ऐसें माझे मनीं बोलावें ।
तें दातारें गोचर करावें । रोकडें ब्रह्म ॥ ६

आणि

ऐसा शिष्याचा प्रश्न ऐकोनी । ७

समर्थ म्हणाले :

बरें घेई निजवस्तु ॥ ८

असें म्हणून समर्थांनीं कल्याणांना मांडीवर घेतले व अर्ध मात्रा रस काढून

पूर्ण फुंकिले कर्णरंध्रीं ॥ ९

त्यायोगें बळकट भ्रांती पडून कल्याण निचेष्टित पडल्यावर कल्याणांच्या मस्तकीं आपला पद्महस्त ठेवून समर्थांनीं कल्याणांना निरनिराळ्या सुचना देत देत आणि आदेश करीत करीत आवश्यक तो अनुभव आणून दिल्याचें वर्णन कल्याण करितात:

स्वयें आत्मत्व प्रगटलें । माझे देहीं रोकडें ॥ ३६

नंतर समाधी उतरल्यावर

हें सद्गुरुचें देणें । काय उत्तीर्ण मी व्हावें ॥ ३७

असे कृतज्ञतेचे उद्गार काढून कल्याणांनीं श्रीसमर्थांची स्तुति केली आहे.

जय जया जी करुणासिंधु ! जय जया जी भवरोगवैदु ।
जय जया जी बाळबोधु । कृपाघना समर्था ॥ ४०

जय जया जी अविनाशा । जय जया जी परेशा ।
जय जया जी अध्यक्षा । दयार्णवा ॥ ४१

जय जया जी पूर्णचंद्रा । जय जया जी अलक्षविहारा ।
जय जया जी भवसमुद्रभास्करा । आनंदप्रभू ॥ ४२

एका वाक्यांत :

कल्याण म्हणे जी रामदासा । माझा मुकेपणाचा ठसा ।
ते मोडुनी वसोसा । मज आपणाऐसें केलें ॥ ४४

कल्याणांचें हें वचन ऐकून समर्थांनीं त्यांना कुरवाळलें, आणि

गुरुशिष्य हें बोलणें । उरलें नाहीं ते वेळीं ॥ ४५
येकपणें येक चि जालें । ऐक्यरूपीं सम मिळालें ।

आपण आतां आणखी कांहीं सांगत नाहीं, असें म्हणून

श्रीराम दाशरथीची आण ।

घेऊन कल्याण सांगतात :

येकपत्नी तो सुजाण । आपलें पद दे दासा ॥ ४९

आपल्या अनुभवाचें – येकपणें येक चि जालें या स्थितीचें – आपलें पद दे दासा या अर्थाचें – असें च वर्णन आणि तें हि रामाची च शपथ घेऊन श्रेष्ठांनीं एके ठिकाणीं केलें आहे.

माझा राम अवघा चि आपण । दुसरें नाहीं त्याची च आण ।
हें स्थित न मोडतां स्वामीसेवकपण । दिधलें ऐसा उदार ॥

( ३ ) श्री शुक आख्यान

शुकाची कथा सर्वांना च परिचित आहे. त्यांत नवीन असें कांहीं नाहीं. इतरांच्या वैराग्याची महती सांगतांना तें शुकासारखें असल्याचें वर्णन करण्यांत येतें. त्या शुकाची कथा गाण्याचें कल्याणांच्या मनांत यावें यांत नवल नाहीं.

महा घोर अरण्यांत तारुण्यकाळीं शुकानें आरंभिलेली वैराग्ययुक्त तपश्चर्या पाहून, आतां आपल्यास धोका उत्पन्न होणार या भीतीनें शचिपति इंद्राला धाक सुटला, आणि आपला नेहमींचा च उपाय योजण्याचें ठरवून तो रंभेस म्हणाला :

दिसे स्पष्ट आरिष्ट माझ्या सुखासी । त्वरें सत्वरा बांध पाशीं शुकासी ॥ ४

" क्षणामाजि जिंकोनि येतें तयासि " असें इंद्राला सांगून आपलीं स्त्रीसुलभ आयुधें घेऊन रंभा शुकासमोर येऊन ठाकली, आणि तिनें आपले उपाय योजण्यास सुरुवात केली. आपल्या धर्मकार्यांत हें विघ्न आलें हें शुकांनीं ओळखलें. पण नेहमीं च अशा कामगिरीवर जाऊन जिंकण्याचा सराव झालेल्या रंभेला पराजयाचा नवीन च अनुभव यावयाचा होता.

तुझ्या उदरीं जन्मतो पुण्यरासी । तरी पावतो सूखसंतोषराशी ॥ १२

असें शुकांनीं म्हणतां च

दधीजा म्हणे कोण आश्चर्य मोठें । चमत्कारिली, चाकिली युग्मवोटें ॥१३

आणि

चळेना शुकेंद्रू महायोग ठाणीं ॥ १४

ही तिची खात्री झाली. हें वर्णन करितांना

शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें ।

अशी महती ज्या समर्थांची, त्या आपल्या श्रीसमर्थांचे स्मरण कल्याणांना न होणें अशक्य होतें. समर्थांची आठवण होऊन च कल्याण म्हणतात :

रिपु षष्ट जिंकी असा कोण साधू । १५

कल्याणांना समर्थांची आठवण झाली आणि त्या निमित्तानें आपल्याला श्रेष्ठांनीं समर्थांना पाठविलेल्या त्या एकश्लोकी पत्राची आठवण होते.

लावण्य सौंदर्य तारुण्यनारी । चातुर्यता चंचळ चित्तहारी ।
येकांत काळीं पडतां समंधु । अभिलाष न करी तो धन्य साधु ॥

आणि श्रेष्ठांच्या या पत्राला समर्थांनीं पाठविलेलें उत्तर सर्वांना ठाऊक च आहे.

कल्याणांना समर्थांची आठवण झाली आणि समर्थांच्या पश्चात् त्यांच्या प्रमुख प्रमुख शिष्यांत सुरु झालेल्या वादाचें स्मरण होऊन – पण बहुधा त्या च वेळीं म्हणजे हें आख्यान रचण्याचे वेळीं हा वाद चालू च असल्यामुळें – त्या च श्लोकांत लागली च पुढें कल्याण म्हणतात :

वृथा भांडती निंदिती येकमेका । भरा दुर्भराकारणें शिष्यशाखा ॥ १५

श्रीसमर्थांच्या पश्चात् दिवाकर गोसावी आणि उद्धव गोसावी यांच्यांत झालेल्या वादाला च उद्देशून हे दोन चरण असले पाहिजेत हें उघड आहे. समर्थांचें स्मरण होऊन कल्याणांना गहिंवर आला असला पाहिजे आणि प्रमुख समर्थशिष्यांची ही वृत्ति पाहून ते कष्टी झाले असले पाहिजेत. आणि म्हणून

सहस्रामधें वीरुळा येक संतू । १६

हें ध्यानीं घेऊन

महीमंडळीं माजलीं थोर बंडें । १७

तेव्हां आतां आपलें ऐकायला आणि मानायला सवड आहे कोणाला, आणि आपण कांहीं सांगितलें तरी त्याचा उपयोग होणार नाहीं, उगीच स्वतःला च मात्र शीण होणार, असें वाटून

असो बोलतां बोलतां शीण होतो । प्रभू रामचंद्राविणें काळ जातो ॥ १७

असें कल्याणांना म्हणावें लागलें यावरून त्या वेळीं सांप्रदायिकांची स्थिति कशी होती, आणि या शहाण्याशहाण्यांच्या भांडणाला कल्याण कसे कंटाळले होते हें दिसून येतें. आणि म्हणून च अंतर्मुख होऊन, जणूं कांहीं स्वतःचें च वर्णन करीत असल्यासारखें, कल्याण म्हणतात :

गुरुची दया ऊदया सीघ्र पावे । तरी अंतरी विश्रमानंद फावे ।
नसे वैर निर्वैरता आत्मदृष्टी । जगीं धन्य तो धन्य कल्याण सृष्टी ॥ १८

## ( ४ ) ध्रुवाख्यान

ध्रुवाची कथा आबालवृद्धांना ठाऊक असते. दृढ निश्चयाच्या बळावर परमेश्वरालाहि वश करून घेऊन आपलें कार्य कसें साधून घेतां येतें, अढळ पद हि कसें मिळवितां येतें, हें या कथेचें एकंदरींत तात्पर्य आहे. परमेश्वर हि आपलासा

करून घेतां येतो, अढळपद हि मिळवितां येतें, मग ऐहिक फलांची शंका च कशाला, तीं मिळणार च, हा या कथेचा ध्वनि आहे.

जावें घोर अरण्य दुर्घट दरी कीं पर्वती कर्मरी ।
निर्वाणीं त्यजि प्राण हा, मग पदा देईल तो श्रीहरी । ७

ध्रुवाच्या आईनें ध्रुवाला दाखविलेल्या परमेश्वरप्राप्तीच्या या मार्गाला कल्याणांनीं "सन्मार्ग" म्हटलें असून, या मार्गदर्शनाबद्दल ध्रुवाच्या आईला धन्यवाद दिले आहेत.

सन्मार्गें चि प्रबोधिलें जननिये तूं धन्य हो या जनीं ॥ ७

ध्रुवाची कथा गावी असें आपल्याला कां वाटलें याची कल्याणांनीं जीं दोन कारणें दिलीं आहेत, त्यांत पहिलें कारण ते देतात :

ध्रुवाची कथा सत्पथा मोक्ष दावी ।

## (५) रुक्मिणीस्वयंवर हिंदुस्तान

विवाहविषयक कोणत्या च कथेकडे कल्याणांचें लक्ष गेल्याचें दिसून येत नाहीं. विवाहविषयक कथा च त्यांना गावयाची असती, तर त्यांनीं सीतास्वयंवराकडे च आपलें लक्ष वळविलें असतें, हें च जास्त संभवनीय. पण विवाहविषयक कथा गावयाचें त्यांच्या मनांत येणार च कसे ? मग सीतास्वयंवराकडे न वळतां त्यांनीं रुक्मीणीस्वयंवर च वर्णिलें आणि तें हि हिंदुस्तानींत, हा काय चमत्कार म्हणावा ? आम्हांला एक च तर्क सुचतो. कृष्णलिला उत्तर हिंदुस्थानांत प्रिय फार. तेव्हां त्या भागांतील समर्थशिष्यांना आणि मठपतींना प्रचारकार्याला उपयोगी पडावें म्हणून च कल्याणांनीं रुक्मिणीस्वयंवर वर्णिलें, आणि तेवढ्या च साठीं तें हिंदुस्तानींत वर्णिलें. हा आमचा केवळ तर्क हें तर खरें च, पण तो "श्री समर्थहृदय" या ग्रंथांतील ती. शंकर श्रीकृष्ण देव यांच्या एका विधानावर आधारलेला आहे.

## (६) ओव्या संतमाळा

श्री रामदास आणि रामदासी मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या "श्री सांप्रदायिक विविध विषय – प्रथम खंड" या ग्रंथांत ही संतमाळा पूर्वीं च देण्यांत आली आहे. त्यावेळीं देवांनीं लिहिलेलें टांचण च परिशिष्टांत* देण्यांत येत आहे. तिकडे वाचकांचें लक्ष जाईल च. त्याशिवाय आणखी निराळें आम्ही तें काय म्हणणार ?

* पहा परिशिष्ट सातवें.

(७) श्री रामदास

नमस्कार माझा तया दासबोधा ॥

असा शेवटचा चरण असलेले आठ श्लोक. मूळ बाडांत च या आठ श्लोकांना "श्री रामदास" हें नांव दिलेलें आहे, तें

आत्माराम दासबोध । माझें स्वरूप स्वतःसिद्ध ।

या श्रीसमर्थवचनाला धरून च आहे. या आठ श्लोकांत कल्याणांनीं दासबोधाची महती वर्णिली आहे. पण असें हि असणें अशक्य नाहीं, कीं आपण ज्याप्रमाणें आरंभीं "श्रीराम", "श्रीरामसमर्थ" असें कांहीं लिहितों त्याप्रमाणें बाड-लेखकानें या प्रकरणाच्या मथळ्यावर "श्री रामदास" असें लिहिलें असेल.



## [ २ ] श्री कल्याणकृत चौचरणी ओव्या

( १ ) रामनामकथा, ( २ ) पांगुळ मी देवा, ( ३ ) रामपाई दास कल्याण जहाले, ( ४ ) माझ्या स्वामीचें वचन, व ( ५ ) गुरुकृपा, असे पांच अभंग मिळून ४ + २१ + २३ + २१ + १३ अशा या एकंदर ८२ चौचरणी ओव्या आहेत. या अभंगांचा आतां आपण थोडक्यांत विचार करूं.

### ( १ ) रामनामकथा

रामनामकथारुपी गोदावरीच्या डोहांत बुडी मारल्यास ' आनंदभुवन ' प्राप्त होतें अशी रामनामकथेची महती सांगतांना गोदावरीच्या जवळ आपली जन्मभूमि असल्याचा उल्लेख कल्याणांनीं केला आहे.

### ( २ ) पांगुळ मी देवा

या पांगुळांत आरंभीं कल्याण रामरायाला विनवितात :

पांगुळ मी देवा मज कोण्ही नाहीं । कृपादृष्टि पाही रामराया ॥ १
रामराया तूं चि नाथ अनाथाचा । मायेबाप साचा तूं चि माझा ॥ २
तूं चि माझा स्वामी गणगोत सर्व । तुजाविणें ठाव नाहीं आम्हां ॥ ३
आम्हां नाहीं कोण्ही प्रपंचीं पाहाता । येई दिनानाथा माहियेरा ॥ ४
माहियेर माझे सितापती देव । तेथें अंतर्भाव निरंतर ॥ ५
निरंतर देव सर्वांचे अंतरीं । सर्व चराचरीं नांदतसे ॥ ६
नांदतसे सर्व भूमंडळभरी । भरि ये उभरी तुझी देवा ॥ ७
तुझी देवा सत्ता सर्व भूमंडळीं । आकाशीं पाताळीं तूं चि देवा ॥ ८
तूं चि देवा गुरु तूं चि देवा शिष्य । ज्ञानाचा प्रकाश तूं चि देवा ॥ ९
तूं चि देवा वल्ली तूं चि देवा रस । स्वाद हा विशेष नाना फळीं ॥ १०

याप्रमाणें रामाची विनवणी करून कल्याण आपल्याला सांगतात :

नाना फळीं मूळीं जळीं स्थळीं पहा । पाहोनिया राहा रामरूपीं ॥ ११

आणि नंतर महावाक्याचें थोडक्यांत विवरण करून, आपलें समाधान झाल्याचा अनुभव सांगतांना कल्याणांनीं या पांगुळाची फलश्रुति दिली आहे, ती अशी :

फळा आलें ऐसें पांगुळ बोलिलें । समाधान जालें अनूभवें ॥ २०
अनुभव कैसा पांगुळाचा पाहा । पाहोनिया राहा निजरूपीं ॥ २१

याचा अर्थ असा कीं, रामरूप म्हणजे च निजरूप म्हणजे च ब्रह्म.

## ( ३ ) रामपाई दास कल्याण जहाले

गणिका, अजामिळ, पिंगळा. गजेंद्र, कावळा, भिल्लीण अहिल्या, गूहक, सुग्रीव, वाली, मारुती, समुद्र, वेरियाचा बंधु बिभीषण, राक्षस, अयोध्या नगर, अस्वलें, वानरें या सर्वांचा उद्धार रामामुळे झाला असें सांगून कल्याण म्हणतात :

खग मृग पशु उद्धरी सर्वेशू । कांहीं गुणदोषू न पहातां ॥ ११

आणि रामरायाने आपल्या पाठीमागें

कलियुगी दास उद्धरायालागी । मारुती निसंगी ठेवियेला ॥ १९

आपल्या पाठीमागें ' दास उद्धरायालागी ' रामांनीं मारुतीची योजना केली खरी, पण मारुती कोणाला पावतात, कोणाचा उद्धार करतात ?

चहूं वर्णां नामीं अधिकारु बोलिला । जन उद्धरिला नेणो किती ॥ २०

नामछंद जया लागलासे ध्यास । तयास विश्वास रामपाई ॥ २२

रामपाई दास कल्याण जहाले । पदीं स्थिरावले श्रीगुरूच्या ॥ २३

॥ श्री राम जय राम जय जय राम ॥

सर्व साधुसंतांप्रमाणे कल्याणांनां नाममहिम्यावर फार भर दिला आहे: त्यांचे स्फुट श्लोक आणि पदपदांतरें यांच्या आधारानें या बाबीचा विचार आपण पुढें करणार च आहोंत.

## ( ४ ) माझ्या स्वामीचें वचन

आपण पतित होतों, ते श्रीसमर्थचरणांमुळें पावन झालें, श्री समर्थांच्या चरणांचें दर्शन होतां च आपलें समाधान झाले, असें सांगून कल्याण आपल्याला आश्वासन देतात कीं,

समाधान घडे बहुता सुकृतीं । सज्जनाचे चित्तीं मिळों जातां ॥ ३

आणि नंतर

दारोदारीं जैसें श्वान हिंडतसे । काम क्रोध वसे हृदयामाजीं ॥ ७
हृदयामाजीं काळकूट हे कल्पना । दिसे वृंदावना बाह्याकार ॥ ८
बाह्याकारें स्नान बाह्याकारें संध्या । बाह्याकारे विद्या दावीतसे ॥ ९
दावीतसे जना नाना परी भाव । बुडतयाचा पाव खोलाकडे ॥ १०
खोल हा संसार तयांत बुडाला । धोका हा लागला रात्रंदीस ॥ ११
उठतां बैसतां करी नाना चिंता । सज्जनाच्या चित्ता कानकोंडे ॥ १५
कानकोंडे जाले तया मुक्ति कैंची । जितां चि पावती नर्कपात ॥ १६

असें संसारी जनांचें वर्णन करून या जिवंत नर्कवासांतून सुटण्याचा मार्ग हि कल्याणांनीं सांगितला आहे.

नर्कपात चुके सज्जन सेवितां । १७

" सज्जन सेवितां ! " आणि सज्जन म्हणजे

सज्जनगडनीवासि माझी रामदास माय ।

माझी रामदास माय ॥

हें काय सांगावयास हवे ? सज्जन म्हणजे श्री समर्थ रामदास हा अर्थ आपण आज करीत नाहीं. " सज्जन " असें श्री समर्थांचें एक नांव होतें हि. शिवाय, सज्जन म्हणजे श्री समर्थ, साधु म्हणजे श्री समर्थ हे अर्थ तेव्हांपासून चालत आले आहेत. श्री समर्थांवरील आपल्या पदांत श्री समर्थांचा उल्लेख कल्याणांनीं " सज्जन " आणि " साधू " या शब्दांनीं अनेक वेळां केलेला आहे.

बाईये गे मजला वेधु लागला सज्जनाचा । ८

रे सखया सज्जन दुर्लभ रे । १९

साधू रे धन्य साधू रे ॥ २

ग बाईये पतीतपावन साधू । चित्तीं अखंड लागला वेधू । ११

तो चि तो साधव रे । २२

साधवपायीं रत कांहीं साधका ॥ २३

नर्कपात चुकविण्यासाठीं " सज्जनांची सेवा " हा मार्ग आपण आपल्या पदरचा सांगत नसून, कल्याण म्हणतात, हा च मार्ग

सर्व शास्त्र गीता बोलतसे ॥ १७

शास्त्र आणि गीता यांचा च आधार कशाला असे वाटून, त्याहून हि थोर अशा आपल्या स्वामींनीं – श्री समर्थांनीं – तें च सांगितले असल्याचा हवाला कल्याणांनीं दिला आहे.

बोलतसे माझ्या स्वामीचें वचन । सर्व हि सज्जन समाधान ॥ १८

या वेळीं कल्याणांच्या नजरे समोर

दिसेना जें गुप्त धन । तयासि करणें लागे अंजन ।
गुप्त परमात्मा सज्जन – । संगतीं शोधावा ॥ ६–९–१९

रायाचे सान्निध होतां । सहज चि लाभे श्रीमंतता ।
तैसा हा सत्संग धरितां । सद्वस्तु लाभे ॥ २०

म्हणौन संसार सांडावा । मग साधूचा शोध घ्यावा ।
फिरफिरों ठाइं पाडावा । साधुजन ॥ २०-३-२६

हीं व आणखी असलीं श्री समर्थांचीं वचनें असणार, हें उघड आहे.

समाधान साधुजनाचेनि योगें । करुणाष्टक - १

असा च आपला हि अनुभव कल्याण सांगत आहेत :

समाधान जालें सज्जना सेवितां । मुक्ति सायोज्यता घर रिघे ॥ १९
घर रिघे ऋद्धिसिद्धि हे पहातां । मनांत तत्त्वतां रामरूप ॥ २०
रामरूप सर्व कल्याण अंतरीं । कीर्ति निरंतरीं जगामाजीं ॥ २१

तेव्हां कल्याणांनीं दाखविलेल्या या मार्गानें जाण्यांत च आपलें कल्याण आहे, नाहीं कां ?

## ( ५ ) गुरुकृपा

" जनीं जनार्दन " हें खरें असून हि वंद्य आणि निंद्य, रंक आणि राव, मूर्ख आणि संत, पापी आणि भक्त, असे नाना परींचे भेद तत्त्वतः रहाणार असले, तरी

पहातां पहातां सकळ हि वाव । पहाणारासी ठाव भिन्न कैचा ॥ १०
कैचा हा विवेक परब्रह्म येक । तेथें येकानेक आडळेना ॥ ११
आडळेना तुर्या आडळेना ज्ञान । पुढें हें विज्ञान ब्रह्मरूप ॥ १२

असें सांगून

ब्रह्मीं ब्रह्म पूर्ण कल्याण संपूर्ण ।

हें ज्या गुरुकृपेचें फळ त्या गुरुकृपेकडे कल्याणांनीं आपलें लक्ष या अभंगांत खेचलें आहे.



## [ ३ ] श्री कल्याणकृत स्फुट श्लोक

१९ मथळयांखालीं हे ७५ श्लोक आहेत. कल्याणांच्या या ७५ श्लोकांत निरनिराळे अनेक विषय आले असले तरी मुख्यतः ( १ ) शिष्यवर्णन, ( २ ) श्री क्षेत्र चाफळ, ( ३ ) श्रीपत्रिका, आणि ( ४ ) नाममहिमा, या चार च बाबींचा आम्ही येथें विचार करणार आहोंत.

### ( १ ) शिष्यवर्णन

" नव्हे तो चि तो शिष्य मोक्षाधिकारी " हें सांगण्यासाठीं ५ श्लोक आणि " जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी " हें सांगण्यासाठीं ५ श्लोक, असे शिष्यवर्णनात्मक १० श्लोक कल्याणांनीं रचिले. पैकीं पहिल्या ५ श्लोकांत शिष्यांचीं जीं कुलक्षणें कल्याणांनीं कथन केलीं आहेत, त्यांतील अहंमन्यता, दुसऱ्याला कुशब्दांनीं धिःकारणें, टवाळी करणें, षड्विकारांनीं जर्जर होणें, मोठेपणासाठीं तळमळणें, नाना प्रकारचे भाव दाखविणें, वगैरे लक्षणांकडे लक्ष जाऊन आणि यांत कोठें आपलें च तर वर्णन नाहीं ना असें मनांत येऊन, आपआपला जीव कासावीस होतो कां याचा विचार वाचकांनीं करावा, आणि आपआपल्या मनाशीं काय तें ठरवावें. आपले दोष दाखविणाऱ्या इतका परोपकारी आणि कल्याणकारी मित्र आणि हितचिंतक आपले दुसरे कोणी असूं शकत नाहीं. ते आपले दोष दाखवितात, आणि कांहीं तर न बोलून हि सांगतात, म्हणून तरी आपण इतपत बरे ( ? ) आहोंत. नाहीं पेक्षां आपली स्थिति काय झाली असती कोणी सांगावी ? त्यांच्या या दोषदर्शनाचा फायदा आपण करून घेतला पाहिजे.

आणि म्हणून आपल्याला असा अनुताप व्हावा, अशी उपरति वाटावी, कीं हीं सारीं कुलक्षणें जाऊन त्यांच्या ठिकाणीं,

जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥

हें सांगण्यासाठीं दुसऱ्या ५ श्लोकांत कल्याणांनीं सांगितलेलीं – विरक्तपणा, क्षमा, परोपकार, गुरुठायीं अनन्यता, दयाळुत्व, कोणाचे हि गुणदोष न पहातां गुरुदासांचें हि दास्य करण्याची तयारी, जनकाचें विदेहीत्व, हीं सद्‌शिष्याचीं लक्षणें – इतर सुलक्षणांसह – आपल्या ठायीं अशी बाणावीं कीं,

नव्हे तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥

असें म्हणणाऱ्या, जवळच्या आणि दूरच्या, कोणाला हि

तया दर्शनें सर्व कल्याणकारी । जनीं तो चि तो शिष्य ज्ञानाधिकारी ॥

असें म्हणणें भाग च पडावें. बाकी दुसऱ्यांनीं असें म्हणावें म्हणून च तेवढें आपण

असें व्हावें, असें मात्र नाहीं. पण हें सारें कोणापाशीं आहे? आपलें आपल्यापाशीं. फक्त कल्याणांनीं दाखविलेल्या मार्गानें जाण्याचें आपल्या मनांत मात्र आलें पाहिजे.

## ( २ ) श्री क्षेत्र चाफळ

पृष्ठांक ५७ वरील "स्थळ येरमाळें येडेस्वरीचें" या ५ श्लोकांत कल्याणांनीं चाफळचें वर्णन केलें आहे. त्या ठिकाणीं

वसताति साधू मोक्षश्रियेचे ।

असें कल्याणांनीं सांगितलें आहे. आणि 'साधु' म्हणजे श्री समर्थ हें आतां आपण जाणतों.

मोक्षश्रिया आळंकृत । ऐसे हे संत श्रीमंत ।
जीव दरिद्री असंख्यात । नृपती केले ॥ १–५–२१

हें श्री समर्थांनीं संतांचें केलेलें वर्णन च कल्याणांनीं "साधु मोक्षश्रियेचे" या शब्दांनीं समर्थांचें केलें आहे. मात्र नुसत्या एवढ्यावरून च हे श्लोक चांफळासंबंधी आहेत असें म्हणतां यावयाचें नाहीं. पण कल्याणांनी पुढें सांगितलें आहे.

हे धर्मशाळा जनपावनाची । रमणीय छाया रंभावनाची ।
जाली च वस्ती जगजीवनाची । आखंड आर्ती वृंदावनाची ॥ २
जाली च नवमी रघुनाथजीची । गेली दिगांताप्रति कीर्ति ज्याची ।

तेव्हां चाफळला समर्थांनीं श्री रामाची स्थापना केल्यानंतर हे श्लोक कल्याणांनीं केले हें उघड होतें. अंतर्गत पुराव्यावरून कल्याणांनीं कोणतें कवन केव्हां केलें असें ज्या दोन चार स्थळांविषयीं अनुमानितां येतें, अशा स्थळांपैकीं हें एक स्थळ होय.

आखंड आर्ती वृंदावनाची ॥

कल्याणांच्या काळीं चाफळला कोणत्या वृंदावनाची अखंड आरती होत असे, आणि ती कां, हें सांगतां येत नाहीं. पृष्ठांक ७४ वरील

वोवाळा वोवाळा तुळसी । वृंदावनेंवासी ।

या आरतीचें स्मरण या ठिकाणीं सहज च होतें. त्या आरतीचा आणि या श्लोकांतील वृंदावनाचा कांहीं संबंध असल्यास न कळे.

## ( ३ ) श्रीपत्रिका

'श्री पत्रिका' म्हणजे रावणाच्या बंदीशाळेंतून ब्रह्मदेवानें श्री रामाला पाठविलेलें पत्र. या पत्रिकेचे ११ श्लोक आहेत. ही पत्रिका वाचून श्री

समर्थांच्या 'लघु रामायण' या प्रकरणांतील खालील श्लोकांचें आपणांस स्मरण होतें.

समीर लोटितो खडे । वरुण घालितो सडे ।
मयंक साउली धरी । मळीण पावकु हरी ॥ १३
विधी विधीस धाकतो । सुरेंद्र बाग राखतो ।
करावयास निग्रहो । भुमंडळासि विग्रहो ॥ १४
अखंड चाकरी करी । सदा वरुची भादरी ।
सटी आरंधळी दळी । गणेश गाढवें वळी ॥ १५
परोपरी विटंबणा । वदेल कोण रावणा ।
उदंड देव पीडिले । मदें पदासि खंडिलें ॥ १६
बहु कठीण काळ हो । समस्त पावले मोहो ।
हिणादिनाचिया परी । सदा गळीत अंतरीं ॥ १७
समस्त केश लांबले । कितेक वेस्त लोंबले ।
नखेंचि योग साधले । समस्त देव गादले ॥ १८

रावणाच्या बंदीशाळेंतील देवांच्या दैन्यावस्थेचें जवळ जवळ असें च वर्णन कल्याणांच्या या पत्रिकेंत आहे. रावणाच्या बंदीशाळेंत कोणत्या देवाला कोणतें हलकें काम करावें लागत आहे तें, श्री रामाला पाठविलेल्या आपल्या या पत्रांत, सांगून शेवटीं ब्रह्मदेव रामरायांची प्रार्थना करितात :

कल्याण दासा करी रामराया । लंकार्णवीं देव जाले मराया ।

रावणाच्या बंदीशाळेंत पडलेल्या ३३ कोटी देवांची ही प्रार्थना रामरायानें ऐकली, आणि

रणीं वधूनि रावणा । विभीछेता रणांगणा ।
बळें धडाडिला नभीं । विशाळ देव दुंदुभि ॥ ल. रा. १०४
निरोध बंद तुटले । समस्त देव भेटले ।
मृदोत्तरें चि उत्तरें । बहुस्तुती परस्परें ॥ १०५
समस्त देव हरुषले । कुशमभार वरुषले ।
जयो जयो सितापती । सुखें बहुत गर्जती ॥ १०६

रावणाच्या बंदीशाळेंतील ३३ कोटी देवांची मुक्तता रामरायानें केली या घटनेकडे समाजाचें लक्ष वेधण्यांत श्रीसमर्थकल्याणांचा विशिष्ट हेतु होता, हें सर्वमान्य झालें आहे. जो अनुभव देवांना एकदां आला, महाराष्ट्राला हि एकदां आला, तो च अनुभव महाराष्ट्राला आणखी हि एकदां कां येणार नाहीं ? तोपर्यंत आपली प्रार्थना एक च.

कल्याण दासां करी रामराया ।
तुझ्या भारतीं लोक जाले मराया ॥

## ( ४ ) नाममहिमा

नाममहिम्याविषयीं विचार करितांना पृष्ठांक ६८ वरील सवायी, आणि पृष्ठांक ११६ ते १२० वरील 'नाममहिमा' या मथळ्याखालील ९ पदें यांचा विचार या च ठिकाणीं करणें योग्य होणार आहे. या शिवाय इतरत्र हि संधी मिळाली तेथें तेथें नामस्मरणाकडे आपलें लक्ष कल्याणांनीं वेधलें आहे. या ग्रंथाच्या संपादनांत झालेल्या आणि माझ्या मला माहीत असलेल्या अनेक चुकांपैकीं एका चुकीचा उल्लेख येथें केला पाहिजे. पृष्ठांक ६८ वरील "हें महिमान स्मरणाचें" ही सवायी पृष्ठांक १२० वर "नित्य करितां श्रीरामस्मरण" हें पद म्हणून छापली गेली आहे. असो.

इतर सर्व च साधुसंतांप्रमाणें कल्याणाचा हि नामस्मरणावर विशेष भर असल्याचा उल्लेख आपण एकदां वर केला च आहे. आतां हें च पहा ना, १९ मथळ्यांखालील ७५ श्लोकांपैकीं ७ मथळ्यांखालील २७ श्लोक आणि ९७ पदां पैकीं ९ पदें कल्याणांनीं नाममहात्म्याकडे दिलीं आहेत.

अनेक उदाहरणें देऊन आपल्या मनावर नामस्मरणाचें महत्त्व ठसविण्याचा प्रयत्न कल्याणांनीं केला आहे.

वदा रे वदा राम रामेति वाणी ॥
नामछंद वदनीं वदवीत जावे ॥

अशा वारंवार केलेल्या नुसत्या आग्रहानें आपण ऐकणार नाहीं असें, जणूं कांहीं, वाटून च कल्याण सांगतात, बाबा रे, या योगें तुझें सारें पाप जळून नाहींसे होईल.

तें नाम घेतां अघ सर्व जाळी ॥

पाप नाहींसें होण्याची आशा दाखविली, तेव्हां आतां तरी नामस्मरणाकडे आपलें लक्ष लागेल असें कदाचित् मनांत येऊन कल्याण नामरुपाची लूट करण्यास सांगतात, पण आणखी एकदां सांगितलेलें बरें असें वाटून च कीं काय म्हणतात :

रामनामाचें भांडार लुटा ।

पण एवढ्यानें हि आम्ही नामस्मरणाचा छंद घेऊं च असा विश्वास कल्याणांना वाटला नसावा असें दिसतें. नाहीं पेक्षां जन्ममरणाच्या येरझाऱ्यांचा बागुलबोवा आमच्यापुढें उभा करण्याचें त्यांच्या मनांत च कां येतें ? यामुळें तरी आपलें लक्ष तिकडे लागेल असें वाटून कल्याण कळवळून सांगतात कीं, हरिस्मरणानें तुझें जन्ममरण चुकणार आहे रे,

हरिस्मरणें रे चुकतीं जन्ममरणें रे ॥

आणि विनवितात :

म्हणउनि स्मरा रे स्मरा रामराया ॥

एवढ्यानें वाटली कां कल्याणांना आपल्याविषयीं खात्री ? नाहीं वाटली ! पण निराश झाले तर ते श्रीसमर्थांचे कल्याण च कसले ! कारण, तूं शहाणा ना बाळ, असें लहान बालकाला चुचकारावें, त्याप्रमाणें आपल्याला 'भले साधु' म्हणून चुचकारीत चुचकारीत कल्याण पुन्हां सांगत च आहेत :

म्हणउनी राम राम जपा हो । भले साधु राम राम जपा हो ।
श्रीराम जय राम जय जय राम राम जपा हो ॥

पण आपली काळजी त्यांना असल्यामुळें च एवढ्यावर हि कल्याण आपल्याला सोडीत नाहींत. त्यांना पुन्हां सांगावेंसें च वाटतें कीं, अरे, नामस्मरणानें परमेश्वर आपलासा होतो, नामस्मरण करणाऱ्या

दीनापाशीं तिष्ठतु हृषीकेशी ॥

नामस्मरणानें परमेश्वरप्राप्ति होते, असें आपल्याला कल्याणांनीं सांगितलें काय, किंवा

निःकाम भजनें भगवंत जोडे ।

असें श्रीसमर्थांनीं सांगितलें काय, किंवा

मत्भक्ताः यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ॥

असें निष्काम भजनानें प्राप्त होणाऱ्या खुद्द भगवंतानें हि आपल्याला सांगितलें काय, आपणा संसारी जनांना त्याचें काय होय ? परमेश्वर, आणि त्याची प्राप्ति, या साऱ्या मरणानंतरच्या ना गोष्टी, त्यांचा विचार विषयजनित सुखांचा हव्यास करणाऱ्या आपण प्रपंची जनांनीं आज कां करावा ? ती बाजू आपल्यासाठीं नव्हे च मुळीं ! उलट नित्य जन्मुनी मरण सोसावें असें वाटणारे आणि असें वाटणाऱ्यांचें कौतुक करणारे आपण, आपल्याला परमेश्वराची चिंता कशाला ? वाटतें कीं, ही आपली संसारी जनांची वृत्ति ध्यानीं घेऊन च कल्याण म्हणत आहेत, पाप जळून नाहींसे होण्याची आवश्यकता तुम्हांला वाटत नाहीं, जन्ममरणांच्या

फेऱ्यांतून आपली सुटका व्हावी असें हि तुमच्या मनांत येत नाहीं, एवढें च काय पण परमेश्वरप्राप्तीचें महत्त्व हि तुम्हांला पटत नाहीं, होय ना ? ठीक तर, मला ठाऊक आहे कीं, तुम्ही संसारी जन आहांत; आपल्या ऐहिक कल्याणाची आणि आपल्या कामना पूर्ण होण्याची च तेवढी तुम्हांला चिंता वाटते हें हि मी जाणतों, आणि म्हणून च आतां तुम्हांला सांगतों – हें कल्याण म्हणत आहेत, मी नव्हे – कीं, या हि दोन्हीं गोष्टी या च मार्गानें साध्य होतात,

**नाम जपतां कल्याण अहर्निशीं ।**

आणि

**नामनिष्ठे कामना पूर्ण होती ॥**

आपलें कल्याण व्हावें असें तुम्हां आम्हां सर्वांना च वाटतें ना ? आपल्या कांहीं इच्छा आहेत, त्या पूर्ण व्हाव्यात असा ध्यास आपण घेतला आहे ना ? मग दुसऱ्या कशासाठीं नसलें, तरी एवढ्या च साठीं कां होईना, कल्याणांनीं दाखविलेला नामस्मरणाचा हा मार्ग आपण चोखाळावयास नको कां ?

नामस्मरणाच्या बाबतींत उदासीन असणाऱ्यांना कल्याण जणूं शाप च देत आहेत :

**जेथें श्रीरामविस्मरण । तेथें अकीर्ति अपेश अकल्याण ।**
**अतिनिंद्यत्वें पापी पूर्ण । अधःपतन महा नरकीं ॥**

पण या शापाबरोबर च, नामस्मरण करणाऱ्यांना त्यांनीं आश्वासन हि दिलें आहे.

**यालागीं साक्षपें आपण । समूळ सांडावें विस्मरण ।**
**नित्य करितां श्रीरामस्मरण । कीर्ति कल्याण निज विजयी ॥**

म्हणून च रामकल्याणांच्या शब्दांत मजसकट सर्वांची प्रार्थना कां,

**श्री रामाचें, जय रामाचें । जय जय रामाचें ।**
**ध्या रे ध्या तुम्ही नाम या श्रीरामाचें ॥**



## [ ४ ] श्री कल्याणकृत अष्टपदी

या अष्टपदीचे एकंदर १० श्लोक आहेत. पहिला ध्रुपदाचा, आणि शेवटचा समारोपाचा. या अष्टपदीचा एक विशेष आहे, आणि तो म्हणजे हा कीं, या अष्टपदींत कल्याणांनीं आपलें रचनेचें कौशल्य दाखविलें आहे. अष्टपदीच्या " रा मा प ती त पा व ना " या आठ अक्षरांपैकीं एक एक अक्षर क्रमानें २ ते ९ या श्लोकांना देऊन त्या त्या श्लोकांच्या चार हि चरणांचा आरंभ आणि शेवट कल्याणांनीं त्या त्या अक्षरानें केला आहे.

संधी साधेल तेथें तेथें कल्याणांनीं नामस्मरणाचा आग्रह धरलेला आहे असें नाममहिम्याचा विचार करतांना आपण नुकतें च वर म्हटलेलें आहे. त्याचें प्रत्यंतर या अष्टपदीवरून येतें. पहिल्या च चरणांत कल्याण आग्रह करितात :

अष्टपदी उच्चारा रामा पतीतपावना ।

आणि दुसऱ्या चरणांत लागली च फलश्रुति सांगतात :

आत्माराम स्मरणभावें वारी यातना ।

कोणत्या यातना दूर व्हाव्या म्हणून आपण तळमळत आहोंत ?

याहुनि बरी निरयगति परवशता शतगुणें करी जाच ॥

नंतर २ ते ९ या श्लोकांत श्रीरामचरित्रांतील महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख करून शेवटच्या श्लोकांत हि पुन्हां कल्याणांनीं फलश्रुति सांगितली आहे. या बाबतींत आपल्याला – रामदासांच्या दासाला – मुळींच संशय नाहीं, पण उलट आपल्याला तसा प्रत्यय आला आहे असें म्हणून कल्याण आपला अनुभव सांगतात :

येश कीर्ती प्रताप महिमा प्रत्ययो ऐसा ।

पण एवढ्यानें हि झालें नाहीं, तर कल्याण पुढें सांगत आहेत कीं, श्रीसमर्थांना तसा वर च मिळालेला होता.

पूर्ण वर दीधला स्वामी रामदासा ॥

प्रत्यक्ष श्रीरामचंद्रांनीं श्रीसमर्थांना दिलेल्या अनुग्रहाला च उद्देशून हा चरण आहे, कां यांत आणखी कांहीं इतिहास आहे, सांगतां येत नाहीं.

या चौथ्या चरणांत एक महत्त्वाचा पाठभेद आहे. दोन बाडांत तो चरण असा आहे :

पूर्ण वर दीधला रामदासाच्या दासा ॥

म्हणजे याचा अर्थ असा होतो कीं, आपल्याला च तसा वर मिळाला होता असें कल्याण म्हणत आहेत; आणि तें खोटें कसें असेल? कल्याणांना हा वर कोणी आणि कोठें दिला वगैरे प्रसंगाचा इतिहास आपल्याला अजून अज्ञात आहे, इतकें च।

येश कीर्ती प्रताप महिमा प्रत्ययो ऐसा।
पूर्ण वर दीधला रामदासाच्या दासा॥



## [ ५ ] श्री कल्याणकृत सवायी

स्फुट श्लोकांच्या वेळीं केलेल्या नाममहिम्याविषयींच्या विचाराचा शेवट आपण या सवायीनें च केला आहे.



## [ ६ ] श्री कल्याणकृत भूपाळ्या

( १ ) श्री रामाची, ( २ ) बारा ज्योतिर्लिंगांची, आणि ( ३ ) श्री मारुतीची, अशा कल्याणांच्या तीन भूपाळ्या आहेत. या तिन्हीं हि भूपाळ्यांत कल्याणांनीं नामस्मरणाचें च महत्त्व सांगितलें असून

नाम जगाचें जविन ।
जन्म मरण नीवारी ॥

महापापा होये होळी । सर्वे काळीं सुखदाता ॥

सकळ ही दुरितें नाशन । दंडण चुके यमाचें ॥

अशी ती च फलश्रुति सांगितली आहे.

पहिल्या दोन भूपाळ्यांत कल्याणांनीं श्री समर्थांचा हि उल्लेख केला आहे, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. श्रीराम वाचे येण्यापूर्वी कल्याणांना श्री समर्थांचें स्मरण झालें आहे.

श्री गुरु स्वामी आठवला । वाचे आला श्रीराम ॥

दुसऱ्या भूपाळीचा शेवट च मुळीं त्यांनीं श्रीसमर्थांच्या निर्देशानें केला आहे.

कल्याणस्वामी श्रीगुरुनाथ । दीनानाथ कृपाळु ॥

कोणाच्या हि लक्षांत येईल च कीं, श्री मारुतीच्या भूपाळींत कल्याणांनीं मारुतीच्या प्रतापशक्तीवर विशेष भर दिला आहे. तेहतीस कोटी देवांच्या अपमानाचें उट्टें मारुतिरायांनीं काढलें असें कल्याणांनीं म्हटलें आहे.

तेहतीस कोटी मघवा त्याचा मान खंडिला ॥

आणि भूपाळीचा शेवट करितांना कल्याणांनीं आपल्याला आपल्या आश्रयाचें स्थान दाखविलें आहे.

कल्याण राघव चौघे बंधु । जनकदुहिता ।
पुढें सन्मुख मारुती । संरक्षी आपुल्या दूता ॥

संपादनाच्या आणखी एका चुकीचा उल्लेख केला पाहिजे. मुळांत या कडव्यांत " शिव रक्षी " आहे. त्याचें आम्ही " संरक्षी " केलें, आणि तशी टीप हि पृष्ठांक ७० वर दिली. मूळ बाडांत च नादसाम्यानें " संरक्षी " ऐवजीं " शिव रक्षी " असें उतरलें गेलें असावें, असें त्यावेळीं मनांत आलें. शिवाय पाहिलेल्या कोशांत शिव म्हणजे मारुति असा अर्थ हि सांपडला नाहीं. श्री कल्याणांचा शब्द बदलून

तेथें आमचा शब्द आम्ही घातला असें या साऱ्या ग्रंथांतील हें एक च ठिकाण होय. पण ती आमची चूक च झाली. मारुति हे शंकराचे अवतार होत, हें लक्षांत यावयास हवें होतें. निदान

साक्षात शंकराचा । अवतार मारुतीचा ।
कळीमध्यें ते चि जाले । रामदासाची मूर्ती ॥

या कल्याणांनीं च केलेल्या श्रीसमर्थांच्या आरतीवरून तरी. असो. आम्ही केलेल्या या शब्दफरकानें अर्थभेद होत नसला, तरी चूक ती चूक च । श्री कल्याण क्षमा करतील च. वाचकांनीं मात्र आपआपल्या प्रतींत "संरक्षी" खोडून, त्याऐवजीं "शिव रक्षी" लिहून ठेवावें, अशी विनंति आहे.

कल्याण राघव चौघे बंधु । जनकदुहिता ।
पुढें सन्मुख मारुती । शिव रक्षी आपुल्या दूता ॥



## [ ७ ] श्री कल्याणकृत आरत्या

कल्याणांनीं केलेल्या आरत्या आठ आहेत. श्रीसमर्थांवर तीन, आणि दासबोध, मारुति, कृष्ण, श्रमहरणी व ब्राह्मण यांच्यावर एक एक, अशा त्या आठ आरत्या होत. श्रीसमर्थ, दासबोध, आणि मारुति यांच्यावर कल्याणांनीं आरत्या कराव्या हें अगदीं सहाजिक च आहे.

श्रीसमर्थांवरील आरत्यांत कल्याणांच्या गुरुनिष्ठेचें उत्कट प्रतिबिंब पडलें आहे. या तिन्ही आरत्यांच्या शेवटच्या च ओळी पहा :

पतीत प्राणी पदालागुनी कल्याण जाले ॥
कल्याण तिहीं लोकीं । समर्थ सद्गुरुचे पाय ॥
दर्शन मंगलप्रद कल्याणाचा कळस ॥

दासबोधाची आरती आपणा सर्वांच्या परिचयाची आहे. रामकालीं श्री मारुतिरायां-मुळें " सर्व कल्याण जालें " असें कल्याणांनीं सांगितलें आहे.

कृष्णाच्या आरतीचा उल्लेख स्फुट श्लोकांचा विचार करतांना ' श्रीक्षेत्र चाफळ ' या मथळ्याखालीं एकदां येऊन गेला च आहे. पण ही आरती ' कृष्णाची ' म्हणण्यापेक्षां ' तुळशीची ' म्हणणें जास्त सयुक्तिक होईल असें आज आमच्या मनांत येत आहे. आपलीं नित्य नैमित्तिक कर्में करतांना कल्याण या सर्व आरत्या म्हणत असले पाहिजेत. पण ब्राह्मणाची आरती कल्याण केव्हां म्हणत असतील ?

श्रमहरणी म्हणजे डोमगांवची सीना नदी. या नदीच्या तीरीं आयुष्याच्या शेवटच्या ३६ वर्षांतील कल्याणांचा बहुतेक काळ गेला. त्या जागेवर आज तें घर नाहीं, पण या नदीच्या तीरीं कल्याण जेथें रहात होते, ती जागा दाखविण्यांत येते, आणि तेथें घराच्या पायाच्या खुणा अजून हि दिसतात. तेव्हां अशा या श्रमहरणीवर कल्याणांनीं आरती करावी, आणि

तव तीरीं ज्याचा वास मोक्षप्रद त्यासी ।

असें म्हणावें हें अगदीं योग्य च होय. या आरतीच्या पहिल्या चरणावरून या नदीच्या उगमस्थलाचा एकाद्या रामकथेशीं संबंध असावा कीं काय असें मनांत येतें.

रघुवीरदेहश्रम हरुनी प्रवाह तूं वेसी ।

श्री समर्थांच्या हयातींत कल्याणांचा बहुतेक सारा काळ त्यांच्या सान्निध्यांत गुरुसेवेंत च गेला. एवढें च नव्हे, पण श्री समर्थांनीं शक १६०० मध्यें कल्याणांना डोमगांवीं पाठविल्यापासूनच्या आपल्या आयुष्याच्या शेवटच्या ३६ वर्षांत हि कल्याण श्री समर्थांचें स्मरण तत्परतेनें अखंड करीत असत.

सद्गुरुवर कल्याण स्मरणीं तत्पर तो ॥

गुरुभक्तांचें हें असें च असतें ! " गुरुभक्तांचीं धन्य जिणीं. "



## [ ८ ] श्री कल्याणकृत पदपदांतरें

कल्याणांचीं हीं पदें एकूण ९७ आहेत. त्यांचा थोडक्यांत तपशील असा :

| | |
|---|---|
| २६ रामाचीं | ३ प्रार्थनेचीं |
| २४ समर्थांचीं | २ शंकराचीं |
| १० मारुतीचीं | २ कृष्णाचीं |
| ९ नाममहिम्याचीं | २ ब्रह्माचीं |
| ५ स्फुट | २ दुर्जनाचीं |
| ४ गुरुकृपेचीं — गुरुसेवेचीं | १ देवाचें |
| ३ गणपतीचीं | १ दत्ताचें |
| ३ शारदेचीं | ९७ एकूण |

या पैकीं प्रत्येक पदांत विचारप्रवर्तक असें कांहीं ना कांहीं असलें, तरी या सर्व पदांचा तसा प्रत्येकीं विचार करण्यास आज आपणांस सवड हि नाहीं आणि जागा हि नाहीं. तेव्हां या साऱ्या पदांचा परामर्ष

( १ ) श्री कल्याणांचे राम,

( २ ) श्री कल्याणांचे मारुति,

( ३ ) श्री कल्याणांचे समर्थ,

( ४ ) पुन्हां एकदां नामस्मरण, व

( ५ ) इतर पदें,

या पांच बाबींखालीं घ्यावा, असें आम्हीं योजिलें आहे.

### ( १ ) श्री कल्याणांचे राम

कांहीं विशिष्ट हेतु मनीं धरून श्री समर्थांनीं त्या काळीं रामोपासनेवर भर दिला, इतका कीं, श्री शिवछत्रपतींना स्वराज्यस्थापनेच्या कामीं श्री समर्थांनीं केलेल्या या उपासनेच्या प्रचाराचें निःसंशय सहाय्य झालें. श्री रामावरील कल्याणांचीं हीं २६ पदें पाहिलीं म्हणजे रामोपासनेच्या मागचा श्री समर्थांचा हा हेतु कल्याणांच्या हि दृष्टीपुढून ढळला नव्हता, हें स्पष्ट दिसून येतें. श्री रामाचें वर्णन करितांना कल्याणांनीं रामरायाला लाविलेलीं इतर सर्व विशेषणें सर्वसाधारण असलीं, तरी

अरिवीरदंडण,

अरिकुळखंडण,

अरिवीरखंडण,
अरिवीरमर्दन रणधीरा,
रिपुवरखंडण दानवदंडण,
दितिकुळकंदन रणधीरा,
त्रिदशविमोचन देवा

हीं रामरायांना उद्देशून कल्याणांनीं योजिलेलीं विशेषणें पाहिलीं म्हणजे आमच्या म्हणण्यास पुष्टी मिळते. मात्र आमच्या म्हणण्याला कल्याणांच्या पदांत हा एवढा च आधार आहे, असें नाहीं.

कल्याण स्वतः च सांगत आहेत कीं, श्री रघुवीराची भेट आपल्याला करवा, अशी आपण श्रीसमर्थांची करुणा एकसारखी भाकीत होतों.

तो मज भेटवा भेटवा । आत्मा रघुवीर दावा ॥
करुणा भाकितो मानसीं । कल्याण साधुसी ॥

ज्या श्री रामाची भेट आपल्याला श्री समर्थांनीं करवून द्यावी म्हणून कल्याणांनीं, जणूं कांहीं, हट्ट च धरला होता, ते श्रीराम कोणते ? ज्यानें

धर्म स्थापिला स्थापिला । दुष्ट संहारिला ॥

त्या श्री रामाची भेट कल्याणांना हवी होती.

द्विजकष्टवारण, दुष्टसंहारण

अशा श्री रामाच्या भेटीसाठीं कल्याण तळमळत होते. कोणत्या रामचंद्रानें आपलें मन वेधलें होतें, हें कल्याणांनीं एका पदांत स्पष्ट सांगितलें आहे; जणूं कांहीं, कल्याण बजावून सांगत आहेत. कल्याण म्हणतात, दुसऱ्या कोणत्या हि नाहीं, तर

या रामचंद्रीं मानस वेधलेंसें ॥

इतकें कीं, कल्याणांना ते रामचंद्र जेथें तेथें दिसूं लागले. कल्याणांचे हे रामचंद्र कोणते ? कल्याण च सांगतात :

धनुष्यबाण करीं ठाण निरंतरीं । जेथें तेथें दिसतसे ॥

आणि

नित्य निरंतरीं ध्यान हें अंतरीं ।

आणि याचें फळ म्हणजे

दासा कल्याण होतसे ॥

रामकाळीं ब्राह्मणांच्या ब्रह्मकर्मांत विघ्नें येऊं लागलीं होतीं, धर्म लयाला जाऊं पहात होता आणि दुष्ट मातले होते. त्यांतून रामरायांनीं हा देश वांचविला.

श्री शिवाजी महाराजांच्या वेळीं ही ती च परिस्थिति निर्माण झाली होती. आणि आपल्या भाग्यानें

धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥

म्हणणारे भगवंत – श्री राम च – शिव छत्रपतींच्या रुपानें अवतीर्ण झाले. श्री समर्थ श्री शिवाजी राजांना श्री रामाच्या ठिकाणीं मानीत असत हें आतां आपल्याला ठाऊक झालें च आहे.

रामभेटीचा हा हट्ट एकट्या कल्याणांनीं च घेतला होता, असें नव्हे, तर श्री समर्थांनीं अवघे राष्ट्र रामोपासनेच्या मार्गे लावलें, इतकें कीं, श्री समर्थांनीं राष्ट्राला देव दिला असें म्हणण्यांत येऊं लागलें.

राम दीनबंधू रे । भक्तपाळ । तो कृपाळ । देव आमुचा ॥

या देवामुळे कल्याणांच्या काळीं राष्ट्राचें जें कल्याण झालें, तें च जर आपले व्हावयास पाहिजे असेल तर कोणत्या रामचंद्राचा ध्यास आपण घेतला पाहिजे आणि तो किती घेतला पाहिजे, हें यावरून स्पष्ट होत आहे. राष्ट्राचा हा देव

दुष्टासि मारितो । दासासि तारितो । संकटें वारितो । सत्य वाचा ॥

पण कांहीं अनुभव ?

वारिलीं संकटें नाना । वोळलासी करुणाघना ।

हा काय इतिहास आहे, हीं संकटें कोणतीं, हे कल्याणांचें कल्याणांना ठाऊक. पण करुणाघन रामानें आपल्या संकटांचें निवारण केलें हें कल्याण च स्वत: आपणांस सांगत आहेत. या सांगोवांगीच्या गोष्टी नव्हत; कल्याणांचा स्वतःचा हा अनुभव आहे.

म्हणून त्या च नामस्मरणाकडे पुन्हां आपल्याला वळणे भाग आहे.

राघव गावा गाईला चि ॥

भावार्थ बळकट व्हावा । स्मरणें कल्याण जीवा ।
येथें कांहीं नाहीं गोवा । नामामृत सेविलें चि सेवा ॥

जन्मजन्मांतरींच्या तपाचें फळ म्हणून मुखीं नाम येतें आणि श्री रामचंद्राचे चरण जोडतात.

नाम म्हणतां वाचे, पद* लाभे स्वामीचें । धाम कल्याणाचें,
तपफळ जन्मांतरींचें ॥

---

* येथें आपल्याला पृष्ठांक ४७ वरील " ओल्या सतमाळा " या लहानशा स्फुट प्रकरणाचें स्मरण होईल. शिवाय सातवें परिशिष्ट पहावें.

या बाबतींत " सद्भाविकाला फळला, थोर लाभ जाला " या प्रत्यक्ष श्री समर्थांच्या अनुभवाचा उल्लेख करून कल्याण आपणांस शेवटचें च सांगत आहेत :

तो चि देव आठवावा । हृदयांत सांठवावा ॥

## ( २ ) श्री कल्याणांचे मारुति

कल्याणांचे मारुति प्रतापी होते. मारुति म्हणजे च प्रताप म्हणजे च सामर्थ्य.

अद्भुत रुद्र प्रतापी ।

या दहा पदांपैकीं एक हि पद असें नाहीं कीं, ज्या पदांत कल्याणांनीं मारुतीरायांच्या प्रतापाचा उल्लेख केलेला नाहीं.

सामर्थ्याच्या कोटी । रुळती चरणांगुष्टीं ॥

ज्या प्रमाणें ब्रह्माचें वर्णन करतां येत नाहीं, त्या प्रमाणें मारुतीरायांच्या प्रतापाचें वर्णन करतांना शब्द तोकडे पडतात. कल्याण म्हणतात :

प्रताप वदला रे वदला न वचे कोणा ॥

असे कल्याणांचे मारुतिराय आहेत, ज्या मारुतिरायांचें ध्यान रामउपासक करितात, ते मारुतिराय ' अरिवीरदंडण ' आणि म्हणून च ' कल्याणमंडण ' आहेत, आणि मारुतिरायांची ही कीर्ति ध्यानीं घेऊन च सज्जनमूर्ती श्रीसमर्थांनीं मारुतिरायांना ईश्वर च मानून त्यांचें गान केलें, असा च कांहींसा अर्थ खालील दोन चरणांचा होतो ना ?

अरिवीरदंडण कल्याणमंडण रामउपासक ध्याती ।
ऐकुनि कीर्ती सज्जनमूर्ती ईश्वर गाती गीतीं ॥

कल्याणांचे मारुतिराय प्रतापी तर आहेत च, पण ते ' कैवारी ' हि आहेत. कोणाचे ? कोट्यवधी देवांचे.

कैवारी सुरकोटी ।

नुसत्या कोट्यवधी देवांचे च नव्हे, तर देवाधिदेव श्रीरामचंद्रांचे हि.

रघुपतीचा कैवारी । दुर्घट विघ्न निवारी ॥

आणि निजधामीं जातांना श्रीरामचंद्रांनीं आपल्या भक्तजनांना मारुतिरायाजवळ निरविले आहे. म्हणून मारुतिराय रामदासांचे हि कैवारी आहेत.

भक्त जनाते निरउनि तुम्हा । स्वामी गेले निजधामा ॥

अशी मारुतिरायांना आठवण करून देऊन कल्याण त्यांना विचारतात :

रामदासांचा कैवारी साचा । तुजविण कोण आम्हां ॥

आणि म्हणून विनवितात :

करुणाकरा धीर उदारा ! कल्याण करीं सुखधामा ॥

' मारी दुर्जन अदया ' अशी मारुतिरायांची प्रार्थना कल्याणांनीं एका पदांत केली आहे.

कृपासहस्रकर उदया । करुणाजळधर हृदया ।
कल्याणदायक सदया । मारी दुर्जन अदया ॥

रामावतारीं हा प्रत्यय आला, तो आतां पुन्हा येऊं द्या, अशी ही कल्याणांची प्रार्थना आहे. ही प्रार्थना श्री शिवसमर्थांच्या स्वराज्यस्थापनेच्या काळांत कल्याणांनीं केलेली दिसते. त्या काळीं कल्याणांच्या दृष्टीसमोर असणारे हे ' अदय दुर्जन ' दुसरे कोण असणार ? त्या काळचे स्वराज्यविरोधक तर नव्हेत ? मारुतीरायांना आज आपण दुसरी कोणती प्रार्थना करावयाची ?

सुंदरा रे भीमा, श्रीरामा दाखवी झडकरी ।
प्रताप आपुला प्रगट करी ॥

## ( ३ ) श्री कल्याणांचे समर्थ

श्रीगुरु श्रीसमर्थांवर कल्याणांचीं २४ पदें आहेत. या पदाचा विचार करतां करतां आमच्या च मनाचा गोंधळ झाला आहे. हें पद उतरून काढावें, का त्या पदाकडे वाचकांचें लक्ष वेधावें, असें होत होत एकदां तर मनांत आलें कीं, हीं २४ चीं २४ पदें येथें उद्धृत करावीं, पण असें कसें करतां येईल ? म्हणून ठरविलें कीं, पृष्ठांक १०२ ते ११४ वरील हीं २४ पदें वाचकांनीं वाचावीं, आणि कल्याणांचे श्री समर्थ वाचकांनीं आपले आपण हुडकून घ्यावे, अशी त्यांना विनंति करावी.

कल्याण गुरुनिष्ठेबद्दल — गुरुसेवेबद्दल च — प्रसिद्ध आहेत; त्यावरून च ते ओळखले जातात. आणि यामुळें च कोणा हि गुरूच्या पट्टशिष्याला, शिष्यवराला, कल्याण म्हणून संबोधण्याचा प्रघात पडला आहे. कल्याण म्हणजे गुरुनिष्ठेची, गुरुसेवेची, पराकाष्ठा. त्यांच्या या निःसीम गुरुनिष्ठेचा कांहीं विचार त्यांच्या जीवनकथेंत आपणांस करावयाचा च आहे. येथें इतकें च म्हणतों की, शांत चित्तानें, एकांतांत, श्री समर्थांची मूर्ति हृदयांत बागवून, हीं सारीं पदें वाचा आणि सांगा आपल्या मनांत काय येतें तें. आपल्या मनांत जें कांहीं येत असेल ती च आपल्या कल्याणांची श्रीसमर्थांकडे पहाण्याची दृष्टि होय. कल्याणांचे श्रीसमर्थ तसे होते. तेव्हां आतां आणखी कांहीं निराळें म्हणावयाचें तें काय उरलें ? वास्तविक कांही हि नाहीं. पण कल्याणांनीं श्रीसमर्थांचा निदिध्यास कसा घेतला होता, अगदीं

थोडक्यांत कल्याणांनीं श्रीसमर्थांची थोरवी कशी वर्णिली आहे, आणि श्रीसमर्थांच्या कृपेचें फळ काय, श्रीसमर्थांचें अवतारकार्य कल्याण कोणतें मानीत वगैरे तीन चार बाबींचा नुसता उल्लेख तरी करणें इष्ट होईल.

कल्याणांना श्रीसमर्थांचा अखंड वेध लागला होता; त्यांच्या अंतर्यामीं रात्रंदिवस श्रीसमर्थांची मूर्ति विलसत होती.

मज तो आवडतो मम स्वामी । निशिदिनीं अंतर्यामीं ॥

एवढें च नव्हे, तर कल्याणांना श्री समर्थांवांचून क्षणभर हि करमत नसे.

स्वामी माझा योगीराजा आवडतो हृदयीं ।
दिवसरजनी न गमे जनीं नावडे कांहीं ॥

जागृतावस्थेंत च नव्हे, तर निद्रितावस्थेंत हि, स्वप्नांत हि, कल्याणांना श्रीसमर्थांचा च एक ध्यास होता; त्यांच्या श्रीसमर्थांच्या ध्यानांत कधीं च खंड पडला नाहीं.

स्वामी तो आठवे मनीं । नित्य बोलतां चालतां जनीं ।
स्वप्न सुषुप्ती जागृति मौनीं । खंड नाहीं च अखंड ध्यानीं ॥

असा श्रीसमर्थांचा ध्यास घ्यावा, तेव्हा श्रीसमर्थांची भेट होते. पण श्री समर्थांची भेट होणें ही कांहीं सोपी गोष्ट नव्हे. त्यासाठीं गांठीं अपार पुण्य असावें लागतें.

जन्मजन्मांतरीं पुण्यकोटी । बहु संचित होते गांठीं ।
योगीरायाची जाली ज्यास भेटी । त्यास कल्याण होये सृष्टी ॥

त्या या श्री समर्थांची प्रत्यक्ष पादसेवा कल्याणांना घडली. या चरणसेवेचें, चौथ्या भक्तीचें, महत्त्व फार आहे. एका पदांत तर कल्याणांनीं श्री रामरायाजवळ प्रत्यक्ष मागणी च केली आहे.

देई चौथी भक्ति रे रामा ॥

श्री समर्थांच्या चरणसेवेनें काय प्राप्त होतें? कल्याण श्रीसमर्थांना म्हणतात, जो कांहीं मी आहे तो तुमच्या सेवेमुळें, जें कांहीं मी केलें तें तुमच्या सेवेमुळें, जें कांहीं मला मिळालें तें तुमच्या सेवेमुळें.

सुखरूप जालों स्वामी तुमचीया पादसेवे ।
कल्याण माझें जालें रंगलों सोहंभावें ॥

× ×

पावलों धांवलों देवा तुमचीया सेवाबळें ।

× ×

रामावीण वृत्ती माझी आणिक न जाय कोठें ।
जिकडे पाहे तिकडे श्रीराम माझा भेटे ।
कल्याण म्हणे सकळ द्वैतपण जेथें आटे ।
रामदासस्वामी जई आनंदघन भेटे ॥

आणखी एका गोष्टीचा उल्लेख जरूर केला पाहिजे. श्रीसमर्थांचें अवतारकार्य कोणतें हें कल्याणांनीं सांगितलेलें आहे. श्रीसमर्थांचा अवतार स्वधर्मरक्षणाकरितां होता असें कल्याण म्हणत आहेत.

ज्ञान वैराग्य भजन । स्वधर्मरक्षण ।
म्हणोनी अवतारी जाण । योगमूर्ती ॥

एवढें च नव्हे, तर आणखी दोन ठिकाणीं कल्याणांनीं श्री समर्थांचा उल्लेख धर्मसंस्थापक म्हणून केला आहे.

धर्मस्थापना स्थापियेली । न्याय नीतीनें भक्ति वाढविली ।
संतमंडळी ते निवाली । बहुदास ते भूमंडळीं । गे बाई ॥

× × ×

भक्ति हरीची कीर्ति हरीची । धर्म चि स्थापक जाले ॥

कल्याणांनीं दिवाकरांना लिहिलेलें पत्र त्यांच्या जीवनकथेंत समग्र द्यावयाचें च आहे. " यांच्या कलहामुळें श्रीच्या धर्मस्थापनेसि अंतर पडे ऐसें न करणें " असें त्या पत्रांत कल्याणांनीं दिवाकरांना सुचविलें आहे. कल्याण समर्थांना धर्मसंस्थापक म्हणत आहेत, या गोष्टीला फार महत्त्व आहे. श्री शिव छत्रपतींनीं श्री समर्थांचा अनुग्रह घेऊन शिष्यत्व पतकरिलें होतें, एवढ्या च मुळें कल्याणांना श्री समर्थ धर्मसंस्थापक वाटले असतील, असें कसें म्हणतां येईल ? महाराष्ट्राच्या त्या काळच्या इतिहासांत श्री समर्थांचें जें स्थान आपण आजवर मानीत आलों आहोंत, तें च त्यांचें खरें स्थान होय, असें कल्याण हि, श्री समर्थांना धर्मस्थापक म्हणून, सांगत आहेत. आमचा तितका व्यासंग नसल्यामुळें मन थोडेसें कचरतें, पण मनांत आलें तें स्पष्टपणानें लिहावयाचें च म्हटलें तर, असें म्हणावेसें वाटतें कीं, त्या वेळच्या राजकारणांत श्री समर्थांचा फार मोठा भाग होता, निदान असला पाहिजे, या आपल्या म्हणण्याचा पाठपुरावा, समर्थांना धर्मसंस्थापक म्हणून, कल्याण करीत आहेत, असें म्हणणें सयुक्तिक होईल.

## ( ४ ) पुन्हां एकदां नामस्मरण

कल्याणांचीं हीं पदें ओझरतीं ओझरतीं चाळलीं, तरी देखील, नामस्मरणाचें महत्त्व पटविण्याची कोणती हि संधी येथें हि कल्याणांनीं घालविली नाहीं, हें चटकन लक्षांत येतें. श्री समर्थांचा हि नामस्मरणावर विलक्षण कटाक्ष होता.

चहुंवर्णा नामाधिकार । नामीं नाहीं लहान थोर ।
जड मूढ पैलपार । पावती नामें ॥ ४–३–२४

स्मरण देवाचें करावें । अखंड नाम जपत जावें ।
नामस्मरणें पावावें । समाधान ॥ ४–३–२

समर्थांचें बोलणे प्रचितीचें. स्वतःला पटल्यावांचून कोणती च गोष्ट त्यांनीं दुसऱ्याला सांगितली नाहीं.

क्षण येक राम आठवितां चित्तीं । तेणें उधरती कोटी कुळें ॥ ३३–१
स्वरूप रामाचें मनीं आठवावें । नाम उच्चारावें रात्रंदिवस ॥ शत ८–९१
सर्व काळ राम मानसीं धरावा । वाचे उच्चारावा नामघोष ॥ ४६–४

समर्थ आपल्या अंतरीची खूण सांगत आहेत.

महा भय कैंचें रामासी भजतां । हें जाण अन्यथा वाक्य नव्हे ॥ ३०–११
नव्हे सोडवण रामनामेवीण । रामदास खूण सांगतसे ॥ १२

पुन्हां एकदां श्री समर्थ ही च खूण सांगत आहेत.

नाम नाहीं मनीं नाहीं जो कीर्तनीं । तया कां जननी प्रसवली ॥ १०५–४
प्रसवली परी जाला भूमिभार । दुस्तर संसार उलंघेना ॥ ५
उलंघेना येक रामनामेवीण । रामदास खूण सांगतसे ॥ ६

' सगुणध्यान ' या आपल्या प्रकरणांत श्री समर्थ नामाची महती वर्णितात :

राम जप भवानीशा । सप्रचीत रामनामें ॥ १०९
नामें तारिलें पाषाण । नामें पतित पावन ।
नामें मुक्त विश्वजन । शिवाचेनी उपदेशें ॥ ११०
शुकमीसें राम वाणी । म्हणतां पावन कुंटणी ।
अंतकाळीं सकळ प्राणी । रामनामें उद्धरती ॥ १११
हो कां ज्ञाते विरक्त । हो कां साधु जीवनन्मुक्त ।
हो कां भावीक साबडे भक्त । नामेवीण वृथा ॥ ११२

सकळांमधे थोर । तो नाम सेवी शंकर ।
तेथें मानव तें किंकर । बापुडे किती ॥ ११३

नामें होय चित्तशुधी । नामें तुटे देहेबुधी ।
नामें होये कार्यसिधी । निजध्यासें ॥ ११४

नामें स्वहित फावे । नामें निश्चये दृढावे ।
नामस्मरणें सीघ्र पावे । देवराव ॥ ११५

ऐसें हें रामनाम । परम गुह्य विश्राम ।
मथुनी काढिलें वर्म । शतकोटीचें ॥ ११६

सावध ऐका श्रोतेजन । परम गुह्य माहा गहन ।
नाममात्रें होती दहन । पापरासी ॥ ११७

या बाबतींत संशय घेणाऱ्यांना श्रीसमर्थांनीं हि शाप दिला आहे.

येदर्थीं संशये धरी । तो महापापी दुराचारी ।
तयासी प्राप्त येमपुरी । विकल्पें होये ॥ ११८

श्रीसमर्थांच्या वाङ्मयांतून अशीं शेकडों वचनें देतां येतील कीं, जेथें जेथें त्यांनीं नामस्मरणावर पराकाष्ठेचा भर दिलेला आढळून येईल. सर्व साधुसंतांनीं असा च भर नामस्मरणावर दिलेला आहे. नुसता नामस्मरणाचा अट्टाहास धरून च ते थांबले नाहींत, तर आपला बहुतेकांचा तसा अनुभव असल्याचें त्यांनीं सांगितलें आहे. हें त्या सर्वांचें प्रचीतीचें बोलणें आहे.

मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांसी ॥

एवढें च नाहीं, तर त्यांचें असें कायमचें आव्हान आहे कीं,

नामें तरला नाहीं कोण । ऐसा द्यावा हो निवडून ॥

त्या काळच्या साधुसंतांचा च हा असा अनुभव आहे, असें नव्हे, तर पारलौकिक हिताच्या दृष्टीनें नामस्मरणामुळें काय साध्य होतें हें आज सांगतां येत नसले, तरी “ नामस्मरणानें मनाला शांति मिळते, आणि मनकामना पूर्ण होतात ” असें अनुभवानें सांगणारे आज हि विद्यमान आहेत. हें सारें नामस्मरणाच्या बाजूनें झालें. पण आश्चर्य असें कीं, नामस्मरणाविरुद्ध अनुभवावर आधारलेला एक हि पुरावा नाहीं ! नुसतें देवाचें नांव उच्चारण्यानं काय होणार, असा प्रश्न विचारून आपल्या तर्काला हें पटत नाहीं, या पलिकडे कोणता हि आक्षेप

नामस्मरणाविरुद्ध घेण्यांत आलेला नाहीं. आपण नामस्मरणाचा छंद घेतला होता, इतका कीं नामस्मरणाचें आपणास वेड च लागलें होतें, तरी देखील आपणास एका हि फलश्रुतीचा अनुभव आला नाहीं, असे स्वतःच्या अनुभवानें सांगणारा एक हि जण पुढें आलेला नाहीं. अशा स्थितींत सर्व कामनांची सिद्धि करून देणाऱ्या आणि भगवंताची प्राप्ति करून देणाऱ्या या अति सोप्या साधनाकडे — नामस्मरणाकडे — आपलें सर्वांचें जावें तसें लक्ष कां जात नाहीं, असा प्रश्न आहे. नामस्मरणाचा विचार करतांना ती. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं एके ठिकाणीं लिहिलें आहे कीं, " पण देवाचें नुसतें नांव घेत बसावें, हें ऐकण्याला आतां कोणी तयार नाहीं, मानण्याइतका कोणाचा विश्वास नाहीं व आचरण्याचें तर कोणी नांव हि काढूं देत नाहीं. " अशी आजची स्थिति आहे हें खरें. पण म्हणून च प्रश्न आहे तो हा कीं, अशी स्थिति कां आहे? श्रद्धा नाहीं, या उत्तरानें समाधान होत नाहीं. श्रद्धा कां नाहीं? सारांश, नामस्मरणाच्या बाजूनें गत आणि विद्यमान श्रेष्ठांचा सानुभव पुरावा असतांना, आणि विशेषतः त्याच्या विरुद्ध अनुभवावर आधारलेला असा पुराव्याचा लवलेश हि नसतांना, आपला मार्ग कोणता हें स्पष्ट होत नाहीं कां?

### ( ५ ) इतर पदें

कल्याणांच्या ९७ पदांपैकीं ६९ पदांचा विचार आतांपर्यंत झाला. बाकीच्या २८ पदांचा विचार ( १ ) एक च देव, ( २ ) साधन आणि गुरुकृपा, व ( ३ ) रामदास्य फळा आलें, अशा कांहीं मथळ्यांखालीं करावा, असें योजिलें आहे.

#### ( १ ) एक च देव

श्री समर्थांचा रामोपासनेवर भर. साहजिक च कल्याणांचा हि रामोपासनेवर तितका च भर. पण समर्थांप्रमाणें च कल्याणांनीं हि, इतर देवतांवर हि, एकाद दुसरें च कां होईना पण, पदें केलीं आहेत. दत्तावर आहे, शंकरावर आहे, कृष्णावर आहे. देवांच्या ठायीं कल्याणांनीं भेद मानल्याचें दिसत नाहीं.

दे वर रघुविरगुण गाया ॥

अशी ज्याप्रमाणें त्यांनीं गणपतीची प्रार्थना केली आहे, त्या प्रमाणें

मति दे । माधवगुण गाया ॥

अशी हि त्यांनीं गणपतीची प्रार्थना केली आहे. अनेक देवांच्या ठायीं त्यांनीं एकत्व पाहिलें. एकत्वाच्या ठिकाणीं अनेकत्व आणि एकत्व हीं दोन्ही हि संभवतात. आपल्या रामरायाच्या एकत्वांत कल्याणांना इतर देवांचें अनेकत्व दिसलें, एकत्व तर होतें च होतें.

येकीं अनेक येक । पाहों जातां येक बेक ।

पण हा अनुभव येण्यासाठीं

शोधावा विवेक । सज्जनाचा रे ॥

'सज्जनाचा' म्हणजे श्रीसमर्थांचा. श्रीसमर्थांचा हा विवेक कोणता? श्री समर्थ सांगतात:

येक गुरु येक देव। कोठें तरी असावा भाव।
भावार्थ नस्तां वाव। सर्व कांहीं ॥

ज्याला त्याला आपलें च उपास्य दैवत थोर वाटणें सहजिक च आहे.

जो जे मतीं सांपडला। तयासि तें चि थोर ॥

या प्रमाणें

जो ज्या देवा भजत गेला। तयासि तो चि थोर ॥

म्हणून "श्रीसमर्थ म्हणत, एकपरी हा असला मताभिमान पुरवला, पण निरभिमानाचा पोकळ डौल आणून कार्यपराङ्मुख होणें नको. चाफळच्या रामाला भजा, नाहीं तर पंढरीच्या विठोबाला भजा, कोणाला तरी भजा, पण उपासनेवांचून राहूं नका, असें ते म्हणत."*

## ( २ ) साधन आणि गुरुकृपा

कल्याणांनीं साधन सांगितलें आहे तें गुरुपदीं लीन होण्याचें.

बा रे करीं तूं साधन। गुरुपदीं होय लीन ॥

पण गुरुपदीं लीन होण्यासाठीं काय करावें?

नको गुंतूं तूं संसारीं। मुखें राम तो उच्चारी ॥

संसारांत पडूं च नको असें कल्याण सांगत नाहींत, समर्थांनीं हि सांगितलें नाहीं. संसार करावयाचा च तर करा, पण त्यांत आसक्ति ठेवून गुंतून पडूं नका, असें च दोघांचें हि सांगणें. ही स्थिति प्राप्त होण्यासाठीं, कल्याण म्हणतात :

मुखें राम तूं उच्चारी ॥

रामाच्या ध्यानाचा ध्यास घेतला म्हणजे आपोआप च विषयाचा तिटकारा उत्पन्न होऊन संसारावरील आसक्ति नष्ट होईल.

सदा रामध्यान करी। होय विषयांचा वैरी ॥

पण हें सारें झालें तरी गुरूवांचून कोणतें हि साधन कल्याणदायक होत नाहीं.

गुरुवांचुनी साधन। नव्हे कल्याण ॥

आणि सद्गुरु तर सत्संगावांचून प्राप्त होत नाहींत.

नव्हे सत्संगावांचुन। श्रीगुरुचें दर्शन।

म्हणून च कल्याणांच्या सहवासांत आपण इतका काळ घालविला, व आणखी कांहीं काळ घालवावयाचा, आणि त्यांना विनवीत असावयाचें.

गुरुदर्शना जीव व्याकूळ जाला। कधीं भेटवीतां गुरुपाउलाला ॥

---

* श्री समर्थांचें शिकवण - पृष्ठांक ९९-१००

## ( ३ ) रामदास्य फळा आलें

या ग्रंथाच्या पृष्ठांक १ ते १२६ वर आलेल्या 'श्री कल्याणकवन' या पहिल्या भागांतील कल्याणांची कविता आपण ज्या क्रमानें दिली आहे, त्या क्रमानें च कल्याणांनीं ती लिहिली असें नाहीं. उलट त्या क्रमानें त्यांनीं ती लिहिली नसली च पाहिजे हें च खरें. आपण आपल्या पुरता कांहीं एक क्रम ठरविला इतकें च.

त्या भागाच्या शेवटीं कल्याणांनीं श्री राम, श्री समर्थ आणि श्रोते यांच्या केलेल्या तीन प्रार्थना दिल्या आहेत; त्यांचा त्रोटक उल्लेख पुढें व्हावयाचा च आहे. या प्रार्थना करण्यापूर्वी कल्याणांनीं काढलेल्या कृतार्थतेच्या उद्गारांचा च तेवढा उल्लेख येथें आपणांस करावयाचा आहे.

रामदास्य फळा आलें । सर्व हि कल्याण जालें ।
साक्षत्व विरालें । रामपायीं रे ॥

हे धन्यतेचे उद्गार कल्याणांच्या मुखांतून निघाले हें सत्य आहे, ते उद्गार सत्य आहेत, ते उद्गार काढण्याइतकी धन्यता कल्याणांना वाटली असली पाहिजे हें हि सत्य आहे. पण हे उद्गार कल्याणांच्या मुखांतून कधीं निघाले, कोणत्या प्रसंगामुळें निघाले, वगैरे आपणांस कांहीं च सांगतां येत नाहीं.

साक्षत्व विरालें । रामपायीं रे ।

असें कल्याणांनीं सांगितलें आहे. पण 'रामपायीं साक्षत्व विरणें' म्हणजे काय याचा अनुभव आम्हांस नाहीं, त्याची कांहीं च कल्पना हि आम्हांस होऊं शकत नाहीं, कोणी सांगितल्यास तें आम्हांस समजेल च असें हि वाटत नाहीं. ही सुखासमाधानाची, ब्रह्मानंदाची स्थिति त्यांचे ते जाणोत. आपल्या ऐहिक आणि पारलौकिक कल्याणाची काळजी ज्यांनीं घ्यावयाची ते ती घेत असले च पाहिजेत. पारलौकिक कांहीं आम्हांस आज तरी समजत नाहीं. आम्ही ऐहिक जाणतो. आपल्या कांहीं अपेक्षा आहेत, इच्छा आहेत, वासना आहेत, आकांक्षा आहेत, त्यांत च

श्री रामराज्य करणें सर्वत्र हो ।

हा च आपण आपल्या सर्व धडपडीचा ध्रुव मानीत आलों आहोंत ना ? मग अखंड भारतवर्षांत हें रामराज्य झालेलें पाहून

रामदास्य फळा आलें । सर्व हि कल्याण जालें ।

असे धन्यतेचे यथार्थ उद्गार काढण्याची वेळ आपणा सर्वांना लवकर च येवो, अशी श्रीशिवरामसमर्थकल्याणादिकांची आपण प्रार्थना करूं या.



( २ )

## श्री कल्याणांच्या गोष्टी

[ श्री कल्याणांच्या सर्व च गोष्टी या प्रकरणांत दिल्या आहेत, असे नाही. कांहीं गोष्टी येथे न देतां पुढील प्रकरणांत त्यांचा उपयोग करावयाचा आहे. आणि कांहीं कदाचित् दोन्हीं प्रकरणांतून हि गळल्या असतील. श्री समर्थचरित्रातून कल्याणविषयक उल्लेख शेकडों आहेत. उदाहरणार्थ, अंत्यज मोळीविक्याकडून वासुदेव पंडिताचा श्री समर्थांनीं केलेला गर्वपरिहार, श्री समर्थांचा श्री शिव छत्रपतींना अनुग्रह, वगैरे कित्येक प्रसंगीं कल्यणांचे उल्लेख आले आहेत. त्या त्या प्रसंगी कल्याण उपस्थित होते, इतकें च. पण म्हणून कांहीं त्या कल्याणांच्या गोष्टी होऊ शकत नाहींत. तेव्हां असे प्रसंग हि या ग्रंथांतून वगळले आहेत. ]

### ( १ ) कल्याणांचीं कीर्तनें

एकदां शिवाजी महाराज श्री समर्थांकडे आले असतां कथा ऐकण्याची त्यांना इच्छा झाल्यावरून समर्थांनीं कीर्तनें करविलीं. समर्थांच्या आज्ञेवरून प्रथम वेणाबाईचें कीर्तन झालें. त्यावेळीं ध्रुपद धरावयास मागें कल्याण उभे होते. समर्थांच्या कीर्तनांत हि कल्याण ध्रुपद धरीत असत. वेणाबाईनंतर आक्कांचें कीर्तन झाले,

तंव स्वामी म्हणती कल्याणा । उभा ठाके कीर्तना ।
नमस्कारोनी गुरुराणा । आरंभ केला कथेसी ॥

कल्याणांना कीर्तनाचें आंग होतें, हें उघड आहे. कल्याणांच्या अनेक कीर्तनांचे उल्लेख श्रीसमर्थचरित्रांतून आढळतात. कीर्तनकाराला आवश्यक असलेली गायनकला हि कल्याणांना चांगली अवगत होती. कल्याणांचें गाण्याचे उल्लेख अनेक ठिकाणीं आले आहेत. एके ठिकाणीं त्यांना " गुणी गायक " म्हटलें आहे. कल्याण पुराण हि सांगत.

पुराणश्रवण आरंभिलें । कल्याणाहातीं ॥

चाफळ येथील रामनवमीच्या उत्सवात कल्याण दरसालचें ललित करीत हें प्रसिद्ध च आहे. श्रीसमर्थ सज्जनगडावर प्रथम रहावयास आले त्या वेळीं तेथ जीं कीर्तनें झालीं त्यांत कल्याणांचे हि कीर्तन झालें होते.

एकदां समर्थ आणि कल्याण यांचा मुक्काम औरंगाबादला असतांना समर्थांनीं कल्याणांना कीर्तन करण्याची आज्ञा केली. समर्थांना नमस्कार करून कल्याणांनीं कीर्तनाला आरंभ केला. समर्थ समोर च बसले होते. कीर्तन ऐन रंगांत आलें होते, श्रोते आनंदाने डोलत होते, अशा वेळीं कल्याणांनीं कांहीं दृष्टांत दिला, तो समर्थ

म्हणती कल्याणा अभंग बोले । येथें तो पाहिजे कीं ॥

पण कल्याणांना अभंग आठवेना ! समर्थांना राग आला आणि हातांतील टाळ फेंकून त्यांनीं कल्याणांच्या कपाळावर मारला. कल्याणांना मूर्छना आली, रक्ताची धार लागली. इकडे समर्थांनीं खंबाइत फाडून त्याची राख केली आणि ती आपल्या हातें जखमेंत भरली,

तों तेथें कांहीं न दिसे जाण । जैसें तैसें चि भाळ ॥

कल्याण उठून उभे राहिले, अभंग आठवला, आणि म्हणूं लागले. ऐका —

नको ओळखीचे जन । आंगीं वाजे अभीमान ॥ १
आतां तेथें जाईं मना । जेथें कोणी ओळखेना ॥ २
लोक म्हणती कोण काय । पुसों जातां सांगों नये ॥ ३
रामदास म्हणे पाहीं । तेथें कांहीं चिंता नाहीं ॥ ४

### ( २ ) कल्याणांचें उच्छिष्ट †

एकदां कीर्तनांत समर्थ म्हणाले, आम्ही रांधतों, तें कल्याण खातो आणि आम्हांस उच्छिष्ट देतो तेव्हां कीर्तनाला रंग चढतो. मूर्खांनीं शब्दार्थ घेतला आणि समर्थ कल्याणांचें उष्टे खातात अशी निंदा करूं लागले. शिष्याचें उच्छिष्ट खाणारा बुवा अशी निंदा होऊं लागली ! निंदेला काय, लवकर पसरते, आवरायाला कठीण जाते. पण समर्थांचा भावार्थ – आम्ही कविता करतों, ती कल्याण पाठ करितो, वेळेवर आम्हांस आठवली नाहीं म्हणजे कल्याण सुचवितो, आम्हांस आनंद होतो आणि कीर्तनांत रंग माजतो.

आम्ही रांधलें तें सर्व सेउनी । अवशिष्ट देतो मज काढुनी ।
या कल्याणसाहित्यें कोदंडपाणी । कीर्तनीं रंग माजविला ॥ ३७
या बोलण्याचा ऐसा अर्थ । कवनें करितों तरी बहुत ।
पुन्हां न स्फुरती कीर्तनांत । तें स्मरण देतो कल्याण ॥ ३८

### ( ३ ) कल्याणांची गुरुनिष्ठा §

" एकदां कल्याणस्वामींची परीक्षा पाहण्यासाठीं, नैवेद्य तयार झाला असून तो तसा च टाकून श्री समर्थ घोर अरण्यांत निघून गेले. कल्याणांनीं बरा च वेळ वाट पाहिली, पण श्री समर्थ आले नाहींत. सूर्यास्ताची वेळ व्हावयास आली. शेवटीं शुद्ध धोतरांत अन्नाचीं भांडीं बांधून घेऊन कल्याणस्वामी श्री समर्थांच्या

† ती. नानासाहेबांच्या आगामी " श्रीसमर्थावतार " या समर्थचरित्रखंडांतून
§ " श्री समर्थप्रताप " या ग्रंथाच्या शंकर श्रीकृष्ण देव यांच्या प्रस्तावनेवरून

शोधार्थ अरण्यांत प्रवेश करिते झाले. पुढें कोयना नदी लागली; तिला पूर आला होता. कल्याणस्वामी पोहण्यांत फार च पटाईत होते. एक एका बगलेंत एक एक शिष्य घेऊन ते खुशाल पुरांत उड्या मारीत; तेव्हां कोयनेचा पूर त्यांचा मार्ग थोडा च कुंठित करणार! ते पलिकडे गेले. पुढें घोर अरण्य लागलें व काळोख चांगला च पडला होता. तेव्हां दोघे वनचर धनुर्धारी भिल्ल चुड्या घेऊन कल्याणांना वाट दाखविण्यास आले. ते दोघे दुसरे कोण असणार! श्री समर्थांची भेट कल्याणास करवून ते गुप्त झाले. कल्याणांनीं श्री समर्थांस साष्टांग नमस्कार घालून पुढें अन्नपात्रें ठेवलीं. सहा प्रहरापूर्वी तें अन्न शिजविलेलें होतें. समर्थांनीं ते स्वतः वाढून घेतलें व पात्रें अगारून दिलीं. श्रीसमर्थांचें भोजन झालें. कल्याणस्वामी पहातात तो तेथें शेष अन्न हि उरलें नाहीं व पात्रें हि नष्ट.

सद्गुरुनाथजी बोलती हास्यवक्त्रें। कल्याणा परलोकासी गेलीं तीं सत्पात्रें।
वैकुंठ कैलास सत्यलोक पावलीं चर्मनेत्रें। पुन्हा आतां दृष्टि दिसेतिना॥ १५-१९

"भोजन सारून कंथा मेखळा आंथरून श्रीसद्गुरुसमर्थ पहुडले. तों कोणी देवभक्त बरोबर हजार पदाति मंडळी घेऊन दिवट्या, हिलाल, यांच्या लखलखाटांत येतांना कल्याणांनीं पाहिलें. इतका थाट दुसऱ्या कोणाचा असावयाचा? श्री रंगनाथ स्वामी श्री समर्थांच्या सेवेसाठीं येऊन दाखल झाले. कनाता, पडदे, पलंग, समया, अनेक तऱ्हेचे खाद्य पदार्थ, वगैरे रंगनाथांनीं श्री स्वामींस समर्पण केले. श्री समर्थांनीं त्यांचा स्वीकार करून कल्याणास हि निराहारी पाहून "नैवेद्य करावा बलभीमार्पण" म्हणून आज्ञा केली. रंगनाथांनीं केळी सोलून द्यावीं व कल्याणांनीं तीं सेवावीं! कल्याणांचे सर्व श्रम परिहार झाले. बाकी त्यांना श्रम कसचे म्हणा, श्रीसमर्थांनी एक कौतुक दाखविलें इतकें च.

गुरुभक्तासी कैचे श्रम कोठें। समर्थ प्रतापाचें नवल मोठें।
घोर अरण्यीं साहित्य नेटें। समर्थें दाविलें सेवकां॥ १५-२७

असे सेवक व असे स्वामी आपणांस कोठें पहावयास सांपडतील?"

## (४) कल्याणांना सर्पदंश

एकदां श्रीसमर्थ रामघळींत होते, बरोबर अनेक शिष्य होते, कल्याण तर असणार च. ज्येष्ठ महिन्याचा उकाडा नुकता च संपून आषाढाच्या शीतलाईस सुरुवात होत होती. पाऊस आणि नद्या नाले यांच्यामुळें घळीची वाट अवघड झाली होती. पाऊस तर असा सुरु होता कीं, सूर्योदय आणि सूर्यास्त हे केव्हां होत ते हि कळत नसे. अशा परिस्थितींत एका गडद काळोख्या रात्रीं कल्याणांचें सत्व पहाण्याचें श्रीसमर्थांनीं मनात आणिलें; [illegible] कल्याणांची थोरवी इतर शिष्यांना

समजावी म्हणून त्यांनीं तसें ठरविलें. अशा त्या रात्रीं, कोणी जागे आहांत कां रे, असें शेजारच्या गुंफेंतील शिष्यांना समर्थांनीं विचारलें. सर्वांचें च हो असें उत्तर आलें. तें ऐकून समर्थांनीं विचारलें, बटव्यांत विड्याचीं पानें नाहींत, तीं कोणी आणतां कां ? समर्थांची ही आज्ञा ऐकतां च, ज्या प्रमाणें दानाची – देण्याची – गोष्ट निघतां च कृपण स्तब्ध होतात त्याप्रमाणें, सर्व शिष्यांनीं मौन स्वीकारलें. अशा अपरात्रीं आणि तशा त्या परिस्थितींत कोणाचें हि जाण्याचें धैर्य होईना, कोणी च कांहीं बोलेना. कल्याण समर्थांजवळ च होते. कोणी हि येत नाहीं असें पाहून, कल्याणांनीं श्री समर्थांचे चरण धरिले आणि

पर्वत आणाया चालिला हनुमंत । वैनतेय निघाला आणूं अमृत ।
पानें आणाया तैसा गुरुसुत । आज्ञासरिसीं निघाला ॥

वाटेंत झाडझुडुप दिसेना, जिकडे तिकडे एकसारखें च दिसे म्हणजे भासे, आणि कल्याणांना मार्ग कांहीं सुचेना. अशा स्थितींत " राम राम जय जय राम " असें भजन करीत कल्याण चालले होते. समर्थांनीं भैरवाला आज्ञा करून ठेवल्याप्रमाणें, कल्याणांच्या वाटेंत

काळसर्प पसरलें असें वदन । पडला पुच्छाग्रीं बळानें चरण ।
उलटोन चाविला तो कडकडोन । सर्व चि प्राण व्याकुळला ॥

आणि इकडे घळींत

प्रेमळ भक्ताचें मंदलें भजन । जाणोन कळवळले दयाघन ।

आणि म्हणून

हिलाल ज्योति हातीं धरून । करित शोधन चालिले ॥

आणि मग

पाठीसी धांवला शिष्यसमुदाय । कल्याणापासीं पातले सर्व ।

तों तेथें

गुरुरूपें सत्शिष्या राघव । कुर्वाळित बैसलासे ॥
जंव कृपा उपजली सद्गुरुनाथा । रामभीम धांवले करुं साह्यता ।

भैरवाचें महत्त्व वाढवावें आणि त्याचें सत्व प्रकट करावें म्हणून, आणि कल्याणां-विषयीं आपल्याला वाटणारें प्रीतिममत्व सर्वांच्या ध्यानीं यावें म्हणून, श्रीसमर्थ " नवस करित बोलिलें मोठ्यानें ".

अहो भैरव तुमचे क्षेत्रीं । वस्तीस राहिलों सहपरिवारीं ।
विदित नाहीं कीं काय अंतरीं । कां आडविला कांतारीं मम बाळा ॥

भैरीससाणा गारोडिया । उतार करी विखा धावोनिया ।
विश्रांति मज बहु याचेनि सखया । सेवक न देखों ऐसा दुजा ॥
परतवी झडकरी याचे प्राण । वाटवीन शर्करा अकरा मण ।
नैवेद्य हि होयील यात्रा भरोन । आतां अनुमान करूं नको ॥

धन्य ते कल्याण कीं ज्यांच्यासाठीं श्री समर्थांनीं नवस केला. धन्य ते कल्याण कीं, ज्यांच्याविषयीं " विश्रांति मज बहु याचेनि " असे उद्गार खुद्द श्रीसमर्थांनीं काढले.

याप्रमाणें नवस बोलून कल्याणांच्या कपाळीं श्रीसमर्थांनीं विभूति लावतां च, कल्याण

ठाकला जोडूनि बध्धांजुळी । सिष्यधर्मानें शंकत ॥

पुढें दुसऱ्या दिवशीं सकाळीं शिष्याहातीं समर्थांनीं चाफळला निरोप पाठविला, तेथे राजदूताला ही हकिकत कळतां च ती शिवरायांना समजली, रथावर अकरा मण साखर घालून इतर साहित्यासह घळीवर पाठविण्यांत आली, आणि श्रीसमर्थांनीं आपला नवस फेडला.

या च कथेला अनुलक्षून समर्थप्रतापांत गिरिधर म्हणतात :

गुरुदेवें भैरवासी येके दिवशीं संदेश केला । निस्पृह कल्याण अजगरें स्पर्शिला ।
तात्काळ अतित निर्विष जाला । क्षत्रपाळ* सन्मानिला समर्थे ॥

## ( ५ ) धोतरासरसीं च झेपावला

एक दिवस समर्थांच्या हरिहर नांवाच्या शिष्यानें समर्थांचें धोतर धुऊन सोवळ्यांत गडाच्या कांठीं वाळत टाकलें होतें, आणि आपण शेजारीं च मंत्र स्तोत्र पठण करीत राखीत बसला होता. इकडे समर्थ स्नानाला उठले, अनंत वगैरे शिष्यांनीं पाणी काढून दिलें, इतर शिष्य समर्थांचे हातपाय घासूं लागले. स्नान तर सुरु झालें, पण अजून धोतर आलें नाहीं, इकडे समर्थांचें लक्ष होतें, म्हणून

× × कल्याण सत्सिष्या पाहुनि गुरुवर ।
बोलिले न आणिलें अजु धोत्र ।
तूं तरी जाऊन आणी सत्वर ।
ऐकोन धावला कल्याणजी ॥

दुसऱ्या दोघांना अरे तें धोतर उचला म्हणून कल्याण सांगणार, तों च

तंव अद्भुत आला फिरत समीर । गडाखालतें उडालें वस्त्र ।

---

* " हें भैरवाचें स्थान चाफळास रामघळ ज्या डोंगरांत आहे त्या च डोंगरांत आहे. "

आणि ते दोघे नुसते घाबरून उभे राहिले, पण कल्याण

धोतरासरसीं च झेपावला ।

लोकांना वाटूं लागले,

असंभाव्य गड उंच । तेथूनि उडी टाकिली साच ।

तेव्हां आतां हातपाय मोडून कल्याण मरण पावले असले पाहिजेत. पण समर्थ म्हणाले, थांबा, तो आत्तां येईल.

ऐसें म्हणतां ते वेळे । कल्याण धावत आले ।

स्वामीशीं दिधलें । धोतर हातीं ॥

सद्गुरुवचनीं पूर्ण विश्वास ठेवून, गुरुसेवेपुढें जीवाची हि तमा न बाळगणारांना श्री रामचंद्र सहाय्य असतात असें दासविश्रामधामकार सांगत आहेत. कल्याणांनीं धोतर आणलेलें पाहून समर्थ हि म्हणाले कीं, श्री राम च पावला म्हणावयाचा, नाहीं तर केवढा अनर्थ होता ! त्या कल्याणांची धन्य होय.

लंगोटी नेसलेले च श्रीसमर्थ आपणांला ज्या त्या चित्रांत पहाण्याची संवय झाली आहे. पण समर्थ धोतर हि नेसत असें या गोष्टीवरून दिसतें. लंगोट वगैरे असून हि समर्थ धोतर कां नेसत ? दासविश्रामधामकार आत्माराम महाराज याचें कारण सांगतात.

कौपीन कटबंद असतां सन्निधीं । उंच वस्त्राची जाली उपाधी ।

भीड न तोडवे जनाची आधीं । गुंततां आग्रहीं गती हे ॥

**( ६ ) कल्याणांच्या खांद्यावर समर्थ**

एकदां समर्थांचा मुक्काम माणगांवीं होता. पाऊस काळ सुरु झाला होता. वाटेंत महापुरामुळें अडून रहाण्याची आणि चिखलकाल्यांत बेजार होण्याची वेळ न यावी, म्हणून कोडळ्याघळींत रहाण्याचें समर्थांनीं ठरविलें आणि त्यासाठीं निघाले ते हि झडींत च. निघाले, तों वाटेंत च

कुकुद्मतीला महापूर पाणी ।

आणि दोन प्रहरची वेळ, पावसांत गांवचे लोक कोणी न येण्याचा संभव, आणि पोटांत क्षुधाग्नि तप्त झालेला. तेव्हां श्रीसमर्थ

ईक्षोन कल्याणा श्रीरामगडी । वर वदले होय तूं नौका नावाडी ।

पाववीं सकळांसी पैलथडी । सेवटीं मातें हि नेईं पां ॥ ७९-४६

अशी गुरुआज्ञा होतां च कल्याणांनीं

न भिजवितां येकेका लाविला थडी । खांद्यावरी वेगीं घेऊनियां ॥४७

ज्यांना पोहावयास येत होतें आणि ज्यांना पोहावयास येत नव्हतें अशा सर्व गुरुबंधूंना नदीच्या पलिकडे कल्याणांनीं नेऊन सोडले. दासविश्रामधामांत ही गोष्ट सांगतांना आत्माराम महाराज म्हणतात कीं, याप्रमाणें ' तराया ' अनेक लोक वृक्षयोगादिक्रिया, बीरमंत्र, चेटकें, वगैरेंच्या सहाय्यानें शिकतात, पण

तें नाहीं पां, येथें फक्त गुरुदया । विश्वासबळें कार्यसिद्धी ॥

शेवटीं श्रीसमर्थांची पाळी आली, आणि कल्याण

मग स्कंदासनीं बैसऊन स्वामीतें । चालिला जैसा पायवाट पंथ ॥

याप्रमाणें कल्याणांनीं सर्वांना खांद्यावर घेऊन नदीपार केल्यावर कल्याणांच्या शिष्यत्वाची त्या सर्वांना धन्यता वाटली. श्रीसमर्थांना हि संतोष झाला, आणि

तोषोन वदले स्वामी दयाळ । सत्य सर्वोत्तमभक्तीचें हें फळ ।
तारक जाला हा विश्वासबळें । अंगवण वोपिलें कीं मारुती ॥

आणि कल्याण हा " श्रीरामगडी " आहे हें जाणून च समर्थांनीं त्यांना हें कार्य सांगितलें होतें. सहज आठवतें, रामलक्ष्मणांना हि मारुतिरायांनीं असे च खांद्यावर घेतलें होतें. रामायणांत मारुतीचें जें स्थान तें च दासायनांत कल्याणांचें होय.

रामचंद्रा जैसा मारुती । तैसा दासा कल्याण ॥

वर म्हटल्याप्रमाणें समर्थांनीं आपला संतोष व्यक्त करून भक्तीच्या प्रशंसेचे दोन श्लोक समर्थांनीं म्हटले. गद्यपद्यादिक शब्दज्ञानाचें, तर्कसाहित्य देहाभिमानाचें, मंत्रयंत्रादि पूजाविधानाचें आणि योगयागादिकाचें येथें कांहीं काम नाहीं; या साऱ्या वैभवामुळें ज्ञातेपणाचा फुंज चढतो आणि त्या योगानें लोकत्रयाचे स्वामी श्री रामराय अंतरतात, असें त्या दोन श्लोकांत सांगून समर्थ ते श्लोक खालीलप्रमाणें पुरे करितात :

म्हणोनी बहू आवडी त्या जनाची । जेथें सावडी भक्ति सर्वोत्तमाची ॥

समर्थांनीं केलेली कल्याणांची स्तुति ऐकून इतर सर्वांना संतोष वाटावा हें साहजिक च आहे.

परि तारिफीं दचकला कल्याण गोसावी ।
त्यासूनि श्रेष्ठांगु सद्गुरुपाईं । स्तवित उभेला सगद्गदें ॥

आणि कल्याणांची हि अशी स्थिति होणें साहजिक च आहे. सज्जनांचा विनीत भाव सदासर्वकाळ सारखा च असतो आणि आपली स्तुति ऐकून त्यांना कसेंसें च होतें.

### ( ७ ) कल्याण चोरांना बडवितात

आरती शेजारती झाली होती, मध्यरात्र टळून गेली होती, आणि जो तो आपल्या नेमलेल्या स्थानीं विश्रांतीसाठीं पडला होता. श्री समर्थांची शय्या

आंगणांत घातली होती, श्रीसमर्थ पहुडले होते आणि कल्याण त्यांचे पाय चुरीत बसले होते. उभयतांच्या गुजगोष्टी चालल्या होत्या. अशांत कल्याणांना चोरांची-बेरडांची चाहूल लागली, आणि कल्याणांचें चित्त चंचळ झालें. तें पाहून समर्थांनीं कल्याणांना विचारलें,

कां अंतरात्मा चळला रे ॥

दुष्ट नष्ट तस्कर आल्यामुळें त्यांना काय अपाय करावा असें मनांत येऊन आपलें चित्त चलित झाल्याचें कल्याणांनीं कबूल केलें. त्यावर समर्थ म्हणतात :

अरे कल्याणा उपाधियोग । घडो पाहतो कीं हा प्रसंग ।
चालता टाकुनि उपास्य मार्ग । श्रीरामासि नावडे ॥

आशा धरून हे चोर आले आहेत, त्यांच्यावर आपल्या हातून उपकार च व्हावा ना, असें म्हणून समर्थ कल्याणांना विचारतात कीं, तुझ्या मनांत काय आलें आहे, तूं काय ठरविलें आहेस, विहिताविहित तुला समजतें, तरी या वेळेस काय करणें योग्य तें तूं सांग.

जेणें तुष्टेल श्री रघुनायक । तें चि प्रतिपाळण ....

ही श्री समर्थांची आज्ञा ऐकून त्यांच्या चरणीं मस्तक ठेवून कल्याण म्हणतात,

समीप आलासे मोहत्साव । मिळाला मिळेल बहु समुदाव ।
उपासनेला विन्मुख न व्हावे । निर्विघ्न उपाव योजावा ॥
सत्ता असोन कां धरिजे शांती । साह्य असतां कीं श्रीराम मारुती ।
श्रेयस्कर नव्हे कीं चोरा उपकृती । बहुतांच्या वृत्ती तगबलेल ॥
येकदां करितां मोकळीक । मठीं न धारती पुढें भाविक ।
चोरास दंडितां नसे पातक । मोडावा दंडक खोटा हा ॥
स्वामिरायाचें नांव घेऊनि । वागती भाविकीं काननीं सदनीं ।
न होय तयाला बाधा कवणी ।

हें ऐकून समर्थ हांसले, आणि

म्हणतिले तरि बा उठी झडकरी । चिंतोन महारुद्रा हृदयांतरीं ।
अपायकर्त्याला सिक्षा करी । बळ संचरेल आंगीं बहु ॥

श्री समर्थांचें हें वरद वचन ऐकतां च हृदयीं मारुतीचा वास होऊन त्यांनीं आपली शक्ति कल्याणांना दिल्याप्रमाणें कल्याणांची मूर्ति दिसूं लागली; आणि

राखुं कीं अवध्यांचे मारूं जीव ।

हा कल्याणांचा प्रश्न ऐकून

हासोन बोलिले महानुभाव । अहिंसाधर्म श्रेष्ठ रे ॥
कवणातें ही न द्यावें दुःख । परि थोड्यानें होईल थोर काम नासक ।
दंडितां याला बहुतांसि हरिख । उपासका मुख्य उपासना ॥

आणि यांची उपासना कोणती ? तर श्रीराममारुतीची ! त्यांचे चरित्र काय सांगतें ?

रजनीचर त्या दुष्टा करूनि मार । त्रासुनि अपवित्रा जाळुनि घर ।
जयवंत जाले पुण्यवंत वीर । तरि धर्मस्थापना अगत्य ॥

तेव्हां श्रीराम योग्य तें च करील, तूं या चोरांचे प्राण न घेतां त्यांना काय ती शिक्षा कर.

यावर खांद्यावर निबारा आणि हातांत चोबा घेऊन कल्याण बाहेर आले आणि त्यांनीं ' जय जय राम ', अशी मोठ्यानें गर्जना केली. कल्याणांचे ते वीर धीर प्रतापी रूप पाहून च चोरांचें अवसान गळालें. समर्थआज्ञेप्रमाणें त्यांचे जीव न घेतां कल्याणांनीं त्यांना असें बेदम बडविलें कीं, त्यांना जागचें हालणे मुष्किल झालें, आणि ते ठिकठिकाणीं पडून राहिले. कल्याणांनीं त्यांचीं सर्व शस्त्रें वस्त्रें हिरावून घेतलीं, त्यांचा एक गठ्ठा करून तो दाराबाहेर ठेविला, आणि आपण नदीवर गेले. तेथें निबारा धुवून घेतला, स्नान केलें, आणि परत येऊन श्री समर्थांना सर्व वृत्तांत निवेदन करून त्यांची चरणसेवा करीत बसले.

मठांत कोणाला च याची वार्ता नव्हती. दुसऱ्या दिवशीं सकाळी नेहेमींप्रमाणे मठांतील कार्यक्रम सुरु झाले. श्री समर्थ दिशेकडे जातांना वाटेंत ठिकठिकाणीं हे चोर पडलेले त्यांना आढळले. रात्रीं ज्या वीरानें चवताळून आमची ही अशी स्थिति केली त्याला बोलवा आणि त्याच्याकडून आमच्या डोक्यांत दगड घालून या वेदनांपासून आम्हांला मुक्त करा किंवा कांहीं उपचार करून आम्हांला वांचवा, म्हणजे हा धंदा आम्ही सोडून देऊन आपली सेवा रात्रंदिवस संपादन करूं आणि आमच्या जन्माचें सार्थक करू अशी चोरांनीं समर्थांचीं बरी च काकुलती केली, ती ऐकून समर्थांनीं कल्याणांच्या हातानें त्यांना अंगारा लावविला, आणि ताबडतोब त्यांच्या अंगावरील घाव आणि वेदना नाहींशा होऊन त्या सर्वांच्या काया निरोगी झाल्या.

कल्याणकराचे कल्याणकर । उद्धरले तरु अजगर तस्कर ।

कल्याण पुण्यवान होते, त्यांचे कर पुण्यवंत होते. कारण ज्या हातांनीं कल्याणांनीं श्रीसमर्थांची चरणसेवा करून आणि श्रीराम, श्री मारुति आणि श्री समर्थ यांचें पूजन करून कल्याणांनीं त्यांना तोषविले होते, असे ते हात होते.

जया करानें चुरितां चरण । तोषोन विश्राम पावती सज्जन ।
जया करानें करितां पूजन । राम भीम गुरुवर्य तुष्टती ॥

तेव्हां

पुण्यवंताचे धन्य हातगुण । निर्मळ हो ठेले अंतःकर्ण ।
परमार्थी रुजु पडलें मन । शुचिर्भूत जाले सबाह्य ॥

चोरांनीं समर्थांच्या चरणी लोटांगणें घातलें आणि समर्थांनीं त्यांना आपले सेवेंत रुजू करून घेतले.

( ८ ) ब्राह्मणतेज

समर्थें येकदां कौतुकें नीच यातीस चढवीलें ।
ब्राह्मणतेज प्रत्यया आणिलें ।
सहस्र अंतेजासी येकसरें पिटिलें ।
कल्याण नामा दूत प्रेरूनियां ॥ ३ - ७६

गिरिधरांच्या समर्थप्रतापांतील ही ओवी चोरांच्या वरील गोष्टीसंबंधीं च आहे, का हा कांहीं दुसरा प्रसंग आहे, सांगतां येत नाहीं.

( ९ ) माजलेल्या हत्तीची गोष्ट

एकदां यात्रेंत एक माजलेला हत्ती मोकाट सुटून सगळीकडे धिंगाणा घालूं लागला आणि लोकांवर धावून जाऊं लागला; दगडांशीं टकरा घेऊं लागला आणि झाडांना सोंडेनें वेटोळे घालूं लागला. स्त्रिया व बालकांचा गलबला झाला, सारे लोक इतके घाबरून गेले कीं, कोणाला च कांहीं सुचेना. माहुतानें तर तोंड च लपविलें आणि भालेकऱ्यांचें हि कांहीं च चालेना.

अवस्था हे पाहुनि समर्थ । आज्ञापिलें पाहोन कल्याणाते ।
धरुनि नागाते करी परत । आज्ञासरसीं च धांवला ॥
सोंड धरुनि वोढितां हस्तें । घाबरला नाग तो किंकाळ्या देत ।
तुडऊं पाहे तो धरुनि दंत । मुष्टिघात देतां कुंभस्तनीं ॥
लेंड्या टाकी तो लपऊन सोंडात । जाला गुलामसा आज्ञांकित ।
सद्गुरुपासीं आणिला वोढित । नये चि मस्तिला पुनरपि ॥

श्री समर्थांच्या आज्ञेवरून बांधण्यासाठीं कल्याणांनीं हत्तीला ठाणावर नेले असतां तेथून तो पळाला, पण कल्याणांनीं शेपटीं धरून त्याला पुन्हा जागेवर आणिलें. पूर्वी अशा गोष्टी झाल्या होत्या.

दयार्णवस्वामीची ऐकुनि मात । मदगजु जाला बुद्धिवंत ।
भीमशेनधाकें ऐरावत । साव होउनि उतरला ॥
भागीरथीचा लागतां चपेटा । गजराज हो ठेला सात्विक मोटा ।
तेवि कल्याणकरानें स्वभावचेष्टा । त्यागुनि जाला सात्विक ॥

कल्याणांच्या हातगुणाची ही आणखी एक प्रचीति.

बळवान ऐसा तो कल्याण गोसावी । सद्गुरुवरदें जालासे ॥

## ( १० ) समर्थांशीं ध्यान । कल्याणाचें

समर्थ कोठें हि गेले तरी त्यांच्या बरोबर कल्याण हे असावयाचे च. औरंगाबाद, पंढरपुर, माहुर, नगर वगैरे अनेक ठिकाणीं समर्थांबरोबर कल्याण गेले असल्याचें चरित्रकार सांगतात. शक १५६७ त श्री समर्थांची भेट झाल्यापासून शक १६०० त समर्थांच्या आज्ञेवरून डोमगांवास जाईपर्यंतचा कल्याणांचा बहुतेक सारा काळ श्रीसमर्थांच्या सहवासांत गेला.

समर्थांजवळी । बहुत होती शिष्यमंडळी ।
निकट कल्याण जवळी । स्वामींपाशीं ॥
जेथें स्वामी राहती । तेथें कल्याण असती ।
समर्थ कल्याण संगती । बराबर ॥
जिकडे स्वामींचे पाय । तिकडे कल्याण आहे ।
पाय सोडोनि न जाय । कल्याण कधीं ॥
कल्याणाशीं आधार । स्वामींचा निर्धार ।
होऊनियां तत्पर । स्वामींजवळी ॥
सकळ शिष्य मिळोनी । निंदा करिती कल्याणीं ।
म्हणती समर्थांनीं । द्वैत धरिलें ॥

कल्याणाचे गुरुबंधु त्यांची निंदा करूं लागले. त्यांना वाटूं लागलें,

आम्ही इतुके जण । जवळी असून ।
समर्थांशीं ध्यान । कल्याणाचें ॥
मोठा धाठा धटिंगण । समर्थी ऐसा पाहून ।
नित्य जवळ ठेवून । आपणांपाशीं ॥
रानीं वनीं जवळी । तो चि राहे नित्य काळीं ।

असें मत्सरानें प्रेरित होऊन शिष्यमंडळी आपसांत बोलूं लागली. त्यांना वाटूं लागले, समर्थ पक्षपात करीत आहेत. या च सुमारास नेमाप्रमाणें गुरुवारीं श्री समर्थांचें दर्शन घेण्यासाठीं शिव छत्रपति हि येऊन दाखल झाले. शिष्यांना हें बरें च फावलें, त्यांनीं संधी पाहून राजांना एकीकडे गांठलें आणि सांगितलें,

× × हा धटिंगण । सर्वांमध्यें ॥
नाहीं संध्या जप ध्यान । नाहीं दासबोधविलोकन ।
नाहीं रामपूजन । कदा काळीं ॥

कल्याण संध्या करीत नाहींत, जप करीत नाहींत, ध्यान करीत नाहींत, समर्थ संप्रदायाचा आधार असलेली रामोपासना हि जाणीत नाहींत. असे आरोप कल्याणांवर त्यांच्या कांहीं गुरुबंधूंनीं केले.

मत्सराचें हें असें च असतें. एकदां डोळ्यावर मत्सराचा चष्मा चढविला, म्हणजे दुसऱ्याच्या ठिकाणीं नसलेले हि दोष दिसूं लागतात, एवढें च नव्हे, तर आपल्या च दोषांची आरोपणा आपण त्याच्या ठिकाणीं करूं लागतो.

मनीं काम तो काम सर्वांस लावी ।
मनीं नष्ट तो नष्ट सर्वांस भावी ।
मनीं पाप तो पाप लावी जनाला ।
जनीं दोषिया निंदितो सज्जनाला ।

पण हा मनुष्यस्वभाव आहे. त्याकाळीं तो जसा होता, तसा च तो आज हि आहे आणि पुढें हि रहावयाचा आहे. आपण कोणाची नालस्ती करितो आणि कोण आपली नालस्ती करितात याचा विचार करून आणि त्या दृष्टीनें आपल्या गुणदोषांचें आत्मनिरीक्षण करून, दोष टाळण्याचा आणि गुण वृद्धिंगत करण्याचा प्रयत्न करीत करीत प्रत्येकानें पुढें जात राहिलें पाहिजे. असो.

शिष्यांनीं कल्याणांबद्दल राजांजवळ केलेली कागाळी समर्थांनीं जाणली आणि कल्याणांच्या कसोटीचें कौतुक दाखविण्याचें योजिलें. दुपारचीं जेवणें झालीं, पानसुपारी घेऊन सर्वजण बसले, आणि चार गोष्टी निघाल्या असतां, दासबोधाचीं कोणी किती पारायणें केलीं असें समर्थांनीं विचारलें. कोणी म्हणाले १००, कोणी म्हणाले २००, वगैरे. तुम्ही हि दासबोध वाचीत असाल च असें समर्थ राजांना म्हणाले. सवड होईल त्या प्रमाणें आपण हि पांच पन्नास पारायणें केलीं आहेत असें त्यांनीं सांगितलें. त्यावर समर्थ म्हणतात, छान तर तुम्हां सर्वांना परमार्थ समजला, दासबोधाचा अर्थ हि कळला असणार च, तेव्हां आतां मी एक ओवी विचारितो, ती दासबोधाच्या कोणत्या दशकाच्या कोणत्या समासांत कितवी आहे, तें निश्चयपूर्वक सांगा. असें

म्हणून समर्थांनीं ओवी सांगितली पण ती कोणास हि काढून देतां येईना. शिवाजी-राजांना विचारलें, पण त्यांना बोलवेना. तेव्हां समर्थांनीं कल्याणांना हांक मारली आणि त्यांना ती ओवी काढून देण्यास सांगितलें. कल्याणांनीं तत्काळ ओवी काढून दिली.

नाना प्रकारांनीं शिष्यांची श्री समर्थ परीक्षा पहात. शिष्यांची परीक्षा घेण्याची त्यांची ही एक तऱ्हा होती. शिष्याला ग्रंथ समजला आहे, कां त्याला नुसतें ' ग्रंथपूजन ' च घडलें आहे म्हणजे " अर्थ समजल्यावांचून किंवा अर्थाकडे लक्ष दिल्यावांचून नुसतीं पारायणें " च त्यानें केलीं आहेत, हें यावरून दिसून येई.

## ( ११ ) खांडुकाची गोष्ट

एवढ्यानें तरी शिष्यांनीं उमजावें कीं नाहीं ? पण जन्मजात स्वभाव कधीं सुटला आहे कां ? शिष्य पुन्हां कल्याणांची निंदा करूं लागले आणि समर्थांनीं पुन्हां कल्याणभक्तीची कसोटी दाखविण्याचें ठरविलें. समर्थांनीं एक पिकलेला आंबा घेतला आणि तो मांडीला बांधून खालींत बिछान्यावर पडून विव्हळूं लागले. ज्याला त्याला हांक मारून, हें काय झालें पहा रे, सणका फार निघत आहेत, वेदना सहन होत नाहींत, वैद्य घेऊन येण्याविषयीं राजांना तरी कळवा, अशी समर्थांनीं सारी गडबड उडवून दिली. राजांना निरोप गेला, वैद्यांना घेऊन ते त्वरित आले. वैद्यांनीं हात लावून परीक्षा केली आणि कांहीं औषधयोजना सांगूं लागले, तों याला कांहीं उपाय नाहीं कां असें राजांनीं समर्थांना च विचारलें. तेव्हां समर्थ म्हणाले, हें गळूं तोंडानें कोणी चोखल्यास मला गुण पडेल. समर्थांच्या मुखांतून निघालेला हा उपाय ऐकून एक हि शिष्य जागेवर राहिला नाहीं, सारे पळून गेले. समर्थांजवळ फक्त राजे आणि कल्याण एवढे च राहिले; आणखी राजांचे सेवक काय असतील ते. हें गळूं तोंडानें कोणी चोखल्यास मला गुण पडेल, हे शब्द समर्थांचे मुखांतून निघाले नाहींत तों च ज्या तत्परतेनें बाकीचे शिष्य पळून गेले, त्या च तत्परतेनें कल्याणांनीं गळवाला तोंड लावून तें चोखण्यास आरंभ केला. तेथें तर आंबा च होता, कल्याणांनीं तो सगळा चोखून खाल्ला आणि समर्थांचें खांडुक बरें झालें.

## ( १२ ) समर्थांचें वेड्याचें सोंग

एकदां श्री शिवछत्रपतींनीं दरबारांत एका सौदागरापासून ३६० होनांना एक तरवार विकत घेतली. त्या च वेळीं ती तरवार पाहून एका ज्योतिषानें राजांना सांगितलें कीं, ही अमोल्य वस्तु आहे खरी, परंतु घातकी आहे, म्हणून समर्थांच्या हातीं ही राहील, तर हिच्यामुळें अनेकांना गती मिळेल, बहुतांचा अहंकार हरेल, आणि

वानावया होईल चरित्र । दृढता बाणेल बहुतासी ॥

छत्रपतींना हा सल्ला मानवला, आणि सज्जनगडावर जाऊन त्यांनीं श्री समर्थांची पूजा केली आणि दक्षिणेसह ती तरवार त्यांना अर्पण केली. समर्थांनीं ती आपल्या शेजघरांत ठेवून दिली, आणि राजे निघून गेले. चहूंकडची " खबर "* मिळविण्यासाठीं रवाना झालेले सर्व शिष्य आपआपलीं कामें उरकून गडावर परतले होते; आणि समर्थांनीं

शिष्यसमुदायाची परीक्षा मांडिली ।

पण त्यापूर्वी समर्थांनीं कल्याणांना गडावरून दूर पाठविण्याचें ठरविलें. त्यामुळें वेळोवेळीं सुचलेले, आणि दोन चार भाषांत लिहिलेले, नानाप्रकारचे " बंद प्रबंद ग्रंथादि " नकलून काढण्याचें काम सांगण्यासाठीं त्यांनीं कल्याणांना बोलाविलें,

आसिरवाद देऊनि सदयें । दाऊन पडला तो कवनसंग्रह ।
ह्मणितले उतारे करी लवलाह्य । चाफळ क्षेत्रांत राहुनी ॥

आणि शिवाय वर आज्ञा केली कीं,

हें अवघें लिहिणें जाल्याविरहित । येऊं नको तूं इकडे गडांत ।

तेव्हां शिष्यांना वाटलें कीं, कांहीं अपूर्व लीला दाखविण्याचें श्रीसमर्थांनीं मनांत आणिलें आहे. समर्थआज्ञेप्रमाणें कागदपुर्ज्यांची " मोट " घेऊन कल्याण चाफळास गेले, आणि श्रीसमर्थांची कविता नकलण्याचें काम करूं लागले; इकडे समर्थांनीं शिष्यपरीक्षेची आपली लीला आरंभिली. परीक्षा कशासाठीं करावयाची ?

परीक्षा करूं भाविले सज्जन । दिधलेती कैसे तनुमनधन ।
कैसें कोणाचें आहे दृढ मन । कोणाची वृत्ती कैशी असे ॥

कोण काय बोलती घालिती आळ । कोणा वोपावें काय वरद फळ ।
कोठें ठेवावा मम बोध अढळ । ऐसें दयाळ चिंतितु ॥

दिसती तरी सगट सारिखे । बोलती तरी अनुभववाक्य ।
प्रत्ययपण ध्याना आणूं मुख्य । मांडिलें कौतुक योगींद्रें ॥

आणि म्हणून समर्थांनीं काय केलें ? वेड्याचें सोंग घेतलें. सर्वांगाला शेंदूर फासला, कपाळीं कुंकवाचा मळवट भरिला, ती तरवार हातीं घेतली, जटा मोकळ्या सोडल्या, गळयांत पुष्पहार घातले, विडा खाल्ला, बाहेर येऊन ज्याला त्याला दगड मारूं लागले, आणि

---

* शिष्यांकरवीं चहूंकडील " खबर " श्रीसमर्थ कशासाठीं मिळवीत असतील बरें ?

बोलिले मोठ्यानें जालों आतुर । या कोणी सन्मुखी मारीन ॥

समर्थांचे हें जगदंबास्वरूपी भयानक रुप पाहून सर्व जण दचकले.

कोणी न येती जवळी । लोक करिती पळापळी ।
म्हणती वेड लागलें समूळीं । समर्थांशीं ॥

समर्थ म्हणतात, हो, मला वेड लागलें आहे, आणि हें

वेड लागोन मज होतसे घोर । तनुमनधनाचा वाटतो भार ।

पण माझें हें वेड नाहींसे होण्याला एक उपाय आहे, कोणता, तर

जीव बहु घेतल्याविण उतार । न होये चि कोणी धांवा रे ॥

जीव देऊनि तोषवाल मातें । उपकार घडेल पुढें बहुतातें ।
कृपा करील श्री रघुनाथ । पिसाटपणातें वारील ॥

असें म्हणून श्री समर्थांनीं उड्डाण केलें, पण

हें देखोन येकायेकीं स्वरूप । बहुतेकां सुटले भय चळकाप ।
धैर्य न होय येऊं समीप । लपोन राहिले कितेकीं ॥

कित्येक पळून गेले, कित्येक तोंडें सुकून मूर्छित झाले, सर्व च जण गुरुभक्तीचें विस्मरण होऊन भ्रमांत पडले.

कोणी जवळ येत नाहीं असें पाहून समर्थांनीं रानाची वाट धारिली, आणि तेथें तरवार फिरवीत दगडांवर बसून राहिले. प्रसंगवशात् त्या वाटेनें येणाऱ्या जाणाऱ्यावर उडी टाकीत. त्यामुळें सगळीकडे बोभाटा झाला, आणि वाहती वाट बंद झाली. शुद्ध संप्रदायांत हें काय विघ्न ओढवलें म्हणून शिष्यजन हळहळूं लागले, तर इतरेजन समर्थांना भूतबाधा झाली अशी निंदा करूं लागले. समर्थांच्या वेडाची ही वार्ता राजांच्या कानीं गेली, त्यांनीं ब्राह्मणांकरवीं जपतप सुरू करविले, अनेक देवांना नवस केले. गडावर अनेक प्रकारचे अनेक लोक जमले. ज्यानें त्यानें आपआपल्यापरी अरिष्टनिरसनार्थ व्रतें, उपोषणें, अनुष्ठानें आरंभिलीं. कोणी तरी एकानें मरण्यास तयार होऊन समर्थांकडे जावें असें बोलण्यांत येऊं लागलें. पण तो " कोणी तरी " दुसरा असावा असें प्रत्येकास वाटत होतें. मरणास कोण तयार होणार ? इतक्या थराला गोष्टी येऊन पोंचल्या, तेव्हां कल्याणांची आठवण होऊन

म्हणती या समई असतां कल्याण । समजाविसी करितां युक्तीनें ।

आणि म्हणून कल्याणांना आणण्यासाठीं अनेक जण निघाले, ते चाफळला गेले, त्यांनीं कल्याणांना समर्थांच्या वेडाची सर्व हकिकत सांगितली, आणि " करा जी

तांतडी निघावया " अशी त्यांची विनवणी केली. पण कल्याणांना तेथून निघतां येईना. ते समर्थआज्ञेनें बांधले गेले होते.

मी आज्ञाप्रमाणीं गुंतलो येथ ।

म्हणून त्यांनीं आलेल्या आपल्या गुरुबंधूंना सांगितलें कीं, अरे, उगीच कां घाबरतां, करुणानिधान समर्थांच्या चरणांवर लोटांगण घालतांना कांहीं च संशय मनांत धरूं नका, गुरुरायाचे चरण धरले म्हणजे कोणतें हि विघ्न एवढेंसें हि बाधत नाहीं, समर्थांनीं ही लीला परीक्षेच्या निमित्तानें आरंभिली आहे, सर्व कांहीं ठीक होईल, जा तुम्ही, आणि सर्वांना सांगा कीं,

तनुमनधन अर्पण असेल सत्य । तया गुरुनाथ प्रसन्न ॥
तनुमनधनाची आशा कायसी । कां भ्यावें जावया सद्गुरुपाशीं ।
जो टाळिता आपुले जन्ममृत्यासी । अपाय घडेल कां तेथें ॥

चाफळला गेलेली मंडळी परत आली, आणि कल्याणांचा निरोप त्यांनीं सर्वांना सांगितला; परंतु " धैर्य कवणासी न होय. "

त्यामुळें कल्याणांना वारंवार निरोप जात, पण समर्थआज्ञेपुढें कल्याणांचा उपाय चालेना. शेवटीं कल्याणांचें नकलणें हि संपत आलें आणि कल्याण गडावर येते झाले. कल्याण गडावर आल्यामुळें " उल्हास वाटला सकळासी. " कल्याणांनीं सर्वांना आश्वासन देऊन निर्भय केलें, आणि कल्याण समर्थांकडे जावयास निघाले. कसे ?

राजयापासीं पातला स्वबाळ । वाघीणसवें करु पिली खेळ ।
त्रिंबका भेटों आला गणपाळ । ब्रह्मा ये जैसा हरीपाशीं ॥

कल्याणांना येतांना पाहून हा मात्र आपल्याला आतां घेऊन जाणार हें समर्थांनीं ओळखिलें. समर्थ दुरून दिसतां च कल्याणांनीं साष्टांग नमस्कार घातला, आणि कल्याणांना पाहून समर्थांनीं हातीं तरवार घेऊन चवताळत आरोळ्या देण्यास सुरुवात केली. तेव्हां कल्याण म्हणाले, महाराज, मी तर सिद्ध च आहे, आपण हळू च उतरा, आपले पाय दुखतील. समर्थ दगड मारूं लागले, तर कल्याण म्हणतात, गुरुदेव, आपल्या हातापायांना श्रम होत असतील, मी तें चेपीन, आपण विश्रांति घ्या. आतां मी तुझी मान कांपणार असें समर्थांनीं कल्याणांना दटावतां च कल्याण म्हणाले —

मान कांपावी आपले हातें । सार्थक होईल जन्मातें ।

पण समर्थ कल्याणांना तेवढ्यावर थोडे च सोडणार ! तूं खाऊन फार माजला आहेस, तेव्हां मी तुझे तुकडेतुकडे करीन, असें म्हणून समर्थांनीं कल्याणांना खालीं

पाडण्यासाठीं त्यांच्या शेंडीस हात घातला, तो कल्याण च स्वतः उताणे पडले, समर्थांनीं त्यांच्या छातीवर पाय दिला आणि कंठावर तरवार उफराटी धरली. आजूबाजूला लपून पहाणाऱ्यांना आतां कल्याणांचे मरण ओढवलें असें वाटूं लागलें, आणि एकट्या कल्याणांच्या घाताने तरी हे प्रकरण मिटो, बाकीच्यांची सुटका होवो, आणि श्री गुरु समर्थांच्या वृत्तींत पालट पडो, असें त्यांच्या मनांत आलें. तुझे तुकडे तुकडे करीन असें म्हणून समर्थांनीं कल्याणांच्या कंठीं तरवार ठेवतां च, कल्याणांना हांसूं आले, आणि आपल्या मनांत असेल तें करा, पण, महाराज, आपली इच्छा पुरी करून घ्या, असें कल्याणांनीं म्हटलें, तों च

+ + + + + समर्थांनीं। कल्याण धरिला हृदयभुवनीं।
प्रेमें मुख चुंबोनी। भेटते जाहले॥

नंतर समर्थआज्ञेवरून कल्याणांनीं झोळींतून सामुग्री काढून स्वयंपाक केला. समर्थांचें भोजन झालें, आणि मग

संतोषें उभौ चालोन सत्वर। सत्गडाप्रती पातले॥

समर्थांच्या वृत्तींतील प्रसन्नता पाहून सर्वांना आनंद झाला आणि सर्वांच्या मुखांतून उद्गार निघाले —

धन्य कल्याण तिहीं लोकां॥



( ३ )

## श्री कल्याणांची जीवनकथा

कल्याण स्वामींचें चरित्र जें कां । सुचित मनानें पुढें ऐका ।
पुष्टिता चढे सत्सिष्यलोका । जें रघुनायका बहु आवडे ॥

ती. शंकर श्रीकृष्ण ऊर्फ नानासाहेब देव यांच्या कल्याणविषयक लेखांचीं परिशिष्टें देण्याचें आम्ही ठरविलें आहे. त्या परिशिष्टांवरून वाचकांना कल्याणांच्या जीवनकथेचा आवश्यक तो परिचय होणार आहे. कल्याणांची जीवनकथा संकलित करण्याचें काम आपल्या हातून नीट होत नसल्याची जाणीव असल्यामुळें आणि त्या परिशिष्टांचा हवाला वाचकांना देतां येऊन आपलें काम तेवढें च सुलभ होईल असें वाटल्यावरून आम्ही तीं परिशिष्टें देत आहोंत. शिवाय कल्याणकवन आणि कल्याणस्तवन या दोन भागांवरून वाचकांना कल्याणांचा यथार्थ परिचय झालेला असणार च. तेव्हां त्या दृष्टीनें आमच्यासाठीं वास्तविक विशेष कांहीं उरलें च नाहीं. पण कल्याणांच्या सहवासांत आणखी कांहीं काळ घालविण्याचा मोह आवरत नसल्यामुळें, कोठें कोठें होणारा पुनरुक्तीचा दोष पत्करून हि, कल्याणांच्या जीवनकथेचा आणखी थोडासा विचार

( १ ) कल्याणांना समर्थदर्शन
( २ ) थोडी पूर्वीची हकिकत
( ३ ) झाडाच्या फांदीची गोष्ट
( ४ ) लेखक कल्याण
( ५ ) तें सांकेतिक पत्र, कल्याणांचें कां समर्थांचें ?
( ६ ) दिवाकरउद्धववादांत कल्याणांची भूमिका
( ७ ) कल्याणांचे शिष्य महंत
( ८ ) कल्याणांची थोरवी
( ९ ) कल्याणांचें निर्याण, आणि
( १० ) कल्याणांची समाधी

या दहा मथळ्यांखालीं करावयाचें आम्ही योजिले आहे.

### ( १ ) कल्याणांना समर्थदर्शन

तीनशें वर्षें झालीं, आपल्या इतिहासांतील दोन महत्त्वाच्या घटना घडल्या. शक १५६७ ( इ. स. १६४५ ) सालीं श्री शिवछत्रपतींनीं स्वराज्य स्थापनेच्या

कार्याला प्रारंभ केला, आणि कल्याणांना श्री समर्थांचें दर्शन होऊन त्यांना समर्थांचा अनुग्रह झाला तो हि या च वर्षी. अखंड भारतांतील बारा वर्षांचें आपलें तीर्थाटण पुरें करून कांहीं विशिष्ट हेतूनें कृष्णातीरीं नुकतें च झालेलें श्रीसमर्थांचें आगमन, श्री समर्थ व श्री शिवाजी महाराज यांचे अन्योन्य संबंध, आणि श्री शिवछत्रपतींच्या स्वराज्य-स्थापनेच्या कामीं त्यांना झालेलें श्रीसमर्थांचें व सांप्रदायिकांचें साहाय्य, अशा साऱ्या दृष्टींनीं पहातां वर उल्लेखिलेल्या दोन्हीं हि ऐतिहासिक घटना सारख्या च महत्त्वाच्या ठरतात; आणि म्हणून शक १५६७ ( इ. स. १६४५ ) या वर्षाला आपणा मराठ्यांच्या इतिहासांत अपूर्व महत्त्व आहे.

तो श्रीसमर्थकल्याणांच्या पहिल्या भेटीचा प्रसंग आपणांस पहावयाचा आहे. एकदां आपल्या प्रवासांत श्रीसमर्थांचा मुक्काम कोल्हापुरास पडला. श्री जगदंबेच्या देवळांत रोज रात्रीं समर्थांचीं कीर्तनें होऊं लागलीं. एके रात्रीं समर्थांचें कीर्तन चालू असतां तेथील एक संभावित ब्राह्मण अधिकारी बरवाजीपंत* कुळकर्णी हे जगदंबेच्या दर्शनास गेले. त्यांचें भाग्य उदयाला आलें, आणि समर्थांचें कीर्तन ऐकून त्यांचा अनुग्रह घ्यावा अशी त्यांना प्रेरणा झाली. त्याप्रमाणें दुसरें दिवशीं समर्थांकडे जाऊन त्यांना आपल्या घरीं आणून बरवाजीपंतांनीं यथाशास्त्र समर्थांचा अनुग्रह घेतला. समर्थांच्या पुजेची सर्व व्यवस्था बरवाजीपंतांच्या येथील अंबाजी नांवाच्या मुलानें केली होती. त्यानें च भोजनासाठीं पंक्ति वगैरे मांडण्याची सर्व व्यवस्था ठेवली होती. या मुलाची टापटीप, निरलसता, कर्तव्यतत्परता, पडेल तें काम करण्याची तयारी वगैरे गुण पाहून समर्थांनीं बरवाजीपंतांजवळ त्याची चौकशी केली. तेव्हां, हा आपला भाचा, गंगातीरच्या बाभुळगांवच्या§ कृष्णाजीपंत कुळकर्ण्यांचा मुलगा, त्याचे वडील महायात्रेस गेले आहेत, आणि हा आपली आई व धाकटा भाऊ यांचेसह आपल्याकडे च आहे, असें बरवाजीपंतांनीं सांगितलें.

समर्थांनीं अंबाजीस बोलावून घेऊन त्याचें नांव विचारलें, आणि त्यास लिहावयास येतें कीं नाहीं याची चौकशी त्याचेजवळ केली. त्यानें हो म्हणून सांगतां च समर्थांनीं एक सवायी म्हटली आणि अंबाजीनें ती तत्काळ लिहून दाखविली. याप्रमाणें समर्थांनीं अंबाजीची बऱ्याच वेळा परीक्षा घेतली. त्याची तीव्र स्मरणशक्ती आणि सुंदर अक्षर पाहून समर्थांना आनंद झाला, आणि हा मुलगा आपल्या ग्रंथलेखनास योग्य आहे असा विचार करून, हा मुलगा आपल्याला गुरुदक्षिणा म्हणून द्यावा असें त्यांनीं बरवाजीपंतांना सांगितलें. त्यावर, आपण खुद्द सेवेंत रहातों, मुलाची आई असल्यामुळें, त्यावर आपला अधिकार नाहीं असें

* बखरींत हें नांव ' पाराजीपंत ' असें आहे. § शिरगांव मठपति भीमस्वामी आपल्या श्री समर्थचरित्रांत हें गाव " भोगूर " असें देतात.

बरवाजीपंतांनीं म्हटल्यामुळें, समर्थांनीं मुलाच्या आईला च विचारिलें, आणि त्या माऊलीनें "महाराज, अंबाजीस च नेतां, आणि आम्हां दोघांस टाकतां, आम्ही तिघे हि शरण आहों," अशी समर्थांची विनवणी केली. समर्थांना आनंद झाला आणि तिघांना हि अनुग्रह देऊन त्यांना बरोबर घेऊन समर्थ पुढें रवाना झाले.

बखरींतील ही कथा आत्माराम बोवांनीं जवळ जवळ अशी च सांगितली आहे. पण

बाहेर लक्षण मुद्रेचें । पिशाचवत् ॥

आणि

योगभ्रष्ट प्राणी । जन्मोजन्मीचा ॥

असे अंबाजीचें वर्णन केलें आहे. समर्थांना पहातां च अंबाजीनें त्यांच्या चरणीं लोटांगण घातलें. त्याच्या आईनें याला समंधाची बाधा झाली आहे, स्वामींनीं कांहीं उपायाची योजना करावी, असें समर्थांना विनवितां च,

स्वामी बोलती हांसूनी । हा पुत्र नाहीं असोनी।
योगभ्रष्ट प्राणी । जन्मोजन्मीचा ॥
हा तुझे नाहीं कामाचा । उपयोगी पडेल आमुच्या ।
लाभ घेईं भिक्षेचा । अखंडित ॥

समर्थ अंबाजी सेवेसाठीं मागतात, आणि त्याप्रमाणें तो द्यावा, असें बाईनें आपल्या भावास सांगितलें. भावाला हि हें पटलें. पुढें समर्थांना मंगलस्नान घालून त्यांची पूजा करण्यांत आली, आणि बाईनें

आपुले हातीं मुलाशीं । अर्पण केलें ॥

आणि हात जोडून समर्थांना विनंति केली,

मजसहित सांभाळिलीं । पाहिजेत मुलें ॥

आणि नंतर तिघांना हि बरोबर घेऊन समर्थ पुढें रवाना झाले.

उद्धवसुत मात्र ही हकिकत शहापुराजवळील सिरापुराची म्हणून देतात, आणि कथेंत अंबाजीच्या मामाचा उल्लेख हि करीत नाहींत, तर सिरापुराचे भगवद्भक्त कुळकर्णी हे अंबाजीचे वडील असें सांगून म्हणतात :

तंव दैवगती करोनि जाण । भ्रंश जाला अंबाजीलागून ।
वेडा पिसा न होय लग्न । तेणें दुःखी माता पिता ॥
तो पुत्र मातापित्यांनीं आणिला । समर्थांचे पायावरी घातला ।
म्हणती हा अर्पण तुम्हासी केला । स्वामिराया समर्था ॥

ही हकिकत सिरापुरची † असो, नाहीं तर कोल्हापुरची असो, अंबाजीला एकव्या आईनें आपल्या भावाच्या संमतीनें, वा उद्धवसुत म्हणतात त्या प्रमाणें आईवडिलांनीं अंबाजीला समर्थांच्या चरणांवर घातलें असो, आपल्याला इतकें च पहावयाचें कीं, ही च श्रीसमर्थकल्याणांची पहिली भेट आणि तेव्हांपासून आजन्म कल्याण श्रीसमर्थांच्या सेवेंत रुजु झाले.

## ( २ ) थोडी पूर्वीची हकिकत

कृष्णाजीपंत कुळकर्णी म्हणून भोगूरचे पटवारी होते. त्यांचें लग्न झालें होतें. त्यांना एक मुलगा हि झाला होता. या पुत्रलाभानें पत्नीच्या ऋणांतून मुक्त झाल्याचें त्यांना समाधान वाटलें, § आणि संसारांतून निवृत्त व्हावयाचे हेतूनें उत्तर दक्षिण मानस यात्रा करावी म्हणून तीर्थयात्रेस निघाले. उत्तरेकडील यात्रा करून दक्षिणेकडे येतांना एके दिवशीं कृष्णाजीपंतांचा मुक्काम कोल्हापुरला श्री जगदंबेच्या देवळांत असतांना रोजगाराच्या निमित्तानें कोल्हापुरला आलेले पारगांवचे बरवाजीपंत कुळकर्णी दर्शनार्थ देवळांत गेले, तों कोणा सत्पुरुषाचें भजन चालू होतें. तुम्ही कोण म्हणून यांनीं चौकशी केली, तों आपण तीर्थवासी असल्याचें त्यांनीं सांगितलें. तुम्ही कृष्णाजीपंत कुळकर्णी असें यांनीं म्हणतां च त्यांनीं हि यांचें नांव सांगितलें. उभयतांची जुनी ओळख निघालेली पाहून दोघांना हि आनंद झाला. बरवाजीपंतांनीं कृष्णाजीपंतांना आपल्या च घरीं मुक्कामास आणिलें. बरवाजीपंतांना एक उपवर बहीण होती. पहांटे उठून भजन करावयाचा कृष्णाजीपंतांचा नित्यक्रम होता. दुसऱ्या दिवशीं पहांटे उठण्यापूर्वी कृष्णाजीपंतांना दृष्टांत झाला कीं, त्यांनीं बरवाजीपंतांच्या बहीणीशीं विवाह करावा. संसारांतून निवृत्त झालेल्या कृष्णाजीपंतांना पुन्हां संसारांत पडण्याचें संकट कसें टाळावें असा पेच पडला होता, तो त्यांना पुन्हा रात्रीं दृष्टांत झाला कीं, त्यांनीं हा विवाह न केल्यास, या मुलीसाठीं त्यांना पुन्हां जन्म घ्यावा लागेल. दुसऱ्या दिवशीं पहांटे उठून नित्याप्रमाणें तुळशीवृंदावनाच्या ओट्यावर कृष्णाजीपंत भजन करीत बसले होते, तों बरवाजीपंत हि उठून त्यांचेकडे आले. आपली बहीण कृष्णाजीपंतास देण्याविषयीं त्यांना हि दृष्टांत झाला होता. परस्परांनीं आपआपले दृष्टांत परस्परांना सांगितले. कृष्णाजीपंतांनीं विवाहास मान्यता दिली, पण संसाराची जबाबदारी घेण्याचें नाकारलें. बरवाजीपंतांनीं ती जबाबदारी आपल्याकडे घेतली. पुढें बरवाजीपंतांच्या बहीणीशीं कृष्णाजीपंतांचा विवाह थाटामाटानें होऊन बरवाजीपंतांच्या बहीणीचें नांव रखमाबाई असें ठेवण्यांत आलें.

---

† पहा पृष्ठांक १५४-५० § दासविश्रामधामकार म्हणतात कीं, पत्नीच्या निधनानंतर वैतागून ते काशीयात्रेस गेले

या रखमाबाई धार्मिक वृत्तीच्या होत्या. पुत्रासाठीं त्यांनीं अंबेला नवस करून पुत्र मागितला तो असा —

**विजयवंत शहाणा पूर्ण पुरुषार्थी । उभयकुळतारकु गुरुभक्त सुकृती ॥**

अंबेच्या नवसामुळें झालेला पुत्र म्हणून आपल्या पहिल्या मुलाचें नांव त्यांनीं अंबाजी किंवा अंबादास असें ठेविलें. दुसरा मुलगा दत्ताला नवस केल्यावर झाल्यामुळें त्याचें नांव दत्तात्रय असें ठेवण्यांत आलें. या दोन भावांना एक बहीण हि झाली होती.

दृष्टांताप्रमाणें लग्न केलं, तीन मुलें हि झालीं, तेव्हां पुन्हां कृष्णाजीपंतांना उपरति प्राप्त होऊन त्यांनीं संन्यास घेतला, आणि ते काशीयात्रेस निघून गेले, व त्यांच्या पत्नी रखमाबाई, अंबाजी व दत्तात्रय या आपल्या दोन मुलांसह, कोल्हापुरास आपल्या भावाच्या घरीं रहावयास गेल्या. तेव्हांपासून श्री समर्थांची भेट होईपर्यंत तिघे हि तेथें च रहात होतीं.

बरवाजीपंतांच्या बहिणीशीं लग्न केल्यानंतर कृष्णाजीपंत भोगूर किंवा बामुळगांव या आपल्या गांवीं परत गेले होते, कां कोल्हापुरला च रहात होते, समजत नाहीं. त्यामुळें अंबाजींचें – म्हणजे आपल्या कल्याणांचें – जन्मस्थळ हि नक्की ठरवितां येत नाहीं. भोगूर, बामुळगांव, किंवा कोल्हापुर या तीन स्थळांपैकीं कोणतें तरी एक कल्याणांची जन्मभूमी होय. पृष्ठांक ५० वरील " रामनामकथा " या पहिल्या ओवीप्रकरणांत कल्याणांनीं आपल्या जन्मभूमीचा उल्लेख केला आहे असें वाटतें. हें जर बरोबर असेल तर गंगातीरीं म्हणजे गोदावरीच्या कांठीं बामुळगांवीं किंवा भोगूर येथे कल्याणांचा जन्म झाला असें ठरेल.

या च ग्रंथांत पृष्ठांक १५१ वर दिलेल्या श्री कल्याणचरित्रांत चरित्रकार सांगतात कीं, अंबाजी आणि दत्तात्रय हे जुन्नर प्रांतीं होते, तेथून आपल्या मातुःश्रीसह ते दोघे चाफळला आले, समर्थांना पाहून अंबाजीला अति संतोष झाला, आणि आपल्याला अनुग्रह करण्याविषयीं त्यानें समर्थांना विनंति केली, वगैरे.

कल्याणांचें जन्मस्थळ जसें अनिश्चित, तसा त्यांचा जन्मशक हि अनिश्चित. कल्याणांना श्रीसमर्थांचें प्रथम दर्शन होऊन त्यांनीं समर्थांचा अनुग्रह घेतला तो शक १५६७ सालीं असें आपण मानीत आहोंत. कल्याणांच्या अनुग्रहाचा काळ शक १५६६ पूर्वी संभवत च नाहीं. यावेळीं म्हणजे कल्याणांना समर्थांचें प्रथम दर्शन होऊन समर्थांचा अनुग्रह झाला त्या वेळीं कल्याणांचें वय " दहा " वर्षांचें होतें, असें हनुमंतस्वामी आपल्या बखरींत सांगतात, तर

**वय अंबाजीचें । होतें द्वादश वर्षांचें ।**

असें आत्मारामबोवा आपल्या रामदासचरित्रांत सांगतात. कल्याणांची पुण्यतिथी शक १६३६ अधिक आषाढ शु. १३. यावेळीं त्यांचें वय ९६ वर्षांचें होतें, असें रा. रघुनाथ भास्कर गोडबोले यांचा " भरतखंडाचा अर्वाचीन कोश " सांगतो. शक १६३० ते १७००* या दरम्यानच्या काळांत होऊन गेलेले उद्धवसुत आपल्या रामदासचरित्रांत कल्याणांविषयीं लिहितात—

असो अंबाजीपंत व्यापारी । त्यांचियें परमार्थाची थोरी ।
सेवेसी सादर सर्वापरी । विद्यावंत आगळा ॥
अक्षर चांगलें सुंदर । बुद्धिप्रकाश धारणा थोर ।
परम चतुर गुणगंभीर । सर्वांमाजीं श्रेष्ठ पैं ॥
जयाचें कथा कीर्तन । आवडे समर्थांलागून ।
पाठसिद्धी तया प्रसन्न । बोले बोल बृहस्पती ॥
गुणी गायक प्रेमकळा । अध्यात्मविद्येचा जिव्हाळा ।
जैसा करतळींचा आवळा । ज्ञानकळा आगळी ॥

दहा बारा वर्षांच्या बालकाचें हें कर्तृत्व वाटत नाहीं. श्री समर्थांच्या उदाहरणावरून हें हि कदाचित मानतां येईल. पण " व्यापारी " या उल्लेखावरून अंबाजींचें वय त्यावेळीं १०।१२ वर्षांचें नसून २६-२७ वर्षांचें असलें पाहिजे असें मानण्याकडे मनाचा कल होतो. आणि म्हणून आम्ही कल्याणाचा जन्मशक १५४० धरून चालणार आहोंत.

## ( ३ ) झाडाच्या फांदीची गोष्ट

अंबाजी, दत्तात्रय व त्यांच्या मातुश्री रखमाबाई व इतर शिष्यमंडळी यांना बरोबर घेऊन समर्थ कोल्हापुराहून निघाले ते संचार करीत करीत शिरगांवीं आले. तेथें दत्तात्रय व रखमाबाई यांना ठेवून अंबाजी वगैरेंसह समर्थ पुढें निघाले. वाटेत रामनवमीचा उत्सव करावा असें वाटून त्यासाठी मसूर गांवाची योजना केली. उत्सवाच्या वेळीं निशाणाच्या काठ्यांना मार्गांत आंब्याच्या झाडाची अडचण होऊं लागली, म्हणून ती फांदी तोडणें आवश्यक झालें. विजापुरचा हुकुम आणल्या शिवाय तेथील यवन अधिकारी फांदी तोडूं देईना. समर्थांनी वायुगतीने विजापुरास जाऊन बादशहाकडून परवानगी घेतली आणि जसे गेले तसे परत येऊन त्यांनी ती परवानगी मसूरच्या ठाणेदारास दिली व फांदी तोडण्याची आज्ञा समर्थांनी कल्याणांना केली. खालीं मोठी विहीर आहे, फांदी जपून तोडावी, असा इषारा आका व वेणाबाईंनीं कल्याणांना दिला; बरें म्हणून कुऱ्हाड घेऊन कल्याण झाडावर

* हें केवळ अनुमान आहे.

चढले, तों ' पुढें बसून मागें तोडावी ' अशी समर्थांची आज्ञा झाली. त्याप्रमाणें अंबाजीनें फांदी तोडली, पण तो विहीरींत पडला. घटका झाली, दोन घटका झाल्या; पण कोणी कांहीं बोलेना. तेव्हां आकाबाईनीं समर्थांस विनंति केली कीं, अंबाजीस बाहेर काढून त्याच्या दहनादि संस्काराची व्यवस्था व्हावयास पाहिजे. तर समर्थ विचारतात, म्हणजे, अंबाजी मेला कीं काय ? चार घटका होत आल्या, इतका काळ तो विहिरींत कसा वांचेल असें आक्कांनीं म्हणतां च समर्थ हांसून विहिरीपाशीं आले आणि विहिरीच्या कांठावर हात टेकून त्यांनीं अंबाजी म्हणून हांक मारतां च अंबाजीनें पाण्यांतून ओ दिली. ती ऐकून ' तूं कल्याणरूप आहेस कां ' असें समर्थांनीं विचारलें, तेव्हां ' आपले कृपेकरून कल्याणरूप आहे ' असें आंतून च अंबाजीनें सांगितलें. समर्थांनीं अंबाजीस बाहेर ये म्हणतां च बाहेर येऊन साष्टांग नमस्कार घालून तो समर्थांपुढें उभा राहिला. तेव्हां समर्थांनीं त्याचें " कल्याण " हें नांव ठेवून साखर वाटली.

बखरीमध्यें अशी ही साधी गोष्ट आहे; पण तीन ग्रंथांतून ही गोष्ट तीन प्रकारांनीं दिली आहे. शिवाय दासविश्रामधामकारांनीं तर कल्याण झाडाच्या पाल्यांत पडले असें म्हटलें आहे.

आत्मारामबुवा ही गोष्ट शहापुरच्या वेशीजवळची म्हणून सांगतात. मसूरचा श्रीरामउत्सवांतील छबिना शहापुरच्या मारुतीला नेतांना

शहापुरच्या वेशींत । छबीना आला मिरवत ।
विशाळ वृक्ष तेथ । एक होता ॥
त्या वृक्षाखालीं । विहीर होती बहु खोली ।
फांदी आडवी आली । तया वृक्षाची ॥

मध्यें च हें विघ्न उद्भवलें, तेव्हां बखरींत म्हटल्याप्रमाणें समर्थांनीं विजापुरची परवानगी आणली, आणि आतां फांदी तोडा असें गांवकऱ्यांना सांगितलें, तर

ते म्हणती तुम्ही आपुले । तोडा अथवा ठेवा ॥

कोणी हि पुढें येण्यास धजेना, तेव्हां समर्थांनीं अंबाजीस आज्ञा केली. अंबाजी कुऱ्हाड घेऊन झाडावर चढला, आणि फांदीवर बसून

आज्ञा पुसे स्वामीसी । कैसें तोडूं फांदीसी ।
स्वामी म्हणती शेंड्यासी । बैसोनी बुडखा तोडी ॥

अंबाजीच्या जीवाचें बरें वाईट होणार अशी लोकांना धास्ती वाटूं लागून ते फांदीकडे नुसते टकमक पहात राहिले,

तों फांदी कडाडिली । कडकडोनी विहीरींत पडली ।
फांदी बरोबर च गेली । उडी अंबाजीची ॥

याप्रमाणें फांदीसहीत अंबाजी विहीरींत बुडाला, आणि इकडे

पुढें छबिना चालविला । सावकाश ॥

छबिना परतून आला, नित्यनेम झाले, वैश्वदेव आटोपले, ब्राह्मणपंक्ति बसल्या, पण कोणी कांहीं बोलेना. शेवटी आकांनीं विनंति केली आणि समर्थ विहिरीपाशीं आले, आणि

येऊनि विहीरीचे कांठासी । हांक मारिली अंबाजीसी ।
जी जी म्हणोनि स्वामींसी । बोलता जाला ॥
स्वामी पुसती वर्तमान । अंबाजी सांगे आहे कल्याण ।
जय जय रघुवीर म्हणोन । उदकावर आला ॥
स्वामींनीं बाहेर बोलाविलें । हातीं कुऱ्हाड वर आले ।
स्वामींचे चरण वंदिले । अंबाजीनें ॥
स्वामी पुसती तयासी । सांगिजे देखिले सुखासी ।
अंबाजी म्हणजे पायांसी । माहीत सर्व ॥
इतुकें वचन ऐकिलें । कल्याण नांव ठेविलें ।
शर्करा वाटून केले । आनंदभरित सर्वांसी ॥

हीच गोष्ट उद्धवसुत थोडी वेगळ्या तऱ्हेने सांगतात. शिष्यांसमवेत शहापुराहून निघालेले समर्थ जवळच्या च पर्वतावर जाऊन राहिले. कांहीं शिष्य भिक्षेस गेले, कांहीं श्री समर्थांजवळ सेवेसाठीं राहिले. त्यांनीं समर्थांच्या स्नानसंध्येसाठीं एका आंब्याच्या झाडाखालीं जागा साफ करून समर्थांना स्नानाची विनंति केली.

तंव रामदास म्हणती । हे डहाळी गेली विहीरींवरुती ।
आंत अवघीं पानें पडतीं । तेणें पाणी नासतसे ॥

आणि ही फांदी तोडल्यावर च आम्ही स्नान करूं असे म्हणून समर्थ तेथें च आसन घालून बसले. ती फांदी तोडणें महा कर्म कठीण होतें आणि त्यामुळें 'सर्व उगेचि राहिले'. भिक्षेला गेलेले शिष्य भिक्षा घेऊन परत आले, आणि स्वामींना नमस्कार करून उभे राहिले. स्नानाला उशीर होत आहे अशी अंबाजीनें समर्थांना भीत भीत विनंति केली.

मग सद्गुरुनाथ म्हणे । हे फांदी तोडून टाकणें ।
अंबाजी म्हणे स्नान करणें । फांदी मी तोडितों जी ॥

समर्थांना अशी विनंति करून कुऱ्हाड आणण्यासाठीं अंबाजी गांवांत गेले, आणि इकडे समर्थ स्नान उरकून नेमके त्या च फांदीखालीं येऊन बसले. गांवांतून कुऱ्हाड घेऊन अंबाजी लगबगीनें परत आले, आणि दोर बांधून झाडावर चढून

म्हणे स्वामी कैसी तोडावी । पडेल आपणावरी आघवी ।
समर्थ म्हणती कुशळता व्हावी । येथें आतां तुमची ॥

मग बुडयाकडे करोनिया तोंड । तोडितां जाला फांदी अखंड ।
अंतरीं चिंता वितंड । स्वामीवरी न पडावी ॥

अंबाजीनें फांदी तोडली, ती समर्थांवर पडली नाहीं, बाजूस पडली, पण अंबाजी मात्र विहीरींत पडला. समर्थांनीं मात्र तिकडे लक्ष च दिलें नाहीं. जणूं काय, कांहीं झालें च नाहीं. सगळयांच्या स्नानसंध्या झाल्या, समर्थांची पूजा झाली, आणि सर्वांच्या पंक्ति मांडल्या. एवढ्यांत शिवाजी राजे येऊन दाखल झाले. पण आकांना राहवेना, अंबाजी विहीरींत पडल्याचें त्यांनीं समर्थांना स्मरण करून दिलें, तेव्हां तो येईल,

त्याचें दुःख तुम्हा काय । तुम्ही आपुली धरा सोय ।
त्याचा आपुला संबंध पाहे । कांहीं च नसे कवणासी ॥

असें समर्थांनीं सांगितलें. सर्वांचीं जेवणें झालीं. पडलेली फांदी पाहून राजांनीं चौकशी केली आणि सर्व हकिकत जाणून घेतल्यानंतर, समर्थांनीं कांहीं तरी कौतुक आरंभिलें आहे, स्वस्थ राहून पहा, असें सर्वांना सांगून राजे निघून गेले. अंबाजी विहीरींत पडल्याची हांकाहांक सगळया गांवांत झाली. हा असा कसला मोठेपणा, ब्राह्मण विहीरींत बुडविला, आपण जेऊन घेतले, मोठे निर्दय दिसतात, वगैरे टीका हि झाली. पण हें सारें जणूं कांहीं समर्थांच्या गांवीं च नव्हतें. ते आपले शांतपणानें सर्व शिष्यांसमवेत अरण्यांत निघून गेले. इकडे लोकांनीं विहीरींत बुड्या मारून पाहिल्या, पण अंबाजीचा पत्ता लागेना, कीं, त्याचा देह फुगून वर हि येईना. असे सहा दिवस गेले, सातवे दिवशीं समर्थ परत येऊन त्या च स्थळीं आसन घालून बसले. शिष्य भिक्षेला गेले. भोजनासाठीं गांवांतील ब्राह्मण सांगितले. स्वयंपाक झाला. स्नानसंध्या होऊन ब्राह्मणांच्या पूजा झाल्या, वाढणें चालीं लागलीं, इतक्यांत शिवाजी राजे हि आले. त्यांना हि भोजनास बसण्याची आज्ञा करून

समर्थ विहीरी जवळी आले । अंबाजी म्हणूनी बोलिले ।
आंतोन जाब देत तये वेळे । अंबाजी गोसावी ॥
स्वामी म्हणती रे कैसें । तुजलागी कल्याण असे ।
येरु म्हणे कृपासौरसें । सद्गुरुस्वामींचिया ॥
तो तत्काळ चि बाहेरी आला । साष्टांग नमस्कार घातला ।
सकळांस आनंद जाला । तो न माय ब्रह्मांडीं ॥
म्हणती केवढें नवल । हा कैसा वांचला असेल ।
सहा दिवस जाले पाणी खोल । अपार विहीरीचें ॥
न कळे समर्थांची करणी । तया ब्रह्मादिकांलागूनी ।
धन्य धन्य महिमा जनीं । या रामदासांचा ॥
सर्व ब्राह्मण संतोषले । मग भोजनासी बैसले ।
दक्षिणा विडे दिधले । सर्वत्रांसी कल्याणें ॥
तैंपासून कल्याण । नाम बाहती सकळ जन ।
हें सद्गुरुचें महिमान । अघटित असें कळेना ॥

कल्याण पाल्यांत पडल्याचें दासविश्रामधामकार सांगतात. याचा नुसता उल्लेख वर आपण केला च आहे. आत्माराम महाराज ती गोष्ट अशी देतातः

श्रीराम नौमी उछाह संभ्रम । मसुरीं कराया जंव नेमिला नेम ।
हुकुम पाच्छाई तोडोनि द्रुम । मार्ग करावा रथ चाले ॥ २९-८०
निबिड बहु वर सरळ झाड । न चढवे सर्व हि तुचलितां तोंड ।
पाहतां स्वामींनीं अंबाजीकडे । नमोनि आरुढला वृक्षावरी ॥ ८१
फांटा बैसलासे फांद्यावर । बुडखीं बैसलों तोडितो अग्र ।
भाऊनि बुडातें छेदितां सत्वर । खचोनि पालेंत पडियला ॥ ८२
रुतले अंगांगीं कांटे धसकट । तरि विरक्तु न मानी कष्ट ।
करुणा समर्था येऊनि उत्कट । सर्वांग स्वहस्तें कुरवाळिलें ॥ ८३
थापटोनि पाठी वदले शाभास । सकळ समुदाया वाटला हरुष ।
सत्य चि कथन हें जालें ऐसें । घडलें गुरुदास्य ससांग ॥ ८४

पण कल्याण नांव पडलें त्यावेळेची कथा ही नव्हे. आत्माराममहाराजांच्या काळीं अंबाजीला कल्याण हें नांव मिळाल्याविषयींच्या चार तरी कथा प्रचलित होत्या.

( १ )

चांफळीं रथाचें आडतां काम । पडिला खचोनि तोडितां द्रुम ।
गुरुकृपे पावला कल्याण नाम । म्हणोनि वर्णिती कवीजन ॥ ८५

( २ )

झाड चि न होतें तोडावें काये । वनतरु जाळी तोडिली निर्भयें ।
देखोनि सद्दढता सद्गुरुरायें । कल्याण हो तुज म्हणतिलें ॥ ८६

( ३ )

येकदां गुरुसंज्ञे कृष्णातटाकीं । वृक्ष छेदोन पडला उदकीं ।
काढोनि समर्थें हस्त मस्तकीं । ठेऊनि कृतकृत्य हो वदले ॥ ९०

( ४ )

कोणी सांगती येकदां रानीं । विहीरींत बुडाला वृक्ष तोडोनि ।
बाहोनि करुणेनें श्री मोक्षपाणीं । कल्याण नाम ठेविलें ॥ ९१

आपल्या काळीं प्रचलित असलेल्या या चार कथा सांगून त्या सत्य नव्हेत हें सांगण्यासाठीं आत्माराम महाराज बजावतात :

ऐसें नव्हे पां जालें कथन ।

आणि हकिकत सांगतात, ती अशी. एकदां शिष्यासमवेत असतांना विहीरीजवळ झाडाखालीं आसन घालून श्री समर्थ जप करीत बसले होते. पिंपळाचें झाड होतें तें. वाऱ्याच्या झंझाटानें पानें गळून विहीरींत पडत आणि पाणी घाण होई. पण समर्थांना तें स्थळ आवडलें होतें. कांहीं दिवस तेथें मुक्काम करण्याचा त्यांनीं विचार केला. तेव्हां विहीरीवरील ती फांदी तोडून टाकण्याचें कल्याणांनीं ठरविलें. पदका प्रमाणें कुऱ्हाड गळ्यांत दोरीनें बांधून कल्याण झाडावर बुंधाकडून चढूं लागले, पण तें जुळेना. तेव्हां विहीरीवरील फांदीला अग्राकडून धरून कल्याण लोंबकळूं लागले. कुऱ्हाड उचलून घाव घालावा, तर फांदी तुटून विहीरींत पडणार.

तंव हळु च बोलिले कैवल्यदानी । उदक नासाड होईल ॥

श्री समर्थांचें हें म्हणणें ऐकून फांदीसहित कल्याणांनीं असें उड्डाण घेतलें कीं,

वालखिल्यडहाळी पदीं खगनाथ । धरोन जैसा उडाला ॥

किंवा

अर्जुनाकडे पावतां शक्ति । झेलोनि नेली जैसी मारुतीं ।

याप्रमाणें उड्डाण घेऊन कल्याण विहीरीच्या कांठावर येतां च श्री समर्थ

विजयवंत हो म्हणतिले ॥ ९८

आणि आत्माराम महाराज सांगतात कीं, अंबाजीचें कल्याण हें नांव पडले त्याची कथा ही अशी आहे

कल्याण दाता नामाभिधान । कल्याण पडिलें केलें कथन ।
सुजाणता तो स्थिति संपन्न । राहिला आदरें गुरुशुश्रुषीं ॥ ९९

या साऱ्या गोष्टीचा निष्कर्ष एक च, समर्थांच्या आज्ञेवरून किंवा समर्थांच्या सुखसोयीसाठीं, झाडाची फांदी तोडण्याचें दुर्घट काम कल्याणांनीं आपला जीव धोक्यांत घालून केलें आणि समर्थांनी त्यांना सुखरूपपणें निभावून नेलें. मग कल्याण पाल्यांत किंवा पाण्यांत पडले असोत नसोत, ही गोष्ट मसूरची असो, शहापुरची असो, चांफळची असो, वा एकाद्या अरण्यांतील असो.

या प्रसंगीं आम्हांला मोरोपंतांच्या त्या आर्येचें स्मरण होतें.

निज वचनें वटशाखा तोडुनि जो शिष्य पावला पतन ।
तो कल्याण चि केला जीवनदानें करूनिया जतन ॥

समर्थप्रतापकार सांगतात—

समर्थ आज्ञे विलंब न केलें । कल्याण नामें देहसंकल्प घातले ।
वृक्षपातें कल्याण नाम पावले । श्रीगुरुदास्यीं वचनार्थें ॥

या सर्व गोष्टींचा संकलित विचार केला म्हणजे आम्हांला आत्मारामहाराजांची कथा मान्य करावीशी वाटते.

आणखी एका गोष्टीचा उल्लेख करणें योग्य होईल. श्रीसमर्थांवरील आपल्या आरतीचा शेवट कल्याणांनीं असा केला आहे.

पतीत प्राणी पदालागुनी कल्याण जाले ॥

" स्वामी माझा योगीराजा " या श्रीसमर्थांवरील आपल्या पदांत कल्याण पुन्हां तें च सांगतात.

जड मूढ प्राणी चरणस्पर्शें कल्याण जाले ।

या दोन्हीं चरणांचे उघड अर्थ स्पष्ट आहेत. शिवाय, श्रीसमर्थचरणांचा आश्रय केल्यामुळें आपल्याला " कल्याण " हें नामाभिधान मिळालें असें, या दोन्हीं ठिकाणीं हि, कल्याण सुचवीत आहेत, असें आमच्या मनांत येतें.

## ( ४ ) लेखक कल्याण

कल्याण ओळखले जातात ते च मुळीं त्यांच्या एकनिष्ठ गुरुसेवेबद्दल आणि श्रीसमर्थांचे लेखक म्हणून. श्रीसमर्थांच्या सहवासांत कांहीं काळ घालविलेले श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर आपल्या ' समर्थप्रताप ' ग्रंथांत

कल्याण नामा ग्रंथ विस्तारी । उत्कट कीर्ति विश्वामीतरीं ।

असा कल्याणांचा उल्लेख करितात. प्रत्यक्ष श्रीसमर्थांचे शिष्य आणि कल्याणांचे गुरुबंधु अनंत कवि या बाबतींत

स्वामींचा कवितासमुद्र अवघा कल्याण लिहीतसे ।

अशी साक्ष देतात. पण अशा इतरांच्या साक्षी आपल्याला हव्या च कशाला ? खुद्द कल्याणांनीं श्रीदासबोधावरील आपल्या आरतींत स्वतःचा उल्लेख ' लेखक ' म्हणून केला आहे.

कल्याण लेखकाचे भाव गर्भ हृदईं ॥

श्रीसमर्थ आणि कल्याण यांच्या प्रथम भेटींत च आपल्या नमुनेदार वागणुकीनें कल्याणांनीं श्रीसमर्थांचें चित्त आपल्याकडे वेधून घेतल्यानंतर समर्थांनी त्यांच्या-जवळ केलेल्या चौकशींत त्यांचें अक्षर हि सुंदर आणि स्मरणशक्ति हि तीव्र असल्याचें पाहून च समर्थांनीं बरवाजीपंतांजवळ गुरुदक्षिणा म्हणून कल्याणांची मागणी केल्याचें आपण पाहिलें च आहे.

कल्याण समर्थांबरोबर नेहेमीं असत, आणि समर्थांच्या मुखांतून निघणारीं वचनें तत्परतेनें लिहून घेत. लेखनाचें साहित्य बरोबर च असे.

जो लेखणीसहित कागद दौती वाहे ।

असें श्रीसमर्थांचें वर्णन रघुनाथपंडितांनी केलें आहे च.

ऐसें जें जें स्वामी बोलती । तें तें लिही सीघ्रगती ।<br>
गद्य पद्य श्लोक सवाया रीतीं । ग्रंथाचिया वेदोक्त ॥

स्वामीमुखींचें निघतां वचन । मागें लिहीत चाले आपण ।<br>
ऐसें दोघांचें स्वामीसेवकपण । न कळे जाण कवणासी ॥

समर्थें बोलावें येणें लिहावें । पुनरपि नलगे पुसावें ।<br>
ऐसें गुरुकृपेचें लाघव । बोलतां चि नये ॥

कल्याणांच्या लेखनाचे दोन प्रकार संभवतात. एक

समर्थें बोलावें येणें लिहावें ।,

आणि दुसरा, समर्थांनीं उतरलेल्या कागदचिटोऱ्यांवरून नकला करणें. हे दोन्ही प्रकार हि झालेले आहेत. शिवतरच्या घळींत लेखनक्रिया सुरु होण्यापूर्वी शिरगांव आणि चाफळ येथें श्रीसमर्थांच्या कवितेच्या आणि ग्रंथांच्या नकला करण्याचें कल्याणांचें काम अखंड चालू असे. कल्याणांच्या हवाली समर्थांनीं आपल्या कवनाचे कागद पुर्जे करून त्यांच्या नकला करून आणण्याविषयीं कल्याणांना सांगितल्याचे किती तरी उल्लेख श्रीसमर्थचरित्रांतून आढळतात, कल्याणांच्या गोष्टींत पृष्ठांक २१० वर असा एक उल्लेख आलेला वाचकांच्या लक्षांत असेल च.

जंव पातले सज्जनगडीं समर्थ । बोलिले सत्शिष्य कल्याणाते ।
मेळऊनि सर्व हि अभंगातें । येकान्वयीं निवडी पां ॥

पण म्हणून कांहीं समर्थांची सगळी च कविता कल्याणांनीं उतरली होती किंवा समर्थांची सगळी च कविता कल्याणांना माहीत असली पाहिजे असें होत नाहीं. कल्याण समर्थांबरोबर सारा वेळ असत, त्यांच्याबरोबर त्यांच्या संचारांत हि असत, पण सारा वेळ म्हणजे कांहीं चोवीस तास नव्हत. उद्धवसुत म्हणतात च :

लिहिणार जो कां कल्याण । तयासही न कळे जाण ।
तो समागमें राहे तें चि (घेई) लेहून । वरकड तो काय जाणे ॥

परी रामदासाचिया बोलण्या । न करवे शेषासी गणना ।
किति कवित्व केलें कळेना । कवणासही सर्वथा ॥

समर्थांनीं कल्याणांना "कित्ता" घालून दिला होता. त्या कित्त्याविषयीं हनुमंतस्वामी बखरींत हकिकत सांगतात ती अशी :

"कोणे एके दिवशीं समर्थांची स्वारी रामघळींत असतां कल्याणास कांहीं ग्रंथ लिहिण्यास सांगितला, त्यावरून कल्याणानें ग्रंथ लिहून पुस्तक स्वामीपुढें ठेविलें. तें पुस्तक स्वामींनीं पाहून कल्याणास सांगितलें कीं, तुझें अक्षर चांगलें नाहीं, तर अक्षर चांगले कर. असें म्हणतां च, महाराज, कित्ता दिला असतां मी अक्षर चांगलें करीन, असें म्हणतां च **स्वामींनीं झोळींत** हात घालून कित्ता काढून दिला. त्यावरून कल्याणानें कांहीं दिवसांनीं चांगलें अक्षर करून दाखविलें. नंतर स्वामींनीं त्याजकडून दासबोध ग्रंथ लिहविला. त्या कित्त्यांत सोन्याच्या शाईचीं अक्षरें असून बालबोध लिपि आहे व ती देववाणी असून तिचा अर्थ स्वामी व कल्याण या दोघांस ठाऊक होता." तो कित्ता अद्यापि डोमगांवचे मठांत आहे.

या प्रमाणें हकिकत सांगून संशोधन खंडांत (प्रथम खंड – पृष्ठांक ९८, ९९) त्या कित्त्याविषयीं ती. शंकर श्रीकृष्ण देव लिहितात :

" कित्ता म्हटला म्हणजे आपली जी समजूत होते तसा हा कित्ता नाहीं. हा कित्ता म्हणजे पोथीचें एक पान आहे. तो श्रीसमर्थांनीं घालून दिलेला आहे, असें मला वाटत नाहीं. हनुमंत स्वामी हि तसें स्पष्ट म्हणत नाहींत. ' स्वामींनीं झोळींत हात घालून कित्ता काढून दिला, ' असें च ते सांगतात. कित्ता पाहून माझी समजूत अशी होते कीं, श्री समर्थांच्या जवळ आयतें हें पोथीचें एक पान होतें, त्या पानावरील अक्षर त्यांना सुंदर वाटलें व तें च कित्ता म्हणून त्यांनीं कल्याणांच्या पुढें ठेविलें. त्या पानाची लांबी बरोबर दहा इंच आहे व रुंदी साडेतीन इंच आहे. पान पाठपोट लिहिलेलें आहे. दोन्हीं बाजूस आठ आठ ओळी आहेत. पानाच्या वर आणि खालीं चार चार पट्टे आहेत व डाव्या उजव्या बाजूस तीन तीन पट्टे आहेत. पांढरा, तांबडा, पिवळा आणि हिरवा असे चार पट्टे वर, तर हिरवा, पिवळा, तांबडा आणि पांढरा असे चार पट्टे खालच्या बाजूस आहेत. डाव्या बाजूला तांबडा, पिवळा, हिरवा आणि उजव्या बाजूला हिरवा, पिवळा तांबडा असे पट्टे आहेत. पानाची मधली सबंध जागा तांबडी आहे. रेघा मात्र काळसर आहेत व त्यांच्या वर खालीं पांढुरक्या तांबूस पट्या आहेत. दोन रेघांमध्यें ओळी आहेत त्या, हनुमंत स्वामी म्हणतात त्याप्रमाणें, सोनेरी शाईच्या आहेत. दुर्दैवानें उजव्या बाजूचा थोडा भाग फाटलेला आहे. तो मी आज अठ्ठावीस वर्षें फाटलेला च पहात आहे. एका बाजूला खालच्या बाजूस तांबड्या पट्ट्यावर ' रामश रा ' अशीं अक्षरें काळ्या शाईनें लिहिलेलीं आहेत. तीं केव्हांपासूनचीं आहेत कोण जाणे. " या कित्त्याच्या दोन्हीं बाजूंचें चित्र संशोधन-खंडांत दिलें आहे.

समर्थांनीं कल्याणांना कित्ता घालून दिला, तर एकदां समर्थांकडे आलेल्या अनेक मुलांना कल्याणांनीं कित्ते घालून दिले. आपल्याकडे आलेल्या या मुलांना काय पाहिजे तें मागा असें समर्थांनीं सांगितलें. तों तीं मुलें भांबावून च गेलीं. काय मागावें तें त्यांना समजेना, आणि कोणी सांगितलें तरी उमजेना. त्यांनीं मागितले कित्ते, आणि समर्थांनीं कल्याणांना ते द्यावयास सांगितलें. कल्याणांचें अक्षर होतें च तसें सुंदर.

बाळवृंद कित्ता इच्छितां सुंदर । कल्याणबावाचीं सरस अक्षरें ।
जाणोनि आज्ञा करितां गुरुवरें । कित्ते लिहोन दिधले ॥

लेखनक्रिया हा समर्थसंप्रदायाचा एक विशेष होय. त्या बाबतींत कल्याणांची परंपरा विशेष प्रसिद्ध आहे. " श्रीमत् ग्रंथराजाच्या जुन्या अकरा प्रती " या आपल्या ऐतिहासिक टिपणांत ती. शंकर श्रीकृष्ण देव म्हणतातः " कल्याण महाराजांच्या परंपरेंतील जेवढ्या प्रती माझ्या पाहण्यांत आल्या, त्या सर्वांचा आकार एकसारखा होता. सर्वांचीं अक्षरें हि सुंदर, एका वळणाचीं आहेत. "

आपल्या श्री समर्थचरित्राच्या "श्री समर्थसंप्रदाय" या आगामी तृतीय खंडांत संप्रदायाच्या या वैशिष्ट्याविषयीं लिहितांना ती. शंकर श्रीकृष्ण देव म्हणतात :

"संप्रदायाचें तत्कालीन आणखी एक लक्षण माझ्या लक्षांत येतें तें असें कीं, त्या काळीं छापखाने नसल्यामुळें सर्व मठांतून लेखनक्रिया परंपरेनें अखंड चालत असे. श्रीमत् दासबोधाशिवाय दुसऱ्या कोणत्या हि ग्रंथांत लेखनक्रियेवर तुम्हांस विवेचन आढळणार नाहीं. या संप्रदायाचें हें एक वैशिष्ट्य होतें. श्रीसमर्थांनीं आपल्या सर्व शिष्यांना तो एक दंडक च घालून दिलेला होता. त्यामुळें प्रत्येक मठपति आणि मठांत वास्तव्य करून राहणारी इतर मंडळी यांचें लेखन सतत चाले. प्रत्येक मठांत श्रीसमर्थांचें वाङ्मय तर संपूर्ण असे च, पण पूर्वकालीं होऊन गेलेल्या सर्व सत्पुरुषांच्या वाङ्मयाच्या प्रती, मठपतींच्या आवडीप्रमाणें, कांहीं ना कांहीं असत च. हा दंडक कल्याणस्वामी आणि त्यांची परंपरा यांच्याकडून विशेष च पद्धतशीरपणें पाळला जात असे. कल्याणांच्या परंपरेंतील मंडळींचें अक्षर अगदीं एकसारखें, एका वळणाचें आणि सुंदर असे,

जें देखतां चि चतुर। समाधान पावती ॥

त्यांच्या परंपरेंतील दासबोधाच्या प्रती माझ्या पाहण्यांत इतक्या आल्या आहेत कीं, मी आतां दुरून पाहून हि कल्याणांच्या परंपरेंतलि प्रत ओळखूं शकतो. कल्याणस्वामींचे एक शिष्य, आपचंदमठाचे अधिपति, शिवरामस्वामी यांनीं परोपकारार्थ स्वतः दासबोधाच्या अकरा प्रती केल्या होत्या. त्यांनीं स्वतःला आणि इतरांना असा नियम घालून दिला होता कीं, अक्षर एवढें असावें कीं, जें लहानपणीं, मध्यम वयाला आणि वृद्धपणीं वाचतां यावें. तें फार बारीक नसावें व फार मोठें हि नसावें, मध्यम असावें. दासविश्रामधाम या प्रचंड चरित्रग्रंथाचे कर्ते, एकेहाळी मठाचे अधिपति आत्माराम, हे शिवरामांचे नातशिष्य होतः शिवरामांचे रामचंद्र व रामचंद्रांचे आत्माराम. या आत्मारामांचे एक च उदाहरण मी अशासाठीं सांगूं इच्छितों कीं, त्यावरून त्या काळीं सर्व मठपति पोथ्यापुस्तकांचे बाबतींत किती आस्थेवाईक असत याची कल्पना व्हावी. ... ..."

कल्याणांच्या हातची श्री समर्थांची कोणती कविता आज उपलब्ध आहे याचा हि विचार केला पाहिजे. डोमगांव येथील श्रीमत् दासबोधाची प्रत ही संपूर्ण कल्याणांच्या हातची असा समज आजपर्यंत प्रचलित आहे. या समजुतीला थोडासा धक्का ती. नानासाहेब देव यांनीं दहा वर्षांपूर्वीं लिहिलेल्या आणि आज प्रथम च या ग्रंथांत दुसरें परिशिष्ट म्हणून प्रसिद्ध होत असलेल्या त्यांच्या एका टांचणानें बसणार आहे. आतां त्यांचें मत असें झालें आहे कीं, डोमगांव मठांतील दासबोधाची प्रत ही दोघांनीं लिहिली असली पाहिजे. त्यांत कांहीं भाग कल्याणांनीं लिहिलेला असणार ही त्यांची खात्री आहे, पण कोणता भाग कल्याणांच्या हातचा हें अजून

त्यांनीं निश्चित ठरविलें नाहीं. पण एवढें खरें की, ती संपूर्ण प्रत एकट्या कल्याणांच्या हातची नसून कल्याण व आणखी कोणी तरी एक अशा दोघांच्या हातची ती असावी, असें त्यांना आतां वाटत आहे.

दासबोधाच्या या प्रतीच्या पानाचे फोटो पूर्वी प्रसिद्ध झाले च आहेत. कल्याणांच्या एका बाळबोध पत्राचा फोटो या ग्रंथांत पुढें देण्यांत येत आहे. कल्याणांच्या हातच्या बाडाच्या पानाचा हि फोटो पूर्वी देण्यांत आला आहे. हे सर्व फोटो पाहून कांहीं निश्चित अनुमान करतां येईल च असें नाहीं. त्यासाठीं तो दासबोध, तें पत्र आणि हें बाड हीं मूळावरून च पहावीं लागतील.

आतां फक्त कल्याणांच्या हातच्या बाडाविषयीं विचार करावयाचा. या बाडाचें वर्णन ती. शंकर श्रीकृष्ण देव यांच्या शब्दांत देण्याचें योजिलें आहे. श्री रामदासी संशोधन – प्रथम खंड या ग्रंथाच्या पृष्ठांक १०२ ते १०४ वर त्यांनीं या बाडाची नोंद केली आहे ती अशी :

" श्री समर्थांच्या कवितेचें हें प्रचंड बाड सबंध श्री कल्याणस्वामींच्या हातचें आहे. ज्ञानकोशाच्या तीन चार भागांएवढें तें मोठें आहे. सभेच्या संग्रहांत एवढें मोठें दुसरें बाड नाहीं व दुसरीकडे कोठें हि माझ्या पाहण्यांत आलेलें नाहीं. जगाच्या पाठीवरील कुठल्या हि प्रदर्शनांत मांडण्याला तें योग्य आहे. तें अत्यंत प्रेक्षणीय आहे. अथपासून इतिपर्यंत अक्षर एकसारखें सुंदर आहे. श्री रामदास आणि रामदासी ग्रंथमालेंतील तिसऱ्या व दाहाव्या भागांच्या प्रस्तावनेंत या बाडाचें किंचित् वर्णन आलेलें आहे. तिसऱ्या भागांत जेवढ्यास तेवढ्या हस्ताक्षराचा नमुना हि दिलेला आहे.

" पाठपोठ एक पृष्ठ धरलें म्हणजे २३१ व्या पृष्ठावर या बाडाचा मध्य येतो. म्हणजे आपल्या हल्लींच्या पद्धतीप्रमाणें या बाडाचीं २३१ × २ × २ = ९२४ पानें होतात. सर्व पानांची लांबी ९½ इंच आहे, पण मधोमधच्या पानाची रुंदी ७ इंच आहे, तर अगदीं वरच्याची १० इंच आहे. अशी या बाडाची रचना आहे. तें मधोमध पोटांतून जाड सुतळीनें शिवलेलें आहे. दोन्हीं बाजूंचे पुठ्ठे खूप लठ्ठ आहेत. रद्दी कागद एकमेकाला डकवून ते बनविलेले आहेत. या रद्दी कागदावर जी मोडी लिपी आहे ती श्री शिवकालीन आहे. मागील बाजूच्या पुठ्यांत १०९५ हा सन तीन ठिकाणीं आढळला. सन १०९५ म्हणजे शक १६०७. या च पुठ्यांत मुरलीधराचें, देवीचें, विजापूरच्या एकाद्या सरदाराचें आणि कांहीं किरकोळ अशीं चित्रें आढळलीं.

" हें सबंध बाड सभेकडून छापलें गेलें आहे. हें सबंध बाड म्हणजे मालेंतील तिसरा भाग **श्री रामदासांची कविता**, पांचवा भाग **श्री श्लोक मनाचे** आणि दहावा **श्री करुणाष्टकें**.

× × ×

श्री समर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ५१



श्री समर्थांच्या कवितेचें प्रचंड बाड — श्री कल्याण स्वामींच्या हातचें

" या बाडाला मोल नाहीं. या च काय, पण कोणत्या च बाडाचें मोल करतां यावयाचें नाहीं. ही आपल्या महाराष्ट्राची बहुमोल अशी खरी संपत्ति आहे. विद्येची विलक्षण चाड आणि पूर्वजांचा निस्सीम अभिमान असलेलीं स्वतंत्र राष्ट्रें असलीं संपत्ति डोक्यावर घेऊन नाचतीं ! नाचतात च, आपण पहातों आणि ऐकतों. सत्कार्योत्तेजक सभेनें मात्र कोणाच्या जिवावर उड्या माराव्या ? कोणाला जरूर आहे ?

" कल्याण महाराज किती साक्षपी होते, याची साक्ष हें बाड देत राहील. "

अशा या बाडाचें महाराष्ट्राला दर्शन व्हावें म्हणून त्याचें छायाचित्र सोबत दिलें आहे.

कल्याणांच्या लेखनविषयक अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत. त्यांनीं एका रात्रींत दासबोध उतरून काढला. लेखन संपवून कल्याणांना उठावयास उजाडलें च. कल्याण उठले, उभे राहिले, पण चांचपडूं लागले, त्यांना कांहीं दिसेना; तों समर्थांनीं त्यांना दृष्टि दिली, अशा सारख्या त्या कथा होत. या अशा सर्व कथा खऱ्या च असतात असें नाहीं. अशा गोष्टींकडे कोणत्या दृष्टीनें पहावयाचें असतें. याविषयींचा आमचा एक विचार " कल्याणांची थोरवी " या मथळ्याखालीं आम्ही पुढें सादर करणार आहोंत.

## ( ५ ) तें सांकेतिक पत्र, कल्याणांचें कां समर्थांचें ?

प्रथम या पत्राची हकिकत देऊन मग तें उद्धृत करितों. श्री रामदास आणि रामदासी ग्रंथमालेचा, शक १८४२ चैत्र शु. १ ला प्रसिद्ध झालेला, सतरावा भाग, " श्री सांप्रदायिक विविध विषय – द्वितीय खंड, या ग्रंथांतील " श्रीसमर्थप्रताप व अफझुलखानाचा वध " या आपल्या लेखांत ती. शंकर श्रीकृष्ण देव या पत्राचा उल्लेख करितात तो असा —

" मागें बऱ्या च वर्षांपूर्वीं ज्ञानप्रकाशाच्या जुन्या अंकांत शिवाजी महाराजांना उद्देशून कल्याणस्वामींचें म्हणून छापलेलें एक ओवीबद्ध पत्र वाचल्याचें मला पक्कें आठवतें. त्याचें साल किंवा अंक मला स्मरत नाहीं, पण त्यांतील प्रत्येक चरणाचें आद्याक्षर घेऊन ओळीनें वाचल्यास " अफझुलखान निघाला सावध असा " असें किंवा अशा अर्थाचें तें वाक्य होत होतें. "

या वाक्यावर त्या च लेखांत देवांनीं जी तळटीप दिली ती अशी —

" दहा पांच वर्षांमागें मिरजेकडील कोणी एकानें श्री शिव छत्रपतींचें एक जुनें चरित्र छापलें होतें, त्यांत सदरहु ओवीबद्ध पत्र टिपेंत वाचल्याचें मला आठवतें. आद्याक्षरांवरून ' विजापुराहून सरदार निघाला ' असा अर्थबोध होत होता. "

हा लेख रामदास आणि रामदासी मासिकांत प्रसिद्ध झाल्यावर या पत्राच्या दोन प्रती देवांना मिळाल्या, एक बंदर राजापुर येथील संस्कृत ग्रंथसंग्रहालय व संस्कृत पाठशाळा यांचे व्यवस्थापक वेदमूर्ति रघुनाथ कृष्ण पाटणकर यांचेकडून आली व दुसरी जळगांवचे रा. हिरा रामा खरादी यांचेकडून. या दोन्हीं प्रतींच्या आधारें तें पत्र पाठांतरांसह वरील ग्रंथाचा ९१ वा लेखांक म्हणून देवांनीं रामदासी मासिकांत प्रसिद्ध केलें. तें पत्र देतांना त्या लेखाच्या शेवटीं ती. नानासाहेब म्हणतात –

हें पत्र " दहा पांच वर्षामागें 'विहारी' नांवाच्या वर्तमानपत्रांत, व 'विजापूरच्या आदिलशाहीचा शेवट' या पुस्तकांत प्रसिद्ध झालें होतें, पण हें पत्र कोणास, कोठें सांपडलें, तें किती जुनें आहे, तें हल्लीं कोणाच्या संग्रहीं आहे, वगैरे माहिती प्रकाशित झाली पाहिजे, असें वाटतें."

अशी माहिती कांहीं प्रसिद्ध झाल्याचें दिसत नाहीं. उपलब्ध श्रीसमर्थ-चरित्रांत या पत्राचा उल्लेख नसावा, असें वाटतें. श्री समर्थवाग्देवतामंदिरांत तें पत्र किंवा त्याची नकल हि नाहीं.

वर निर्देशिलेल्या ९१ व्या लेखांकावरून आतां तें पत्र येथें देतों —

तें पत्र

विवेकें करावें कार्यसाधन । जाणार नरतनु हें जाणोन ।
पुढील भविष्यार्थीं मन । रहाटों चि नये ॥ १

चालों नये असन्मार्गीं । सत्यता बाणल्या अंगीं ।
रघुवीरकृपा ते प्रसंगीं । दासमाहात्म्य वाढवी ॥ २

रजनीनाथ आणि दिनकर[1] । नित्यनेमें[2] करिती संचार ।
घालिताती येरझार । लाविलें भ्रमण जगदीशें ॥ ३

आदिमाया मूळ भवानी । हे चि[3] जगाची स्वामिनी ।
येकांतीं विवंचनों[4] करोनी । इष्ट योजना करावी ॥ ४

या पत्रांत शिवाजीराजांना जो इषारा देण्यांत आला आहे तो असा —

वि जा पु र चा स र दा र नि घा ला आ हे

येकांतीं विवंचना करोनी । इष्ट योजना करावी ॥

---

(१) दिवाकर, (२) निशिदिनीं, (३) हे तो जगताची स्वामिणी ।, (४) विवेक धरूनी.

हें पत्र कल्याणांचें म्हणून मानण्यांत येत असतें. तें तसें कां मानण्यांत यावें आम्हांला समजत नाहीं. या पत्रांत शिवरायांना देण्यांत आलेला इषारा आणि पत्रांतला अर्थवाही आणि बोधप्रद इतर मजकूर वाचून आमच्या मनांत असें येऊन गेलें कीं, अफझुलखानाची भेट घेण्यापूर्वी शिवाजी राजे समर्थांच्या भेटीस गेले असते तर समर्थांनीं त्या भेटींत शिवाजीराजांना जें कांहीं सांगितलें असतें तें सारें सूत्ररूपानें या चार ओव्यांत आलें आहे. विचारानें वागून कार्यभाग साधा, नरदेह तर जावयाचा च आहे, तेव्हां आपण गेलों तर काय होईल असा विचार मनांत आणूं नका, पण तरी देखील असन्मार्गानें जाऊं नका, खरेपणानें वागल्यास रामराय कृपा करून तुमचा आमचा महिमा वाढवितील, सूर्य आणि चंद्र यांच्यामागें हि जगदीशानें येरझारा लावल्या च आहेत, भवानी ही च जगाची स्वामिनी आहे, तेव्हां एकांतांत विचार करून जरूर ती सर्व योजना करावी, हें च श्री समर्थांनीं शिवाजीराजांना त्या भेटींत सांगितलें असतें. म्हणून आम्हांला असें वाटतें कीं, हें पत्र कल्याणांचें नसून समर्थांचें असावें. पण त्यांत शंका कां यावी? अफझुलखानाचा वध करून राजे समर्थांच्या दर्शनास आले असतां समर्थांनीं त्यांचा गौरव करण्यासाठीं दासबोधांतील अठराव्या दशकाचा सहावा समास सांगितला हें आतां सर्वांना ठाऊक झालें आहे. त्या समासांतील

बरें ईश्वर आहे साभिमानी । विशेष तुळजा भवानी ।
परंतु विचार पाहोनी । कार्य करणें ॥

ही नववी ओवी, या पत्रांतील

आदिमाया मूळ भवानी । हे तों जगताची स्वामिनी ।
येकांतीं विवेक धरूनी । इष्ट योजना करावी ॥

या ओवीशीं ताडून पाहिली, म्हणजे हें पत्र आणि तो समास या दोन्हींचें कर्तृत्व एका च व्यक्तीचें असलें पाहिजे असें वाटूं लागतें. बाकी हें पत्र कल्याणांचें असलें काय, किंवा समर्थांचें असलें काय, श्री शिवाजी महाराज आणि श्री समर्थ यांची भेट अफझुलखानाच्या वधापूर्वी झाली च नव्हती असें क्षणभर वादासाठीं मानलें तरी, खान आणि राजे यांच्या भेटीपूर्वीपासून च श्री समर्थ राजांच्या राजकारणांत लक्ष घालूं लागले होते हा या पत्रावरून निघणारा निष्कर्ष कोणाला हि नाकबूल करतां येणार नाहीं.

## ( ६ ) दिवाकर - उद्धव - वादांत कल्याणांची भूमिका

श्री समर्थांच्या पश्चात् चाफळ मठाच्या पारपत्याधिकाराबाबत दिवाकर आणि उद्धव या दोन प्रमुख समर्थशिष्यांमध्यें जो वाद सुरू झाला होता, त्या

वादांत कल्याणांची भूमिका कोणती होती, हें आपल्याला पहावयाचें आहे; आणि तें केवळ अनुमानानें नव्हे, तर अस्सल लेखी पुराव्याच्या आधारानें.

पृष्ठांक ४० वर " श्री शुक आख्यान " या स्फुट प्रकरणांत

वृथा भांडिती निंदिती येकमेका । भरा दुर्भराकारणें शिष्यशाखा ॥

असें कल्याणांनीं म्हटलेलें आपण पाहिलें च आहे. ते या च वादाला अनुलक्षून असावें असें पृष्ठांक १६७ वर आपण अनुमान केलें आहे. या वादाकडे पहाण्याची कल्याणांची ही सर्वसाधारण दृष्टि झाली.

पण या वादाविषयीं कल्याणांची भूमिका ज्यावरून स्पष्ट होईल, असें खुद्द कल्याणांनीं दिवाकरांना लिहिलेलें अस्सल पत्र सत्कार्योत्तेजक सभेच्या श्री रामदास आणि रामदासी ग्रंथमालेंतील नववा भाग " श्री संप्रदायाचीं कागदपत्रें " या ग्रंथाच्या पृष्ठांक ८५-८६ वर लेखांक ४९ म्हणून सुमारें तीस वर्षांपूर्वी च प्रसिद्ध झालेलें आहे. खुद्द कल्याणांच्या हातचें हें अस्सल पत्र आज श्री समर्थवाग्देवता-मंदिरांत आहे. त्या पत्राची लांबी १६ इंच व रुंदी ६ इंच आहे. त्यावरून घेतलेलें छायाचित्र मुद्दाम सोबत दिलें आहे. तें पत्र प्रथम येथें ओळवार उद्धृत करितों.

श्रीरामवरद

समर्थस्वामी

श्रीगुरुभक्तपरायेण मोक्षश्रीया वीराजीत वि
राजमान दिवाकर गोसावि यांप्रति कल्याण
नाम्ने कृतानेक नमस्कार विनति उपेरि तु
म्ही पत्र पाठविलें तें पावोन लेखनार्थ अवग
त जाहलें सर्व प्रकारें विस्तारें ल्याहावें तरि
श्री याचीं अज्ञाप्रमाणें वर्तावे
हें उचीत ते हि सुज्ञ आसेत वडीलपणाची
निती जे परंपरागत उपासना स्छापना
जे केलि आहे तें भजन चालावें तेथें कल
हास कारण नाहि आपण श्रींच्या अज्ञे
प्रमाणें देवाचा कार्यभाग चालु देणें श्री

शिवथरचे घळिस आस्तां तुह्मावर सं
तोष होउन नळ नाम संवत्छरिं अज्ञा स
र्वेत्रांस केलि जे हा महाबळेश्वरकर आ
हे बुद्धि हि महाबळ आहे राजद्वारिं की
त्येक प्रसंगीं पाठवायास योग्य आसे
प्रस्थानपारपत्या योग्य याच्या हस्तें श्री
चें संस्थान जोंपर्यंत तों कार्य कर्तव्य वंश
परंपरेनें ध्यावें ऐसें बोलोन तुह्मास श्री
नि तांबुल दिधला ते समयि गो उद्धव
गोसावि व विठल गोसावि व चीमणा
बाई व भानजी गोसावि वे आह्मी आणि
क कित्यक समुदायि होते ते अज्ञा स्मरो
न अभिमान अक्रोध होउन भजनास
प्रवर्तल्यानें श्री दया करितिल तुह्मी धै
र्य न टाकणें यांच्या कलहामुळें श्रीच्या
धर्म स्थापनेसि अंतर पडे ऐसें न करणें
त्यांचा संतोषरूप आशिर्वाद आसे सर्व
हि यश देतिल राजेश्री उद्धव गोसावि यां
स हि पत्र लिहिलें आसे त्यावरुन विदित हो
इल आह्मी हि लवकरिच येतों बहुत का
य लिहिणें धैर्य श्रीभजनाचें न टाकणें
हे विनति

यावरून असें दिसतें कीं, कल्याणांनीं हें पत्र दिवाकरांच्या पत्राला उत्तर म्हणून पाठविलें आहे, आणि उद्धवांना हि या बाबतींत एक पत्र कल्याणांनीं लिहिलें होतें. "नळ नाम संवत्छरिं" म्हणजे शक १५९८ मध्यें सर्व जण शिवथरच्या घळींत असतां, दिवाकरांवर संतुष्ट होऊन, हा महाबळेश्वरकर आहे, बुद्धि हि महाबळ आहे, राजद्वारीं कित्येक प्रसंगी पाठविण्यास योग्य आहे, श्री चें

संस्थान जोंपर्यंत आहे तोपर्यंत " प्रस्छान पारपत्या " चें कार्य यांच्या हस्तें वंशपरंपरेनें घ्यावें, अशी श्रीसमर्थांनीं सर्वांना आज्ञा करून दिवाकर गोसावी यांना तांबूल दिला; या प्रसंगीं उद्धव गोसावी, विठ्ठल गोसावी, चिमणाबाई, भानजी गोसावी, आपण स्वतः आणि आणखी कित्येक " समुदायि " असे उपस्थित होतों, असें कल्याण या पत्रांत सांगत आहेत. यांतील " समुदायि " शब्द आम्हांस महत्त्वाचा वाटतो. या शब्दाचें महत्त्व अनेक दृष्टींनीं आहे. आम्हांस या प्रसंगीं खालील ओवी स्मरते.

उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनास सिकवावे ।
उदंड समुदाये करावे । परी गुप्तरूपें ॥ ११–१०–१८

पण हा आपला आजचा विषय नव्हे.

वर निर्देशिलेल्या समर्थांच्या आज्ञेचा आपल्या पत्रांत उल्लेख करितांना कल्याण दिवाकरांना लिहितात कीं, " श्री याची अज्ञाप्रमाणें वर्तावे हें उचीत. " शिवाय " परंपरागत उपासनास्छापना जे केलि आहे तें भजन चालावें तेथें कलहास कारण नाहि " ही " वडीलपणाची निती " सांगून कल्याण दिवाकरांना त्या च पत्रांत दुसऱ्यांदा म्हणतात कीं " श्री च्या अज्ञेप्रमाणें देवाचा कार्यभाग चालु देणें. "

श्री समर्थांनीं सांगितल्याप्रमाणें सर्व कांहीं व्हावें, ही कल्याणांची इच्छा सहाजिक च असावी, हें तर खरें च, पण समर्थांच्या आज्ञेप्रमाणें कां वागावयाचें ? तर, श्री समर्थांनीं सुरु केलेल्या आणि जवळ जवळ पूर्णत्वास नेत आणलेल्या धर्मस्थापनेस दिवाकर आणि उद्धव यांच्यामधील कलहामुळें अंतर पडूं नये म्हणून. कल्याण म्हणून च, ते इतके जागरुक होते. दिवाकर आणि उद्धव यांना या दृष्टीची जाणीव कल्याणांनीं करून दिलेली आहे. कल्याणांनीं श्री समर्थांवरील आपल्या पदांत केलेल्या " धर्मस्थापक " अशा त्यांच्या उल्लेखावरून कोणतें अनुमान निघतें याचा विचार करतांना या पत्राचा हि निर्देश आपण पृष्ठांक १९१ वर केला च आहे. त्या काळीं धर्मकारण आणि राजकारण हीं परस्परावलंबी होतीं आणि आज हि आहेत.

श्री समर्थांनीं रघुनाथभटांना लिहिलेल्या त्या पत्रांतील " तुमचें मन मजवरी बहुत आहे ते तुमचे आवडीच्या गुणे कल्याण होईल ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें " हा रघुनाथभटांच्या निमित्तानें श्री समर्थांनीं, जणूं कांहीं, अवघ्या महाराष्ट्राला च आशीर्वाद दिला आहे, त्या प्रमाणें च कल्याणांनीं आपल्या या पत्रांत

त्यांचा संतोषरुप आशिर्वाद आसे
सर्व हि यश देतिल

हें दिवाकरांना दिलेलें आश्वासन कल्याण दिवाकरांच्या निमित्तानें, जणूं कांहीं, तुम्हा आम्हां सर्वांना च देत आहेत. मात्र

श्रीच्या धर्मस्थापनेसि अंतर पडे ऐसें न करणें

या कल्याणांच्या सुचनेकडे आपलें दुर्लक्ष न झालें, तर च श्री समर्थांचा संतोषरूप आशीर्वाद आपल्याला मिळावयाचा आहे आणि आपल्या सर्व धडपडीला यश येणार आहे.

## ( ७ ) कल्याणांचे शिष्य महंत

श्री रामदासांची कविता – प्रथम खंड, श्री सांप्रदायिक विविध विषय – प्रथम खंड व श्री रामदासी संशोधन – दोन्ही खंड या ग्रंथांच्या आधारें कल्याणांच्या शिष्य महंतांची यादी खालील प्रमाणें होते :

( १ ) अनंत गोसावी वाळिंबे

( २ ) अप्पाजी गोसावी उलुक

( ३ ) आणाजीबावा भालकीकर

" बालाघाट प्रांतीं लातूरच्या आग्नेयी दिशेस दहा कोसांवर नीलंगे म्हणून एक गांव आहे. × × नीलंग्याचे पूर्वेस चवदा कोस व माणिकप्रभूंच्या हुमनाबादेच्या उत्तरेस आठ कोस **भातंबरें** नांवाचें मोगलाईतील एका जहागीरदाराचें गांव आहे. त्या गांवीं श्रीकल्याणशिष्य **आण्णाजीबावा** यांचा मठ आहे. × × आण्णाजीबावा पूर्वी **भालकीस** रहात असत. भातंबऱ्यापासून भालकी दीड कोस आहे. आण्णाजीबावा व इतिहासप्रसिद्ध रामचंद्रराव जाधव हे समकालीन होत. रामचंद्ररावांचा कबिला भालकीस गढींत असे व ते स्वतः भातंबरें गांवीं किल्ल्यांत रहात. त्यांच्या च आग्रहावरून आण्णाजीबावा भातंबरें येथें रहावयास गेले. किल्ल्याच्या उत्तरेस आण्णाजीबावांकरितां जाधवांनीं मठ बांधून देऊन मठास साठ बिघे जमीन इनाम दिली होती. भालकीस हि साठ बिघे जमीन इनाम होती, पण ती पुढें खालसा झाली. मठाची परंपरा अशी : श्रीसमर्थ – कल्याण – **आण्णाजी** – बावजी – बापूजी – राघोजी – रावजी – आपाजी – नागनाथ – माणिकबावा ( विद्यमान ).

" किल्ल्याच्या उत्तरेस रानांत आण्णाजीबावांची **समाधी** आहे. पूर्वी तेथें वस्ती होती पण पुढें तेथून ती उठून किल्ल्याच्या पूर्वेस आली, आणि तेव्हां च ह्यांचा मठ हि नवीन वस्तींत आला. आण्णाजीबावा ब्रह्मचारी होते. पंढरपुरच्या यात्रेहून परत भातंबऱ्यास येत असतां महामारीच्या उपद्रवानें मार्गांत च **गोरठें** गांवीं त्यांचा अंत झाला. दहन गोरठ्यास च झालें, पण समाधी मात्र भातंबऱ्यास बांधली. समाधीमंदिर फार सुंदर आहे.

" + + मठ अतिजीर्ण झाला आहे. + + मठांत कागदपत्र मुळीं च नाहींत. + + खुद्द आण्णाजी बावांचें डोमगांवीं मिळालेलें एक अस्सल पत्र **श्री संप्रदायाच्या कागदपत्रांत** लेखांक ४५२ म्हणून नुकतें च प्रकाशित झालें आहे, तें पाहिलें

म्हणजे बावांचा व्याप कांहीं लहान होता, असें दिसत नाहीं. + + ग्रंथराजाची एक हस्तलिखित पोथी मात्र मठांत आहे. श्री कल्याणशिष्य आनंदमूर्ति यांच्या एका शिष्यानें १६८८ च्या आश्विन वद्य १० स इंदुवासरीं पोथीचें लेखन समाप्त केलें असा शेवटीं उल्लेख आहे. आनंदमूर्ति म्हणजे च बहुधा आण्णाजी बावा होत. यावरून सहज वाटतें, १६८८ च्या पूर्वी च आण्णाजी बावांचा अंत झाला असावा. — १८३९ फाल्गुन शु. १० " ( पहा – श्री सांप्रदायिक विविध विषय–द्वितीय खंड, लेखांक ७१, लेखक – शंकर श्रीकृष्ण देव )

( ४ ) आतु आका

( ५ ) आनंत गोसावी सेणवी

( ६ ) आनंत भट

अनंतांची बरी च कविता डोमगांवच्या संप्रहांत आहे. पण या तीन अनंतांपैकीं ते अनंत कोणते ?

( ७ ) आंताजी बावा नींनामकर

( ८ ) आप्पाजी गोसावी चितळे

( ९ ) आप्पाजी गोसावी नाशिककर

( १० ) आप्पाजी गोसावी हुजुरचे

( ११ ) आंबाजी गोसावी माजगांवकर

( १२ ) उदास गोसावी वोडेश्वरकर

( १३ ) कबीर

( १४ ) काळुबाई

( १५ ) कृष्णाजी गोसावी तामसेकर

( १६ ) कृष्णाजी गोसावी तिकसेकर

( १७ ) केशवबावा उंबरजकर

मठाधिपति उंबरज. चाफळ येथील श्री राममंदिराच्या मागच्या बाजूस, नदीपासून मंदिरास धोका पोहोंचूं नये म्हणून जो बुरुज बांधला आहे तो यांनीं च. श्री समर्थ आणि श्री कल्याण यांच्या अस्थि एका च वेळीं काशीस नेण्याचा जो चमत्कारपूर्ण प्रसंग झाला, तो यांच्यामुळें च. काशीस नेण्यासाठीं चाफळ येथील वृंदावनांतून श्री समर्थांच्या अस्थि यांनीं ज्या दिवशीं कल्याणांना न विचारतां काढल्या त्या च दिवशीं कल्याणांनीं परंडे येथें आपला देह ठेवला. ' कल्याणांचें

निर्याण ' या मथळयाखालीं याचा उल्लेख पुन्हां येणार च आहे. यांनीं शक १६२० त केलेली दासबोधाची सचित्र प्रत डोमगांवीं आहे. शक १६२४ ची उंब्रजची प्रत हि यांच्या च हातची असावी. पहा : श्रीरामदासींचीं ऐतिहासिक टिपणें, पृष्ठांक ४१ व ४४.

( १८ ) कोंडाजी गोसावी पन्हाळकर

( १९ ) खेत्रपाळ गोसावी नामवंसि कुरडूकर

( २० ) गोविंद गोसावी कोळगांवकर

बीड जिल्ह्यांत गवराई तालुक्यांत कोळगांव बहुधा आहे. १६३६ तील ग्रंथराजाच्या प्रतीचे लेखक दीन गोविंद ते हे च असावेत.

( २१ ) गोविंद गोसावी पन्हाळेकर

( २२ ) जगन्नाथबावा उर्फ जगज्जीवन तडवळेकर

यांची बरीच कविता उपलब्ध आहे. तडवळे मठाचे संस्थापक. पुण्यतिथी — १६७० पौष वद्य २

( २३ ) जयराम गोसावी

१६१५ तील श्री दासबोधाची प्रत यांच्या हातची. पहा : श्रीरामदासींचीं ऐतिहासिक टिपणें, पृष्ठांक ३९

( २४ ) जानावाबावा वडगांवकर

बहुधा शेणोली जवळचें वाघमाऱ्याचें वडगांव असावें.

( २५ ) दिगंबर — कविता उपलब्ध.

( २६ ) नरहरी — कविता उपलब्ध.

( २७ ) नारायण गोसावी वाहेकर — कविता उपलब्ध.

( २८ ) नीळकंठ बावा हुजूरचे — म्हणजे श्री समर्थांकडील, कीं छत्रपतींकडील ?

( २९ ) पुरुषोत्तम — कविता उपलब्ध.

( ३० ) बहिरव गोसावी वाईकर

( ३१ ) भिमाजी

( ३२ ) भिवाजीबावा अष्टेकर — बहुधा हरिनारायणाचें अष्टें

( ३३ ) महादेव गोसावी इसलामपुरकर

( ३४ ) महादेव गोसावी वऱ्हाडकर

( ३५ ) मुद्‌गल गोसावी ऊर्फ मुधोबावा

कल्याणांच्या पश्चात्‌ डोमगांवचे मठपति. पुण्यतिथी – १७६१ ज्येष्ठ शुद्ध १४. यांच्या हातची शक १६२० त लिहिलेली दासबोधाची प्रत डोमगांवीं आहे. यांनीं १६२२ त लिहिलेली दासबोधाची प्रत आपले गुरुबंधु रामाजीदादा बारामतीकर यांना दिली होती. समर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक १८६७ म्हणजे ती प्रत होय. पहा : श्रीरामदासीचीं ऐतिहासिक टिपणें – टिपण चौथें, पृष्ठांक ४१ व ४३.

यांचे गुरुबंधु, कल्याणशिष्य, सामराज म्हणतात :

स्वामीचे बहु शिष्यवर्ग जगतीं त्यामाजि साधु भला ।
नामें मुद्‌गल योगिराज बरवा सच्छिष्य नामाथिला ।
भाग्याचा वर पावला गुरुकृपा कल्याण पावे पदा ।
यालागी सुख सामराजपदवी भोगी सदा संपदा ॥ ७ ॥

हा श्लोक सामराजांनीं कल्याणांवर केलेला म्हणून कल्याणस्तवनांत पृष्ठांक १४८ वर दिला आहे तें आपलें चुकलें. तसें च पृष्ठांक १५६ वर कल्याणस्तवनांत दिलेला " श्रीमत्‌सत्यस्वरूप..." हा श्लोक हि कल्याणांवरील नसून मुद्‌गलांवर च केलेला होय. पहा – श्री सांप्रदायिक विविध विषय – प्रथम खंड, पृष्ठांक ३१२ व ९२. मुद्‌गलांचें समाधीमंदिर डोमगांवीं कल्याणांच्या समाधीमंदिराजवळ च आहे.

( ३६ ) मल्हारबावा हुजुरचे

( ३७ ) रामकल्याण

( ३८ ) रामाजी गोसावी गुरव

( ३९ ) रामाजी गोसावी रेवडीकर

( ४० ) रामाजी दादा बारामतीकर

बारामती मठाचे संस्थापक. श्री सांप्रदायिक विविध विषय – प्रथम खंड, यांतील लेखांक ५० यांत " कल्याणांच्या महंतांची जी यादी प्रसिद्ध आहे तींत आद्यस्थानीं **रामाजी दादा बारामतीकर** यांचें नांव आहे. पेशव्यांचे आप्त, सावकार व प्रतिस्पर्धी **बाबुजी नाईक,** महाराष्ट्रकविवर्य **मोरोपंत** व निजामाच्या दरबारीं असलेले पेशव्यांचे वकील मुत्सद्दी **गोविंदराव काळे** यांच्या वास्तव्यामुळें **बारामती** हें इतिहासप्रसिद्ध ठिकाण आहे. नाईक बारामतीस रहावयास येण्यापूर्वी च रामाजी दादा तेथें मठ करून होते. रामाजी दादांनीं

स्थापिलेला मारुती गांवाबाहेर दक्षिणेस अर्धा पाऊण मैल कऱ्हा नदीचे कांठीं एकांतांत रम्य ठिकाणीं आहे, व मठ पेठेंत आहे. + +

" रामाजी दादा हे प्रथम गांवाबाहेरील मारुतीचें देवालय बांधून तेथें च उत्सवादि करून होते व त्या देवास गांवच्या मोकदमांनीं वगैरे पाव चावर इनाम जमीन दिली होती. पुढें रामाजी दादांचे नातु भगवंत यांनीं सातारियास जाऊन शाहु छत्रपतीकडून आणखी पाऊण चावर मिळून एकंदर एक चावर इनाम मिळविलें. पेठेंत जो मठ आहे व विहीर आहे व समाधी आहे ती सर्व रचना रामाजी दादांचे नातु भगवंत यांनीं केलेली आहे. "

मुद्गलांनीं शक १६२२ त केलेली आणि रामाजी दादांना दिलेली दासबोधाची प्रत या मठांतून मिळाली. श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक १८६७ म्हणजे ती प्रत होय. इतर माहितीसाठीं " श्री सांप्रदायिक विविध विषय- तृतीय खंड " या ग्रंथांतील शंकर श्रीकृष्ण देव यांचा लेखांक १०३ पहावा. ( रामदास आणि रामदासी मासिकाचा ७३ वा अंक पहा. )

( ४१ ) रामाजीबावा वाळुजकर

( ४२ ) रामाजीबुवा

( ४३ ) लक्ष्मण -- कविता उपलब्ध.

( ४४ ) लक्ष्मण गोसावी वीरवाल्हेकर

( ४५ ) वलिमहमद नांदणजकर -- नांदणजगांव बीड जिल्ह्यांत अष्टी तालुक्यांत आहे.

( ४६ ) वासुदेव गोसावी

( ४७ ) शंकराजी गोसावी वाईकर देशपांडे

( ४८ ) शंभु गोसावी मऱ्हाटे

( ४९ ) शामजी गोसावी जवळेकर -- कविता उपलब्ध.

" समर्थप्रतापाच्या दहाव्या समासांतील ८६ व्या ओवींत कल्याणांच्या ' परमार्थपंथें विचरणाऱ्या ' शिष्यांमध्यें शाम यांचा समावेश केलेला आढळतो. " ( पहा : श्री सांप्रदायिक विविध विषय -- द्वितीय खंड, लेखांक ६१, पृष्ठांक २२, लेखक -- शंकर श्रीकृष्ण देव )

( ५० ) शिवराम गोसावी देवगांवकर -- बहुधा परंडे तालुका.

( ५१ ) शिवराम गोसावी लातुरकर

## ( ५२ ) शिवराम गोसावी हुलके

## ( ५३ ) शिवाजी गोसावी आपचंदे

" आत्मा राम **शिव** कल्याण रामदास " असा एक त्रयोदशाक्षरी नामस्मरणाचा प्रकार आहे. तो वाचकांच्या परिचयाचा बहुधा झाला आहे. **आत्मा** म्हणजे श्रीदासविश्रामधामाचे कर्ते आत्माराम महाराज, **राम** म्हणजे आत्माराम महाराजांचे गुरु रामचंद्र व **शिव** म्हणजे रामचंद्रांचे गुरु व कल्याणस्वामींचे शिष्य शिवरामस्वामी होत. कल्याणांचा मठ डोमगांवीं आहे व शिवरामांचा मठ गुलबुर्ग्याजवळ **आपचंद** गांवीं आहे. या शिवरामांचें पाठांतर फार दांडगें असे. त्यांनीं श्रीमत् दासबोधाच्या किती तरी प्रती लिहिलेल्या आहेत. पूर्व वयांत मध्यम बारीक अक्षरांत लिहिलेली प्रत उत्तर वयांत उपयोगी पडेना म्हणून समाधीपूर्वी अवघीं दोन च वर्षे शक १६४६ त मोठ्या अक्षरांत त्यांनीं एक प्रत लिहिली. ती प्रत हल्लीं त्यांच्या मठीं आपचंद गांवीं आहे. + + शिवरामस्वामींचीं जीं कांहीं स्फुट पदें, प्रकरणें वगैरे उपलब्ध आहेत, तीं फार थोडीं आहेत. + + त्यांनीं खरोखर श्री कल्याणस्वामी व श्रीसमर्थ यांच्या संबंधानें किती तरी लहान मोठीं प्रकरणें लिहिलीं असतील ! " ( पहा: श्री सांप्रदायिक विविध विषय – प्रथम खंड, लेखांक ५७, पृष्ठांक ३२५, लेखक – शंकर श्रीकृष्ण देव ) शक १६०७, १६२९ व १६४६ च्या यांच्या हातच्या दासबोधाच्या प्रती. पहा : श्री रामदासींचीं ऐतिहासिक टिपणें, पृष्ठांक ४५ व ४७

## ( ५४ ) सामराज

" सामराजांची कविता पाहिली म्हणजे ते पूर्ण अधिकारी दिसतात, एकनिष्ठ गुरुभक्त दिसतात, प्रेमळ उपासक दिसतात, पण त्यांच्याविषयीं याहून जास्त कांहीं सांगतां येत नाहीं. विषयांक ५० त स्वामींच्या ४३ महंतांचीं नांवें दिलीं आहेत, त्यांत सामराजांचें नांव नाहीं. यावरून त्यांचा कोठें मठ नसावा, असें दिसतें. त्यांची जी कविता मिळाली आहे ती कांहीं श्रीरामस्तवनपर व कांहीं श्री कल्याणवर्णनपर आहे. + + ". ( पहा : श्री सांप्रदायिक विविध विषय – प्रथम खंड, लेखांक ५२, पृष्ठांक ३०५, लेखक – शंकर श्रीकृष्ण देव )

## ( ५५ ) सुंदर जयराम

## ( ५६ ) स्वामी – बहुधा चिंचोली मठाचे संस्थापक.

## ( ५७ ) स्वामीदास तेलंगसीकर

" स्वामीदास यांचा मठ **तेलंगसी** या गांवीं अहमदनगर जिल्ह्यांतील जामखेड पेठ्यांत असून खर्ड्याच्या उत्तरेस दोन कोस आहे. गांव अगदीं खेडें आहे, त्या गांवीं सुमारें दोनअडीचशें घरांची वस्ती आहे. गांवाच्या उत्तरेस गांवाला

लागून च स्वामीदासांचें समाधीस्थान आहे. स्थान रम्य आणि नेवांत आहे. शके १२२३ त बांधलेल्या एका भव्य पुष्करणीच्या कांठीं आतां मठाचें फक्त जुनें आवार राहिलें आहे. आवारांत अश्वत्थादि गगनचुंबित वृक्ष असून त्यांच्या शीतल छायेंत **श्री स्वामीदास** आणि त्यांचे शिष्य **लक्ष्मण गोसावी** समाधीरूपानें विश्रांति घेत आहेत. उभयतांच्या समाधी अगदीं जवळ जवळ आहेत. समाधींच्या समोर देवीचें एक देवालय आहे. तें लक्ष्मण गोसावी यांनीं बांधिलेलें आहे. त्याच्या दक्षिणेकडील भिंतीवर लेख आहे, तो असा :—

॥ श्री चेरणी स्वामी सुत
॥ लक्षुमण गोसावी ब्र
॥ ह्मच्यारी सके १६९०
॥ सर्व धारी सवछर
॥ वैशाख शुध १३

वर लिहिलेल्या आवारांत च मठाची जुनी पडकी अशी एक इमारत आहे. तींत विद्यमान मठपति गोविंदबुवा सहकुटुंब राहतात. मठाकडे थोडी इनामी जमीन आहे. त्या जमिनीच्या उत्पन्नावर व भिक्षेवर मठाचा प्रपंच कसा तरी चालतो. मठांत ग्रंथसंग्रह किंवा कवितासंग्रह कांहीं च मिळाला नाही. संग्रह होता पण तो गुरुगृहीं म्हणजे डोमगांवीं व सोयऱ्याधायऱ्याकडे विल्हेस लागल्याची हकिकत मठपति सांगत होते. पैकीं डोमगांवच्या मठांतील संग्रह सभेच्या कचेरींत दाखल झाला च आहे व इतर सोयऱ्याधायऱ्याडील संग्रहाचा शोध लावला पाहिजे.

" पुष्करणीवरील शक १२२३ तील महत्त्वाचा जुना शिलालेख पुण्याच्या भारत–इतिहास–संशोधक मंडळाकडे, त्यांच्या मागणीवरून, रवाना करीत आहे. "

पहा : श्री सांप्रदायिक विविध विषय, तृतीय खंड, लेखांक ९६, पृष्ठांक ६, लेखक – अमृत बापूजी रसाळ. ( श्री रामदास आणि रामदासी मासिक अंक ६१ )

## ( ५८ ) हरिबावा भूमकर

" भूम हें डोमगांवापासून बारा कोसांचे आंत च असल्याने श्री कल्याणाचा एखादा उपमठ तरी तेथें असावा असें वाटत होते. चौकशीअंतीं तेथें सुमारें ६०–६५ वर्षांपूर्वी एक रामदासी मठ होता, त्यांत एक वृद्ध गृहस्थ पूजाअर्चा करीत असे, पुढें अकल्पित रीतीनें तो व त्याची भावजय वारली, तेव्हां मठांत असणाऱ्या श्रीरामाच्या पूजेची हेळसांड होऊं लागली, हे पाहून डोमगांवांतील मंडळींनीं त्या मूर्ति डोमगांवीं श्री कल्याणांच्या समाधीजवळ ठेवल्या व श्री कल्याणांच्या पूजेंत असणाऱ्या श्रीरामरायाच्या लहान मूर्ति श्री दत्तात्रय महाराजांच्याकडे दिल्या

गेल्या, अशी माहिती भूम येथील वृद्ध मंडळीकडून समजली. हा मठ बीड मठाखालचा होता असें कांहींनीं सांगितलें होतें. मठाची सर्व इमारत पडून गेली असून तेथें असलेल्या समाधीचें वृंदावन हि निवडुंगांत बुजून गेलें होतें, पण कांहीं वर्षांपूर्वी निवडुंग तोडून भोंवताली ओटा घालून त्यावर छप्पर हि घातलें आहे, असें कळलें. म्हणून दुसरे दिवशीं समाधी पहाण्यास गेलों.

" ( १ ) समाधीचा खालचा चौथरा सुमारें ५ फूट उंच असून त्यावरील वृंदावन पुरुषभर उंचीचें आहे. वृंदावनाच्या कोनाड्यांत पादुका असून कोनाड्याचे चौकटीवर पुढील सात ओळींचा शिलालेख आहे.

श्रीराम कल्याण । गणिते श + ष अब्धी
सा + ( द्रि ? ) गणिते भाद्रे शिते पौर्णिमाः भावा
नाम तथा अदित्य प्रथमे यामार्ध ज
ली सिमाः नक्षत्र शततारका
शुभ दिनी पावोनी मुक्तापुरीः
श्रीकल्याण पदाब्जी राहुनि हारी
दिना जना उधारिः श्री गुरुवे नाम

पहिल्या दोन ओळींत फुल्या दिल्या आहेत तेथील अक्षर लागलीं नाहींत. दुसऱ्या ओळींतील फुलीचे ठिकाणीं द्रि असावेसें वाटतें. तथापि पुढील मजकूर स्पष्ट कळल्यानें व त्यांत नक्षत्रवारयुक्त तिथीमासांचा उल्लेख असल्यानें जंत्रीवरून समाधीशकाचा निश्चय करतां येईलसें वाटतें. " पहा : श्री सांप्रदायिक वृत्त, चर्चा, जीर्णोद्धार वगैरे – खंड चवथा, लेखांक १६०, पृष्ठांक १४१, लेखक – रा. अनंतदास रामदासी : श्री रामदास आणि रामदासी मासिक अंक १४२.

रा. अनंतदास यांच्या लेखाला जोडलेल्या आपल्या संपादकीय पुस्तींत तो. नानासाहेब देव म्हणतात : " या लेखांत श्री समर्थांच्या गाथ्याचे संपादक श्री. अनंतदास रामदासी यांनीं भूम येथील पांच पवित्र स्थानांचा उल्लेख केलेला आहे. पैकीं पहिलें स्थान श्री सांप्रदायिक वाङ्मयाच्या अभ्यासकाला ओळखतां येईल. कल्याण महाराजांचे शिष्य हरि म्हणून होते, त्यांची ती समाधी होय. त्यांचा मठ बीड मठाखालचा होता, अशी जी भूमच्या लोकांची समजूत दिसते ती चुकीची आहे. + + + त्यामुळें हे हरि कोण याची शंका रहात नाहीं. + + समाधीवर असलेला जो शिलालेख अनंतदासांनीं वर दिला आहे त्यांत शकाचें नांव, मास मिती आणि वार हीं असल्यामुळें शक ठरविण्यास मुळीं च पंचाईत पडत नाहीं. अर्थात श्री कल्याणांचे महंत हरि भूमकर यांच्या समाधीचा दिवस

१६७६ भाव नाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध १५ रविवार हा होय. सदरहु शिलालेख म्हणजे एक श्लोक च आहे. + + "

या नांवांत कांहीं नांवें दुबार झालीं असण्याचा संभव आहे. यांपैकीं अनंत, केशव, जगज्जीवन, लक्ष्मण, शामा, शिव, शिवराम, सामराज यांनीं कल्याणांवर केलेली कांहीं कविता या ग्रंथाच्या "श्री कल्याणस्तवन" या भागांत देण्यांत आली आहे. या शिवाय जना, निरंजन, रंक, राघव, शिवदिन यांची हि कल्याणांवरील कांहीं कविता त्या भागांत दिली आहे. पण हें नुसतें कल्याणविषयक कवितेपुरतें झालें, आणि ती हि या ग्रंथांत सगळी देण्यांत आली आहे, असें नाहीं. शिवाय या किंवा दुसऱ्या कल्याणशिष्यांची किती तरी इतर कविता श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत प्रकाशनाची वाट पहात पडून आहे.

ही बहुतेक कविता चाळतां चाळतां प्रमुखत्वानें जी एक गोष्ट लक्षांत येते ती ही कीं, कल्याणांची निःसीम गुरुनिष्ठा या सर्व कल्याणशिष्यांच्या ठायीं हि तितक्या च उत्कटत्वानें वसत होती. ही अशी परंपरा शक १७४० पर्यंत चालू असल्याचें दिसून येतें. तेथून पुढें काळ च फिरला म्हणावयाचा! आज तर गुरूचे ठायीं अनन्यता हा दुर्गुण ठरत आहे आणि पुढाऱ्याचे ठायीं नितांत विश्वास अंधभक्तींत गणला जात आहे.

एक गुरु एक देव । कोठें तरी असावा भाव ।

ही शिकवण जसजशी मागें पडत चालली, तसतसे ते दिवस गेले, आणि आजचे दिवस आले! कल्याण आणि त्यांचे शिष्यप्रशिष्य यांच्या निःसीम गुरुनिष्ठेवरून एवढा जरी बोध आपण आजच्या पडत्या काळांत घेतला तरी पुष्कळ कार्य होणार आहे.

## (८) कल्याणांची थोरवी

शक १५६७ त समर्थांची भेट होऊन त्यांचा अनुग्रह घेतल्यापासून समर्थांच्या आज्ञेनें शक १६०० त डोमगांवास रहाण्यास जाईपर्यंतचा कल्याणांचा सारा काळ बहुतेक गुरुगृहीं आणि तो हि श्रीसमर्थांच्या सहवासांत गेला. डोमगांवास जाण्यासाठीं समर्थांचा निरोप घेऊन कल्याण निघाले असतील त्या वेळची त्यांची मनस्थिति आमच्या सारख्याला कल्पनेनें हि जाणतां येत नाहीं. ती. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं केलेलें कल्याणांच्या त्या मनस्थितीचें वर्णन चवथ्या परिशिष्टांत येणार च आहे. तरी देखील वाचकांच्या अवलोकनांत तें आतां च आलेलें असावें म्हणून येथें उद्धृत करितों. ती. नानासाहेब देव लिहितात —

"कल्याणांना गुरुचरणांचा वियोग असह्य झाला! गुरुभक्तांचें चित्त श्रीगुरुचरणीं कसें जडलेलें असतें पहा. गुरुचरणांना नेत्रोदकानें मनसोक्त स्नान

घालून व वारंवार वंदन करून कल्याणस्वामी परंड्याकडे जावयास निघाले खरे, पण त्यांचें सारें चित्त सद्गुरुपायीं होतें. आतां श्रीसमर्थांची मर्जी कोण सांभाळील, त्यांना स्नानाला उठा म्हणून कोण म्हणेल, पाणी कोण देईल, भोजन कोण घालील, पादसेवन कोण करील, अरण्यांत कोण बरोबर जाईल, सहजस्फूर्तीनें कवनरूप प्रेमोद्गार निघतील ते कोण तात्काळ उतरून घेईल, अशी चिंता करीत व गुरुचरण आठवीत श्री कल्याणस्वामींनीं एक एक पाऊल टाकावें."

कल्याणांच्या आत्यंतिक गुरुनिष्ठेचा च तेवढा बोध यावरून होतो, त्यांच्या संपूर्ण थोरवीचें ज्ञान यावरून होत नाहीं. पण या ठिकाणीं देवांना कल्याणांची संपूर्ण थोरवी वर्णन करावयाची नव्हती. गुरुभक्ताचें चित्त गुरुचरणीं कसें जडलेलें असतें एवढें च त्यांना सांगावयाचें होतें. कल्याणांची संपूर्ण थोरवी समजून घ्यावयाची झाल्यास आणखी पुष्कळ बाबींचा विचार करावयास पाहिजे.

पण तसें करण्यापूर्वीं पृष्ठांक १९७ ते २१३ वर दिलेल्या आणि न दिलेल्या कल्याणांच्या गोष्टींकडे पहाण्याची आमची दृष्टि नमूद करून ठेवतों. कल्याणांच्या बहुतेक साऱ्या गोष्टी त्यांच्या गुरुनिष्ठेविषयींच्या च आहेत. या साऱ्या गोष्टी याप्रमाणें घडल्या च असतील असें आम्ही मानीत नाहीं. उपलब्ध समर्थचरित्रांतून कल्याणविषयक अनेक गोष्टींबाबत विसंगति दिसून येते. पण म्हणून या गोष्टींचें महत्त्व यत्किंचित् हि कमी होत नाहीं. कल्याणांचें शिष्यपण कसें लोकविलक्षण होतें हें साऱ्या गोष्टींवरून दिसून येतें, आणि पट्टशिष्य या अर्थी कल्याण शब्द कां रूढ झाला याचा बोध होतो. या साऱ्या गोष्टी घडल्या असतील किंवा नसतील, पण श्री समर्थ आणि कल्याण या गुरुशिष्यांच्या अद्वितीय जोडीबद्दल अशा गोष्टी समाजांत निर्माण होऊन प्रचलित रहाव्या आणि मान्यता पावाव्या यांत च श्री समर्थांचें समर्थपण आणि कल्याणांचें कल्याणपण आहे. त्यामुळें आपल्याला उभयतांचा यथार्थ परिचय होण्याच्या दृष्टीनें अशा गोष्टींचा सुद्धां फार उपयोग होतो.

कल्याणांचा यथार्थ परिचय करून घेण्यासाठीं ज्या दुसऱ्या कांहीं बाबी आपल्याला विचारांत घ्यावयाच्या आहेत, त्यांत कल्याणस्तवनाचा प्रामुख्यानें समावेश केला पाहिजे. त्यासाठीं या ग्रंथाचा "कल्याणस्तवन" हा दुसरा भाग वाचकांनीं समग्र वाचल्यास त्यांना असें आढळून येईल कीं,

विरक्त, गुरुनिष्ठ, विषयाचा लवलेश नसलेले, ब्रह्मचर्य - व्रतधारी,
निस्पृह, महंती करूं जाणणारे, विरागी, रामउपासक, ज्ञानी,
निष्कपटी, करुणासागर, नम्र मानस, ज्या सम साधू दुर्जन,
सत्यवचनी, लीनता, यमनियम, क्षमा, शांति, योगीराणा

अशा तऱ्हेचें सर्वांनीं कल्याणांचें वर्णन केलेलें आहे. या साऱ्या गुणांचा निष्कर्ष एका च पदांत आणावयाचा झाल्यास, आत्माराम महाराजांचें, पृष्ठांक १३१ वरील, " महंती करूं जाणें " हें कल्याणस्तवन येथें देणें योग्य होईल. कल्याणपरंपरेंतील आत्माराम महाराज म्हणतात :

ऐसा स्थितीवान या जगीं दुर्लभ । परमार्थाचा लाभ जया प्राप्त ॥ १
सर्वांजन सुखी असावे हा हेत । कापट्य किंचित नाहीं चित्तीं ॥ २
परोत्कर्षी सहन उपकार चि करी । गुरुसेवेवरी प्रीत मोठी ॥ ३
गुरुपुत्र कोणी निष्ठल्या सावरी । आनंद चि भरी बुद्धिदाता ॥ ४
न रमोन विरक्ती बहुता करी सुखी । अंतर पारखी भक्तीवंत ॥ ५
महंती करूं जाणे न संडी च प्रेम । ज्याचा आत्माराम साह्कारी ॥ ६

यांपैकीं प्रत्येक गुणाबद्दल किती तरी लिहितां येईल. यांपैकीं कोणत्या हि एका गुणानें कोणी हि थोर होऊं शकेल. पण आपल्याला मात्र या गुणसमुच्चयानें कल्याणांना आलेली स्वाभाविक थोरवी केवळ कल्पनेनें च जाणून घेतली पाहिजे.

समर्थांचा लहान थोर महंत म्हणजे आजचा लहान थोर पुढारी. पुढारीपण – महंती – सुखाची नसते.

महंती सुखाची नाहीं । येथें दुख उदंड हीं ।

कल्याण हे त्या काळच्या समर्थांच्या एका विशिष्ट संघटनेंतील थोर पुढारी होऊन गेले. श्री समर्थांची ही संघटना अगदीं सुसूत्र आणि नियमबद्ध होती. श्रीसमर्थ-प्रतापाच्या प्रस्तावनेंत ती. नानासाहेब देव म्हणतात – " सांप्रदायिकांना त्यांनीं वर्तनाचे अनेक नियम घालून दिलेले होते. ते कोणाकडून उल्लंघिले जात च नसत. पण जर कदाचित् एकादे वेळीं एकाद्याच्या हातून कांहीं चुका झाली तर त्याला शासन होत असे. + + + स्वदेशांतील शिष्यांनीं तीन वर्षांत व परदेशांतील शिष्यांनीं अकरा वर्षांत निदान एकदां श्रीसमर्थदर्शनास आलें च पाहिजे असा दंडक होता." आपले लहान थोर अनुयायी – महंत – कसे वागत आहेत यावर समर्थांकडून मोठ्या कटाक्षानें देखरेख ठेवण्यांत येत असे. ही देखरेख ठेवणारांचा एक निराळा वर्ग च झाला असला पाहिजे. त्या वर्गाचे प्रमुख कल्याण च असले पाहिजेत हें न सांगतां हि लक्षांत येण्यासारखें आहे.

याविषयीं लिहितांना आपल्या आगामी " श्री समर्थसंप्रदाय " या समर्थ-चरित्रखंडांत ती. नानासाहेब देव म्हणतात :

" प्रांतोप्रांतीं संचारार्थ गेलेल्या शिष्यांची श्री समर्थ जशी चिंता करीत, त्याप्रमाणें ते शिष्य योग्य रीतीनें वागत आहेत कीं नाहींत, याची पाहाणी

करण्याकरितां हि ते कोणाकोणाची नेमणूक करीत असें दिसतें. हें काम बहुधा श्रीकल्याणस्वामीवर सोंपविण्यांत येत असे. श्री समर्थांच्या शिष्यमंडळींत एकटे कल्याणस्वामी च असे दिसतात कीं, ज्यांनीं सहसा कधीं आपल्याकडे श्री समर्थांचा बोल येऊं दिला नाहीं किंवा ज्यांना शिक्षा करावी लागली नाहीं. तेव्हां इतर शिष्यांवर देखरेख ठेवून श्री समर्थांना वृत्तांत निवेदन करण्याचें काम बहुधा त्यांच्यावर सोंपविण्यांत यावें हें स्वाभाविक होय.

" कल्याणदाता तो चातुर्यनिधी । निष्ठा जयाची श्रीगुरुपदीं ।
बोलाऊन तया दासदयाब्धी । प्रभुत्व विलोकूं आज्ञापिलें ॥ धाम ७४-९५
जे जे स्थळीं देव स्थापिलेती । पुण्यवंत जे स्थळीं करिती महंती ।
तेथील पाहोन दंडक रीती । बंदोबस्त कराया धाडिले ॥ ९६
सर्वज्ञ शिष्य तो विश्वासनिधी । गुरुदर्शनाहून शेवटावधी ।
तिळमात्र न चुकले सेवाविधी । कोप कीं शिक्षांत न गवसले ॥ ९७
वरकड शिष्य हि असती धन्य । परि प्रौढ न जाले शिक्षिल्याविण ।
अचुक न जाणती सेवाविधान । पुसती कल्याणा गुरुआज्ञे ॥ ९८ "

अशा या श्रीसमर्थांच्या संघटनेंत श्रीसमर्थांच्या खालोखाल कल्याणांचें स्थान आणि अधिकार असे.

उपमेनें हि मोठेपणाचें वर्णन करण्यांत येतें. कल्याणांची थोरवी अशी वर्णिलेली कल्याणस्तवनांत आढळून येते. त्या ठिकाणीं कल्याणांना भरत, लक्ष्मण, मारुति आणि शुक यांच्या उपमा देण्यांत आल्याचें वाचकांच्या लक्षांत आलें असेल च.

( १ )

श्रीरामदाससेवारत जो भरतावतार कल्याण ।
दुर्वार कामसिंव्हीं ज्या वीरें घातलें चि पल्याण ॥

( २ )

रघुपतिसी जसा होई लक्ष्मण, दासासि शिष्य कल्याण ।
सेवी तैसा, जेणें केलें स्वपदाप्त लोक कल्याण ॥

( ३ )

निस्पृहतेनें जैसा दिसे मारुती ।

× × ×

मारुती स्वरूप भासे । जिंकिले हें रिपु साही ।

× × ×

महारुद्र नामें हरी । तो चि होसी ब्रह्मचारी ॥

सारांश, मोरोपंतांना कल्याणामध्यें भरताचे गुण दिसले, आणखी कोणाला लक्ष्मणाचे गुण दिसले, तर लक्ष्मणशिवादि शिष्यांना कल्याण मारुतीस्वरूप भासले.

शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें ।

असें समर्थांचें यथार्थ वर्णन करण्यांत येतें. कल्याणांबद्दल आपल्या आरतींत लक्ष्मण नेमकें ते च म्हणतात :

विदेहीपणें पहातां शुकाची स्थिति ।

सारांश, याचा अर्थ असा होतो कीं, लक्ष्मण, भरत, मारुति, शुक या सर्वांचे गुण कल्याणांमध्ये होते.

कल्याणांचें शरीरसामर्थ्य हि अचाट होतें. समर्थांनीं च त्यांना एकदां " बलभीम " असें संबोधिलें होतें. एक एक शिष्य एक एका बगलेंत धरून ते खुशाल भरल्या पुरांत उड्या मारीत. सज्जनगडावर आज दाखविण्यांत येत असलेले कल्याणांचे ते दोन हंडे पाहून एकाद्या तालीमबाजाची हि छाती दडपून जात असेल. असे ते हंडे गडाच्या पायथ्याशीं असलेल्या उर्वशी नदीच्या पाण्यानें भरून घेऊन कल्याण रोज गडावर समर्थांच्या स्नानासाठीं कावडीनें नेत असत. यावरून कोणाला हि त्यांच्या शरीरसामर्थ्याची कल्पना येईल.

शरीरसामर्थ्य आणि बुद्धिमत्ता यांचें वावडें असतें असा एक समज आहे, आणि आजकालचे तालीमबाज आणि विद्वान यांच्याकडे पाहून हा समज खरा असावा, असें वाटूं लागतें. पण शरीर सामर्थ्याचें दैवत श्री हनुमान याचें वर्णन रामरक्षेंत " बुद्धिमतां वरिष्ठम् " असें करण्यांत आलें आहे. कल्याणांची हि तीच स्थिति. त्यांच्या अचाट शरीरसामर्थ्याप्रमाणें त्यांची बुद्धिमत्ता हि तशी च असली पाहिजे. हें आमचें केवळ अनुमान नव्हे. वर पृष्ठांक २४७ वर जें आत्माराम महाराजांचें पद देण्यांत आलें आहे, त्यांत त्यांनीं कल्याणांना " बुद्धिदाता " म्हटलें आहे. समर्थांनीं कल्याणांकडून घेतलेली कामगिरी आणि शेवटीं परंडा प्रांतीं त्यांना पाठवितांना श्रीसमर्थांनीं केलेली आज्ञा हीं पाहिलीं, म्हणजे कल्याणांच्या बुद्धिमत्ते-विषयीं समर्थांना वाटत असलेला विश्वास दिसून येतो.

कल्याणांची थोरवी पहातांना त्यांनीं दिवाकरांना लिहिलेलीं तीं दोन पत्रें विचारांत घेतलीं पाहिजेत. पैकीं एका पत्राचा उल्लेख पृष्ठांक २३४ – २३५ वर दिवाकर – उद्धव – वादांतील कल्याणांची भूमिका पहातांना आपण केला च आहे. त्या

पत्रांत कल्याणांचें अंतःकरण अगदीं स्वच्छ दिसून येत आहे. त्यांच्या अंतःकरणांत श्रीसमर्थकार्याव्यतिरिक्त दुसऱ्या कशाला स्थान नव्हतें. श्रीसमर्थांच्या धर्मस्थापनेच्या कार्यास अंतर पडणार नाहीं असें सर्व समर्थभक्तांनीं वागावें, असें त्या पत्रांत कल्याणांनीं म्हटलें आहे. श्रीसमर्थकार्याची इतकी चिंता श्रीसमर्थकल्याणांशिवाय दुसऱ्या कोणी वाहिली नाहीं.

दुसरें पत्र हि दिवाकर – उद्धव यांच्या वादाविषयीं च आहे. असें दिसतें कीं, उद्धवांबरोबर सुरु झालेल्या आपल्या वादाबाबत प्रमुख प्रमुख समर्थशिष्यांना पत्रें लिहून दिवाकरांनीं त्यांच्याकडून त्यांना असलेली माहिती मागविली होती. कल्याणांना आलेल्या दिवाकरांच्या अशा पत्राला त्यांनीं जें उत्तर पाठविलें तें हें दुसरें पत्र होय. हें अस्सल पत्र उपलब्ध नाहीं. सत्कार्योत्तेजक सभेला त्या पत्राची जुनी नकल मिळाली आणि त्या नकलेवरून सभेनें तें पत्र नववा भाग, "श्रीसांप्रदायाचीं कागदपत्रें" यांत, पृष्ठांक ८६–८८ वर, लेखांक ५० म्हणून छापलेलें आहे.

त्या पत्राच्या आरंभीं आपण राजदर्शनास गेल्याची हकिकत कल्याणांनीं दिलेली आहे. श्री समर्थ शिवतरीं होते आणि साताऱ्यास छत्रपतींना बहुत कठीण शरीरव्यथा झाल्याचें त्यांना समजलें. "तुझें नाम कल्याण आहे कल्याणार्थ प्रसाद घेऊन जाणे" अशी समर्थांनीं कल्याणांना आज्ञा करून त्यांच्याबरोबर शिवछत्रपतींना प्रसाद पाठविला. तों इकडे "राजश्री स स्वप्नसाक्षात्कार जाला की श्री कडून कल्याण गोसावी कल्याणार्थ प्रसाद घेऊन आले." म्हणून त्यांनीं दरवाजावर सेवक पाठविला तों कल्याण तेथें आले च होते. सेवकाकडून त्यांना साक्षात्काराची हकिकत कळली. ते तसे च राजदर्शनास गेले, राजांनीं "पलंगावरून उठोन उभे राहून पुढे येऊन वंदनपूर्वक प्रसाद घेतला आणि बोलिले कीं श्री चा प्रसाद कल्याण गोसावीयाबराबर आला आतां कल्याण आहे म्हणून त्रिवार बोलिले." समर्थांची आणखी कांहीं आज्ञा आहे कां म्हणून राजांनीं विचारलें, आणि कांहीं आज्ञासंकेत होता तो कल्याणांनीं निवेदिला.

या च सुमारास उंब्रज भागांत धावणी होऊन कांहीं गुरें वाळून आणिलीं होतीं, त्यांचें खिल्लार साताऱ्याचे दक्षिणभागीं सोनगांवीं ठेविलें होतें. त्यांत शिरगांवच्या अकरा गाई होत्या. हें वर्तमान कल्याणांनीं राजांना या भेटींत सांगितलें, आणि त्या गाई सोडवून घेतल्या.

परत आल्यावर राजांच्या भेटीची सर्व हकिकत कल्याणांनीं समर्थांना सांगितली, त्यांत अर्थात च आपण शिरगांवच्या गाई अशा अशा सोडवून घेतल्या हें हि सांगितलें. तें ऐकून समर्थ कल्याणांना म्हणाले, "तुम्ही निस्पृह हे प्रयोजन तुम्हास बोलिले नाही + + + आर्जव वृत्तीने मागणे निस्पृहाचा धर्म नव्हे." त्याच्या

आयुष्यांत कल्याणांना समर्थांकडून रागावून घेण्याचा हा एवढा च प्रसंग. हा अपवाद होय. पृष्ठांक २४८ वरील दासविश्रामधामांतील उतारा पहावा. लेशमात्र कां होईना, समर्थांकडून रागावून घेण्याचा स्वतःवर आलेला हा प्रसंग कल्याणांनीं आपण होऊन त्या पत्रांत नमूद केला, यावरून कल्याणांच्या अंतःकरणाचें निर्मलत्व दिसून येतें.

वर उल्लेखिलेल्या प्रसंगाचे वेळीं च तेवढे, म्हणजे आयुष्यांत एकदा च, कल्याण राजदर्शनास गेले होते, असें नाहीं. राजगृहाकडील कामें वगैरे दिवाकरांनीं करावीं अशी श्रीसमर्थांची आज्ञा शक १५९८ त झाली. वर म्हटल्याप्रमाणें कल्याणांना रागावतांना समर्थ असें हि म्हणाले होते कीं, "( तुम्ही ) निस्पृह व आणीक कोणी या प्रयोजनांत मन न घालणे ( शक्ति ) नसार भक्ती श्री ची करून सुखे असणे." दिवाकरांच्या पत्रांत ही सारी हकिकत देऊन कल्याण म्हणतात :

> " यावरून ( मी श्री ) चे कार्यभाग राजगृहास जाणे येणे करीत होतो ( ते या ) वरून सोडिले "

याचा अर्थ असा होतो कीं, शक १५९८ पर्यंत, किंबहुना शक १५९८ नंतर हि आणि शक १६०० त समर्थआज्ञेनें डोमगांवास रहावयास जाईपर्यंत समर्थांच्याकडून शिवछत्रपतींच्या दरबारीं जाण्यायेण्याचें सारें काम समर्थांच्या आज्ञेवरून कल्याण च करीत होते. समर्थांनीं कल्याणांकडे सोंपविलेली ही सेवा म्हणजे कामगिरी कल्याणांच्या थोरवीला आणि गुणांना समर्थांनीं दिलेलें शिफारसपत्र होय.

गडाखालीं उडून गेलेलें धोतर ( छाटी ) आणावयासाठीं गडावरून उडी मारून तें घेऊन येणाऱ्या कल्याणांना सुरक्षित आलेले पाहून श्रीसमर्थांनीं काढलेले " श्री राम च पावला म्हणावयाचा " हे उद्गार, त्या रात्रीं विड्याचीं पानें आणावयास जातांना कल्याणांना झालेल्या सर्पदंशाचे प्रसंगीं समर्थांनीं भैरवाला केलेला नवस, आणि तो नवस करितांना

> विश्रांति मज बहु याचेनि सखया । सेवक न देखों ऐसा दुजा ।

हे समर्थांनीं काढलेले उद्गार, या साऱ्यावरून कल्याणांकडे पहाण्याची समर्थांची दृष्टि उघड होते, आणि कल्याणांची थोरवी श्री समर्थ जाणून होते हें दिसून येतें.

श्री समर्थांच्या संघटनेत समर्थांच्या खालोखाल कल्याणांचें स्थान आणि अधिकार होता, असें आपण वर म्हटलें च आहे. त्याला प्रत्यंतर पुरावा म्हणून एक गोष्ट नमूद करावीशी वाटते. आपल्या तीर्थाटणांत हिमालयांत हिंडत असतांना एकदां समर्थांनीं आपला देह हिमालयकुंडांत झोकून दिला, तों श्री रामचंद्रांनीं त्यांना वरच्यावर धरिलें. " काय प्रयोजन या देहाचें " असें म्हणून समर्थ आपल्या समर्थांवर रागावले, तेव्हां रामचंद्र म्हणाले —

तुम्हासी जगोद्धार करणें आहे । तुमची तनु ते आमुची तनु पाहे ।
दोनि तपें तुमची रक्षिली काया हे । धर्मस्थापनेकारणे ॥

आणि कल्याणांना डोमगांवास पाठवितांना समर्थांनीं

जगदोद्धार करा जा हो आज्ञा कल्याणा केली ॥

समर्थांचा अवतार जगोद्धारासाठीं च होता. तें च आपलें अवतारकार्य पुढें चालू ठेवण्याची आज्ञा समर्थांनीं कल्याणांना केली. आपल्या दुसऱ्या कोणा शिष्याला अशी आज्ञा समर्थांनीं केल्याचें आठवत नाहीं. आपल्या पश्चात् आपल्या कार्याची धुरा कल्याण च वाहूं शकतील अशी च समर्थांची खात्री होती आणि त्या च दृष्टीनें ते त्यांच्याकडे पहात होते हे उघड आहे.

सारांश, श्रीसमर्थशिष्य कल्याण, आपले कल्याण, हे असे होते.

## ( ९ ) कल्याणांचें निर्याण

" श्री समर्थांच्या आज्ञेनें कल्याण महाराज डोमगांवीं रहावयास गेले होते. एका प्रसंगीं पर्यटणांत उभयतां बरोबर असतां 'तुम्ही येथें वास्तव्य करावें' अशी समर्थांची कल्याणांना आज्ञा झाली होती. त्या संकेतानुरूप शक १६०० च्या सुमारास कल्याण डोमगांवीं रहावयास गेले असावेत. "* या संकेताप्रमाणें कल्याण डोमगांवास रहावयास गेले कीं, कल्याणांना परंडाप्रांतीं महंती करावयास पाठविण्याला श्री समर्थांना दुसरें कांहीं कारण घडलें ? आमच्या मनांत असें येऊन जातें कीं, शक १६०० म्हणजे इ. स. १६७८ च्या सुमारास श्री शिवछत्रपतींच्या कांहीं हालचाली त्या भागांत सुरु झाल्या असाव्यात, किंवा लवकर च सुरु व्हावयाच्या असाव्यात, आणि तेवढ्यासाठीं समर्थांनीं कल्याणांना त्या भागांत रवाना केले असावें. हें आमचें अनुमान हि नाहीं, केवळ मनांत आलेला एक विचार आहे. या दृष्टीनें शिवचरित्रांत शोध घेण्यास आम्हांस सवड झाली नाहीं. म्हणून मनांत आलेला हा विचार, पुढें मागें दृष्टिआड होऊन विसरला जाऊं नये आणि शक्य तर कोणाला हि या दृष्टीनें शोध घेतां यावा म्हणून, येथें नमूद करून ठेवला आहे इतकें च.

कल्याण डोमगांवास गेले तेव्हां त्यांच्याबरोबर कोणकोण गेले, समर्थांनीं त्यांच्याबरोबर द्रव्याचे दशसहस्र भाग दिले होते, वगैरे हकिकत श्रीसमर्थ-चरित्रांतून दिलेली कोठें कोठें आढळते. कल्याणस्तवनांत पृष्ठांक १२९–१३० वर दिलेल्या श्री कल्याणचरित्रामध्यें कल्याणांनीं डोमगांवास गेल्यावर सुरु केलेल्या व्यापाचें किंचित् वर्णन आलेलें आहे.

---

* देवांचे " श्री रामदासी संशोधन " – प्रथम खंड, पृष्ठांक ९७

मुसांडि निघे झुंडि त्या निस्पृहाची । वयें द्वादशा षोडशा विंशताची ।
रुपें नेटके घेति कल्याण दिक्षा । सदा मागती पिष्ट ते मुष्टिभिक्षा ॥ १५
सदा वाळवंटीं कथेचीं घमंडें । सुखें ऐकती धांवती मुंडमुंडें ।
यती भूपती येति अष्टा दिशांचे । स्वयें लोक ते सेवकातुल्य साचे ॥ १६
बहूसाल संतर्पणें ब्राह्मणांचीं । प्रबोधून अध्यात्म ऊपासकाची ।
बहू लोक तो रंगला सज्ज साजे । जगीं राम ऊपासना घोष गाजे ॥ १७

श्रीसमर्थांच्या शिकवणींत तरबेज झालेल्या, व आपल्या आयुष्यांतील २७ ते ६० हा ३३ वर्षांचा महत्त्वाचा काळ समर्थांच्या सहवासांत घालविलेल्या, समर्थांच्या कल्याणांनीं डोमगांवास गेल्यानंतरचीं आपल्या आयुष्याचीं राहिलेलीं ३६ वर्षे कशीं घालविलीं असतील याची कांहींशी कल्पना यावरून होते.

" कल्याणस्वामी चार महिने परंड्यास, चार महिने डोमगांवीं कड्यावर व चार महिने डोणजे येथें देवीचें देवळांत रहात असत; त्यांचें देहावसान परंड्यास झालें, तेथून वाजत गाजत देशमुखांनीं त्यांना डोमगांवीं आणलें व हल्लीं समाधी आहे तेथें दहन केलें, " अशी परंपरा आहे. ( पहा : परिशिष्ट पृष्ठांक ९ )

श्री समर्थांच्या आज्ञेवरून कल्याण डोमगांवास गेल्यानंतर " श्री सद्गुरुंच्या सगुण रुपाचें दर्शन कल्याणांना पुन्हां व्हावयाचें नव्हतें. १६०३ च्या माघ वद्य ९ स श्री समर्थांनीं अवतार संपूर्ण केला. पुढें कल्याणस्वामी प्रतिवर्षी परळीस जात, पण वर गडावर जात नसत. सर्व च सज्जनगड त्यांना गुरुरूप भासे ! " ( परिशिष्ट पृष्ठांक १५ )

श्री कल्याणांच्या गुरुनिष्ठेला इतिहासांत तोड नाहीं. त्यांच्या अशा अतुलनीय गुरुनिष्ठेला साजेसाच त्यांचा निर्याणाचा प्रसंग आहे.

ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें । २-४१
सांगायासी ऐकायासी गोष्टी जाली । ४२

अशा अपूर्व आणि नवलाईच्या निदान दोन तरी गोष्टी श्री समर्थांच्या आहेत, त्याच तोडीचा, तितक्याच नवलाईचा, आणि तसा च अपूर्व कल्याणांच्या निर्याणाचा प्रसंग होय. ती हकिकत ती. नानासाहेबांच्या च शब्दांत देतो : ( पहा – श्रीरामदासी संशोधन, प्रथम खंड, पृष्ठांक ९७ ).

" श्रीसमर्थांच्या ठिकाणीं कल्याणांचा निष्ठा अतुलनीय होती. कोणा हि एकनिष्ठ शिष्याला, भक्ताला किंवा अनुयायियाला उपमा द्यावयाची तर कल्याणांची देतात. तशी च त्यांची श्रीसमर्थचरणीं निष्ठा होती ! श्रीसमर्थांची आज्ञा झाली म्हणून स्वतः पुढच्या बाजूस बसून मागच्या बाजूस झाडाची फांदी तोडल्यामुळें

जे विहीरींत पतन पावले, त्या कल्याणांनीं श्री समर्थांना च आपले प्राण मानले होते, हें उघड आहे. श्री समर्थांनीं हि कल्याणांच्या एकनिष्ठेची स्वतः अनेकदां परीक्षा पाहिली होती व इतरांस साक्ष पटविली होती. या गुरुशिष्यांच्या एकरूपत्वाची परमावधी त्या शेवटच्या प्रसंगानें झाली. वाचकांस ठाऊक च आहे कीं, निर्याणानंतर श्रीसमर्थांच्या अस्थि चाफळास वृंदावनांत नेऊन ठेवल्या होत्या व त्या गंगेंत नेऊन टाकण्याविषयीं कल्याणांचे शिष्य उंब्रजमठपति केशवस्वामी कल्याणांची वारंवार परवानगी मागत व ' पुढें पाहूं ' म्हणून दर खेपेस कल्याण लांबणीवर टाकीत. अखेरीस आतां परवानगी मिळेल च या भरंवशानें १६३६*च्या ( अधिक ) आषाढ शु. १३ ला केशवांनीं अस्थि काढल्या व मार्गांत डोमगांवीं कल्याणांना भेटून पुढें जाऊं म्हणून त्या अस्थि बरोबर घेऊन ते महायात्रेस निघाले. महदाश्चर्य असें कीं, ज्या क्षणीं तिकडे चाफळास श्री समर्थांच्या अस्थि वृंदावनाच्या बाहेर काढण्यांत आल्या, त्या च क्षणीं इकडे डोमगांवीं कल्याणांनीं आपला देह ठेवला ! केशवस्वामी अस्थि घेऊन डोमगांवीं पोचले. त्यांना हें वृत्त कळलें. पश्चात्ताप झाला ! म्हणून च ' पुढें पाहूं ' असें महाराज वारंवार म्हणत असत, पण आपण न विचारतां हें काय केलें, म्हणून त्यांना अतोनात दुःख झालें. योगायोग च तसा होता. काय योग म्हणावा पहा, नंतर डोमगांवाहून उभयतांच्या अस्थि एकत्र होऊन पुढें गंगेस जाऊन मिळाल्या ! ही कथा च इतकी अपूर्व आहे कीं, हल्लींच्या काळीं तिच्या खरेपणाविषयीं एकाद्यानें शंका घ्यावी. पण हा घडलेला इतिहास आहे आणि तो निष्ठावंतांना अखंड प्रोत्साहन देत राहील. श्री दासविश्रामधामकर्त्यांनीं म्हणून च या गुरुशिष्यपणाची धन्यता गायिली आहे :

धन्य धन्य हें गुरुशिष्यपण । धन्य धन्य हें सेवाविधान ।
धन्य धन्य हें अभेद लक्षण । धन्य धन्य लीळा अगाध ॥ ११६-१५२"

## ( १० ) कल्याणांची समाधी

श्री कल्याणांचें "देहावसान परळ्यास झालें, तेथून वाजत गाजत देशमुखांनीं त्यांना डोमगांवीं आणलें व हल्लीं समाधी आहे तेथें दहन केलें." त्या समाधीपर्यंत आपण येऊन पोहोंचलों. आपला कार्यभाग संपत आला, येथून पुढें आपली सारी चिंता त्यांना लागणार आहे.

साधक भावें नमस्कार घाली । त्याची चिंता साधूस लागली ।
सुगमपंथें नेऊन घाली । जेथील तेथें ॥

* श्री समर्थांचा समाधीशक १६०३, पण १६०५ ची हि नोंद कोठें कोठें आढळते. कल्याणांचा समाधीशक १६३६, पण एका बाडांत तो १६३५ असा हि दिलेला आहे. पहा – पुण्यतिथींचे श्लोक, पृष्ठांक १५७.

तेवढा एक च नमस्कार आपण आतां घालावयाचा आहे.

श्री कल्याणांच्या समाधीला नमस्कार करितांना खालील पांच श्लोक म्हणण्याचा परिपाठ आहे. ती परंपरा आपणांस कशी तोडतां येईल ? तेव्हां

कल्याणाचें नाम कल्याणकारी । कल्याणाचें ध्यान सर्वांस तारी ।
कल्याणाचा हस्त माथा जयाचे । ध्यान्ही मुक्ती वंदिती पाय त्याचे ॥ १

कल्याण होणें जरि तूज आहे । कल्याणपायीं मन स्थीर राहे ।
कल्याणवाणी पडतां सुकानीं । कल्याण जाले बहुसाल प्राणी ॥ १

अविनाश हें नाम कल्याण ज्याचें । करी सर्व कल्याण सर्वां जिवांचें ।
समर्थे जना ऊतरायासि पारीं । अशी ठेविली मूर्ति कल्याणकारी ॥ २

श्रमहारिणीतटाकीं स्वामि कल्याण राजा ।
परम दिनदयाळु नांदतो स्वामि माझा ।
सदय हृदय ज्याचें ध्यान हें आठवीतां ।
परम सफळ येतो मोक्ष कल्याण हातां ॥ ३

बहु मत्तमत्तांतरें दाटि जाली । तयाचे पदीं वृत्ति निवृत्ति ठेली ।
जगज्जीवनाचा प्रभु जो अनामी । नमस्कार माझा श्री कल्याणस्वामी ॥ ४

हे श्लोक म्हणत म्हणत श्री कल्याणांच्या चरणीं नम्रपणें लोटांगण घालून आपण निश्चिंत होऊं या.



## ( ४ )

## महाराष्ट्र – वाचकांच्या सेवेसी

### ( १ ) आला ग्रंथाचा शेवट

काम संपत आलें, तें हातावेगळें होतांना कष्ट वाटतात. यांत एक प्रकारचा आनंद आणि सुख इतके दिवस लाभल्यानें आतां मन थोडेंसें चलित होतें. या साऱ्या कामाचें एक प्रकारचें वेड लागतें असें इतरांनीं काढलेले उद्‌गार ऐकून आणि वाचून, थोडें मोकळेपणानें बोलावयाचें तर, आम्हांला वाटे कीं, हे काय असें वेड्यासारखे म्हणतात. पण आतां आलेल्या अनुभवामुळें असें म्हणणें आवश्यक आहे कीं, त्यांना वेडे म्हणणारे आम्ही च वेडे होतों.

## ( २ ) संपादनांतील दोष

हे दोष अनेक आहेत; कांहीं तर आमचे आम्हांला स्पष्ट दिसत आहेत. कल्याणविषयक सर्व कांहीं या ग्रंथांत आलें च आहे, असें नाहीं. वाचकांनीं क्षमा करावी.

ऐसी कथा सांगितली । चुकत वाकत आठवली ।
न्यून ती पूर्ण केली । पाहिजे श्रोतीं ॥

तेव्हां या दृष्टीनें आपलेपणानें कोणी कांहीं सुचना केल्यास आम्हांला आभार वाटतील. त्या सुचनांचा उपयोग पुढील आवृत्तीच्या वेळीं करतां येईल.

## ( ३ ) प्रार्थना

शेवटीं प्रार्थना. कोणाची ? श्री रामाची, श्री समर्थांची, आणि तुम्हां श्रोत्यांची – वाचकांची. या ग्रंथाच्या " श्री कल्याणकवन " या पहिल्या भागाच्या शेवटीं कल्याणांनीं केलेल्या तीन प्रार्थना देण्यांत आल्या आहेत. " दासा कल्याण करी " अशी कल्याणांनीं श्री रामाची प्रार्थना केली आहे, आपला अंगीकार करावा म्हणून त्यांनीं श्री समर्थांना आळविलें आहे, आणि तुम्हां श्रोत्यांना आणि वाचकांना

" माझ्या स्वामीचे शब्द परिसावे "

म्हणून विनविलें आहे. या च तीन प्रार्थना आम्ही हि करितों. या तिन्हीं प्रार्थनांत सारें कांहीं आलें आहे. आणखी निराळें असें कोणाजवळ आणि काय मागावयाचें रहातें ?

" माझ्या स्वामीचे शब्द ! " माझ्या स्वामींचे, तुमच्या आमच्या स्वामींचे, सर्वांच्या स्वामींचे, महाराष्ट्राच्या राष्ट्रगुरु श्री समर्थांचे हे शब्द कोणते, याचा आपण सर्वांनीं विचार केला पाहिजे ही आज मनांत स्फुरलेली इच्छा कल्याण-स्मरणपूर्वक श्री समर्थवाग्देवतेच्या चरणीं विदित करून

श्री समर्थशिष्य कल्याण

हा ग्रंथ महाराष्ट्र – वाचकांच्या सेवेसी नम्रतापूर्वक सादर करितों.

| | |
|---|---|
| १८६७ श० ज्येष्ठ शुद्ध १०<br>ता. २१ मे १९४५ | गणेश शंकर देव |



# परिशिष्टें

( १ ) श्री समर्थ आणि कल्याण यांचीं प्रश्नोत्तरें
( २ ) डोमगांव मठांतील कल्याणांच्या हातची
दासबोधाची प्रत
( ३ ) डोमगांव
( ४ ) श्री कल्याणस्वामींची आज च पुण्यतिथी
( ५ ) श्री समर्थशिष्यवर कल्याणस्वामी-मठ डोमगांव
( ६ ) श्री कल्याणस्वामींचे महंत
( ७ ) श्री कल्याणकृत संतमाळा
( ८ ) भालगांव व डोमगांव मठांचा संबंध

## परिशिष्ट पहिलें

### श्री समर्थ आणि कल्याण यांचीं प्रश्नोत्तरें

बाडांक २६२ च्या पृष्ठांक ३१ पासून जे " श्रीरामदास अभंग " दिले आहेत, त्यांत खालील अभंग दुसरा, तिसरा आणि चवथा असे आहेत.

( २ )

ऐक बा कल्याणा हितउपदेश । प्राप्त जालें रहस्य जें कां तूज ॥ १
तेथें राही सदा न करी तत्वबोधा । जनाचिया वादा न प्रवर्ते ॥ २
श्रद्धावानपात्र जे भेटती तुज । त्यांसी सांग गुज श्रीरामाचें[1] ॥ ३
देहआत्मवादी जे शाब्दीक ज्ञानी । तयाचिये कानीं स्वप्नीं नको ॥ ४
नको त्या दुष्टासी स्वप्नीं सांगूं गोष्टी । पडेल तुझी तुटी श्रीरामाशीं ॥ ५
श्रीरामासी तुज न हो वेगळीक । मौनावें[2] स्वसुख योगस्थिती[3] ॥ ६
योगस्थिती[3] आतां गुप्त आहे बापा । नको सांगूं अल्पा देहबुद्धीते ॥ ७
देहबुद्धीचे प्राणी त्याशी भाषण न करी । वार्‍यां [4] वैखरी वेंचूं नको ॥ ८
निमिष्यभरि होऊं नको स्वरूपावेगळा । अंतरैशील[5] रामाला जनायोगें ॥ ९
अनुभवी संताशी करी बा संवादूं[6] । रामदासी[7] बोधूं कल्याणाते ॥ १०

( ३ )

सांग बा कल्याणा तुझी स्थिती मज आता ।
कोण्या योगें कोण्या पंथें ऐक्य रघुनाथा ॥ ध्रु० ॥
उपदेशिलें ज्ञान तें तुझें अंतरीं आलें ।
भेदबुद्धी सर्व हि गेली संशय मावळले ।
देहस्मृतीचा लोप जाला कोण मी कळलें ।
ऐसा प्रत्यय जाला कीं नाहीं सांग ये वेळे ॥ १

---

(१) श्रीरामाची – २०७ (२) या नांवे – २०७ (३) आत्मस्थिती – २०७ (४) हे – २०७ (५) अंतरसी – २०७ (६) संवाद – २०७ (७) रामदासबोध – २०७

स्वप्नअवस्था निरसुनि बोध जागृती जाले कीं ।
भजन मुद्रा भक्ती कळा निज वोळखिलें कीं ।
सद्गुरुमहिमा ऐसे जाणुनि सुरती भोगिले कीं ।
मोहो जाउन निस्मृती प्रतिती बाणली कीं ॥ २
वृत्ति निश्चळ होती किंवा चंचळ हे जाली ।
पाहुनि स्वरुपालागी तटस्त होऊनि का इतुक्यामाजी
येक प्रत्यय सांग ये वेळीं ॥ ३
तूं देह आहे कीं आत्मा होय कोण मज सांग ।
बद्धमुक्त कोण कोणा वासनेचा भोग ।
कैशी स्थिती पाउनी सेविसी श्रीरंग ।
रामदासीं प्रश्न केला निज अभंग ॥ ४

(४)*

सुखरूप जालों स्वामी तुमचिया पादसेवे ।
कल्याण माझें जालें रंगलों सोहंभावें ॥ ध्रु० ॥
चित्त हे वृत्ती माझी चैतन्यीं मुराली ।
संतोष स्वात्मसुख अनुभव किल्ली दिल्ही ।
निर्विकल्पीं वास जाला अनुभव बोलूं बोली ।
विश्व हें नाहीं अवघें श्रीरामस्वरूप पाही ॥ १ ॥
कनक हें पूर्णपणीं नगास ठाव कोठें ।
चैतन्य मृत्तिका ऐसी वाया हे घटमठे ।
नाहीं हा दृश्यभास अनुभव ऐसा स्पष्ट ।
पूर्ण ब्रह्म सनातन सद्गुरु येकनिष्ट ॥ २
पावलों धालो देवा तुझिया सेवाबळें ।
वेदांतश्रुति ज्यासी निर्विकल्प बोलती बोलें ।

* हे पद इतर बाडांत स्वतंत्रपणें दिलें आहे. पृष्ठांक १०५ वरील ६ वें पद पहा. परंतु त्या सर्व बाडांतून या पदाचें दुसरें कडवें नाहीं.

ते मी स्वयंभ जालो हे शब्द मावळले ।
मीतूंपण अवघे स्वामी गिळुनी उगळे ठेले ॥ ३

रामाविण वृत्ति माझी आणिक न जाये कोठें ।
जिकडे तिकडे पाहे श्रीराम माझा भेटे ।
कल्याण म्हणे सकळ द्वैतपण जेथें आटे ।
रामदासस्वामी जयीं आनंदघन भेटे ॥ ४



## परिशिष्ट दुसरें

## डोमगांव मठांतील
## कल्याणांच्या हातची दासबोधाची प्रत

[ त्या मूळ प्रतीबरहुकूम प्रत करवून ती ती. नानासाहेबांनीं श्री समर्थ-वाग्देवतामंदिरांत ठेवली आहे. त्या प्रतीच्या शेवटीं ती. नानासाहेबांनीं जोडलेलें टांचण पुढें दिलें आहे. — संपादक ]



### श्री रामसमर्थ

डोमगांव येथें मठांत श्रीकल्याणस्वामींच्या हातची म्हणून श्रीमत् ग्रंथराज दासबोधाची जी मूळ प्रत आहे तिच्यावरून तंतोतंत केलेली जगांत एकादी प्रत असावी, असें मनांत आलें, म्हणून तिच्यावरून ही जशीच्या तशी प्रत केली आहे.

तींतील दशक १ ला व २० वा असे दोन दशक स्वहस्तें उतरले, दशक २, ३, ४, ५, ६ असे पांच दशक गणेश शंकर देव यांनीं उतरले, द. ७, ८, ९, १०, ११, व दशक १६, १७, १८, १९ मिळून नऊ दशक विष्णु सीताराम रणदिवे यांनीं उतरले, दशक १२, १३ रामचंद्र त्रिंबक देव यांनीं उतरले, दशक १४ वा रामचंद्र त्रिंबक देव यांनीं आरंभिला व दत्तात्रय त्रिंबक देव यांनीं तो पुरा करून १५ वा द. उतरला.

पुन्हां द. १ व २० मुळावरून विष्णु सीताराम रणदिवे यांनीं तपासले, द.२ विनायक शंकर देव यानें तपासला, द. ३, ४ महादेव वासुदेव शिदोरे व द. ५, ६ नरहर वासुदेव शिदोरे यांनीं तपासले आणि द. ७ ते १९ मी तपासले.

लिहितांना आणि तपासतांना माझ्या असें निदर्शनास आलें कीं, मूळ प्रतींत दोघांच्या हातचें लेखन आहे.

| एक तऱ्हा | दुसरी तऱ्हा |
|---|---|
| * | * |
| ख | भ्र |
| * | * |
| * | * |
| क्ष | ञ |

* हे प्रकार छापण्यास तशा टाइपाच्या अभावीं अडचण पडते. ते मूळांतून च पाहिले पाहिजेत.

| | |
|---|---|
| * | * |
| शीष्य | शीश |
| * | * |
| श्रीराम | श्रीरामसमर्थ |
| * | * |
| शब्द | शद्ब |
| * | * |
| *, र | र |
| ण | ण |

इत्यादि. द. १ ते १३ पर्यंत पहिल्या तऱ्हेचें लेखन आहे, द. १४ त दोन्ही तऱ्हा, द. १५ त पहिली तऱ्हा, द. १६ त सबंध दुसरी तऱ्हा, द. १७ त पहिली तऱ्हा, द. १८, १९ सबंध दुसरी तऱ्हा आणि द. २० चे पहिले पांच समास पहिल्या तऱ्हेचें व शेवटचे पांच समास दुसऱ्या तऱ्हेचे. हे दोघे कोण व त्यांत कल्याणांचा हस्त कोणता हें सवडीनें ठरवावयाचें आहे.

तिसऱ्या दशकाचें शेवटचें पृष्ठ निराळें नंतर घातलेलें दिसतें. वरील दोन्हीं तऱ्हा हटकून न मानतां बहुधा आहेत, असें मानावें. बाराव्या दशकाच्या आरंभीं " श्रीरामसमर्थ " आहे, पण तें लेखन पहिल्या तऱ्हेचें च होय. दशक १४, समास ८ ओवी ३३ पासून दुसरी तऱ्हा दिसते.

सोळाव्याच्या पांचव्या समासाचे आरंभीं श्रीराम किंवा श्रीरामसमर्थ नाहीं.

मूळ प्रतीच्या दशकांची पत्रसंख्या ३३, ४६, ५६, ३२, ५४, ४०, ५२, ५९, ३८, ३४, ३०, २५, २६, ३५, ३०, २८, २५, २७, २७, २७ याप्रमाणें आहे.

श्रीसमर्थवाग्देवतामंदिराचें उद्घाटन १८५७ ज्येष्ठ शुद्ध १३ शुक्रवार रोजीं श्रीमंत सौ. मा. महाराणी इंदिराबाई साहेब होळकर यांच्या हस्तें सायंकाळीं ६ चे सुमारास श्रीसमर्थकृपें झालें. त्या शुभ प्रसंगीं ही प्रत रक्षणार्थ व बंधुभगिनींच्या उपयोगार्थ

श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं भक्तिप्रेमपूर्वक अर्पण केली असे.

श्रीसमर्थचरणकिंकर

**शंकर श्रीकृष्ण देव**



* मागील पृष्ठावरील टीप पहावी.

( ३ )

## परिशिष्ट तिसरें

### डोमगांव*

पौष शु. ३ शके १८२५

निज वचनें वटशाखा तोडुनि जो शिष्य पावला पतन ।
तो कल्याण चि केला जीवनदानें करूनियां जतन ॥ मोरोपंत

हा कल्याणस्वामींचा मठ होय. श्री समर्थांच्या महंतांत कल्याणस्वामींची योग्यता विशेष आहे आणि म्हणून जांब, चाफळ व सज्जनगड या तीन क्षेत्रांनंतर या मठाचें महत्त्व सांप्रदायास फार आहे. या मठांत श्रीसमर्थांचें हस्ताक्षर आहे। समर्थांनीं स्वहस्तें कल्याणस्वामींस लिहून दिलेला कित्ता या मठांत आहे. 'त्या कित्त्यांत सोन्याच्या शाईचीं अक्षरें असून बाळबोध लिपि आहे व ती देववाणी असून तिचा अर्थ स्वामी व कल्याण या दोघांस च ठाऊक होता' असें या कित्त्याविषयीं हनुमंतस्वामी लिहितात. या कित्त्यासंबंधानें आपण सविस्तरपणें पुढें केव्हां तरी लिहूं. कल्याणस्वामींनीं स्वहस्तानें लिहिलेली व श्रीसमर्थांनीं स्वतः शोधलेली दासबोधाची मूळ पोथी या च मठांत आहे. सभेनें प्रसिद्ध केलेला दासबोध तिच्याचवरून छापविलेला आहे. सत्कार्योत्तेजक सभेवर या मठाचे अनंत उपकार आहेत. प्रस्तुतचा खंड कल्याणस्वामींनीं लिहिलेल्या बाडावरून च छापविला आहे. कल्याणस्वामींचे शिष्य उंब्रज मठपति केशवस्वामी यांनीं शके १६२० त लिहिलेली दासबोधाची सोनेरी रुपेरी पोथी या च मठांत आहे. या पोथीचा कागद जांभळा असून पातळ आहे. श्रीमत् दासबोधाबद्दल समर्थशिष्य व प्रशिष्य यांना किती आदर होता हें पहावयाची इच्छा असल्यास ही पोथी पहावी. या पोथीचा शेवट असा आहेः—

" लेखन समाप्त गतकळी ४७९५ चारि सहस्र सातसे पंच्यानौ संवत्छर बहुधान्य नाम माघ शु॥ प्रतिपदा ॥

स्वर्गमृत्य पाताळीचे देह तिन्ही । त्यासी सजीवता जयाचेनी ।
त्याच्या अनुज्या जीवदानी । त्याचे दिनी समाप्तसिद्धी ॥ १ ॥

लेखन हस्ताक्षर ॥ श्रीरामदासांकित कल्याणस्वामींचा किंकर ॥ कर्जत नाम पुर तेथें लेखन केले ॥

---

* शक १८२० च्या विजया दशमीला प्रसिद्ध झालेल्या, श्री रामदास आणि रामदासी ग्रंथमालेंतील तिसरा भाग " श्री रामदासांची कविता – प्रथम खंड " या ग्रंथाला देवांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेंतील " श्री समर्थांचे मठ " या प्रकरणावरून

सकळ कर्मांचा आरंभि । चोविसामाजी मूळारंभी ।
ते नाम वसे देहसंगीं । तेणें लेखन केलें ॥ ”

गतकलि ४७९५ म्हणजे शक १६१६. परंतु शके १६१६ ला बहुधान्य संवत्सर नव्हता व माघ शु. १ चा लोप होता. बहुधान्य संवत्सराला गतकलि ४७९९ म्हणजे शके १६२० पाहिजे. बहुधा गतकलि देण्यांत केशवस्वामींची चुकी झाली असावी. शके १६२० च्या माघ शु. १ ला रविवार होता. शनीचा धाकटा भाऊ रवी. तेव्हां ह्या पोथीचें लेखन शके १६२० माघ शु. १ स रविवारीं, संध्येंतील चोवीस नांवांपैकीं पहिलें नांव जें केशव, त्या केशवस्वामींनीं कर्जत मुक्कामीं समाप्त केलें; असो. शक १५८१ पासून तों शक १७०४ पर्यंतच्या काळांत लिहिलेल्या दासबोधाच्या दहा पांच तरी पोथ्या या गांवीं आहेत. कल्याणस्वामींच्या अंगावरील तांबड्या रंगाच्या बनातीचा तुकडा व तशाच तऱ्हेच्या कापडाची श्री समर्थांची एक जीर्ण चंची, समर्थांच्या पादुका, समर्थांनीं कल्याणस्वामींस दिलेल्या राम, लक्ष्मण, सीता व मारुति यांच्या मूर्ति या मठांत आहेत.

मठापासून पाव कोसाच्या अंतरावर सीना नदीचे कांठीं एका कड्यावर कल्याणस्वामी रहात होते असें सांगतात. त्या ठिकाणीं हल्लीं घर वगैरे कांहीं नाहीं. परंतु इमारतीचा पाया दिसत आहे. तेथें एक गणपतीची दगडाची मूर्ति बेफिकीरपणें आडवी पडली होती, ती आम्ही उभी केली. तिची तेथें कोणी तरी स्थापना केली पाहिजे. त्या ठिकाणीं नदीचा कांठ उंच कड्यासारखा आहे. कड्याच्या मध्यभागीं अवघड जागीं नरसोबाची मूर्ति आहे. कांठ पाण्यानें ढांसळून गेल्यामुळें तेथवर जाणें आतां दुर्घट झालें आहे.

कल्याणस्वामी चार महिने परंड्यास, चार महिने डोमगांवीं कड्यावर व चार महिने डोणजे येथे देवीचे देवळांत रहात असत; त्यांचें देहावसान परंड्यास झालें, तेथून वाजत गाजत देशमुखांनीं त्यांना डोमगांवीं आणलें व हल्लीं समाधी आहे तेथें दहन केलें, असें परंपरेनें श्रवण केल्याचें कै. अंबादास महाराज सांगत होते.

समाधीचें मंदीर भव्य व रम्य आहे. समर्थसमाधीच्या खालोखाल असें हें च काम आहे. खुद्द मंदिराच्या दरवाज्यावर खालील मजकूर कोरलेला आहे.

◡ ॥ श्रीराम ॥ *
श्रीरामदासस्वामी ॥ कल्याणाचें नाम
कल्याणकारी ॥ कल्याणाचें ध्यान
सर्वांस तारी ॥ कल्याणाचा हस्त

माथा जयाचे ॥ त्याच्ही मुक्ती
वंदिती पाये त्याचे ॥ १
शके १६९५ श्री

कल्याणस्वामींनीं शके १६३६ त समाधी घतली व नंतर ५९ वर्षांनीं मंदिराचें काम झालें असें यावरून दिसतें.

खुद्द समाधीच्या शिलेवर शंकराची पिंडी असून पादुका आहेत. वर व चारी बाजूंना अक्षरें कोरलेलीं आहेत, पण आज २०६ वर्षे समाधीवर प्रत्यहीं अभिषेक होत असल्यामुळें अक्षरें आतां सर्व लागत नाहीत. तथापि चाफळमठांतील एका बाडांत त्यांचा उल्लेख सांपडतो, त्यावरून पुढील माहिती येथें नमूद करितों.

समाधीच्या वर पादुकांच्या डाव्या बाजूला मजकूर आहे तो असाः—

श्रीरामदासा कल्याण व्हावें ।
अती सौख्य व्हावें आनंद व्हावें ।
उद्वेग नासो वरि शत्रु नासो ।
नाना विळासें मग तो विळासो ॥ १
श्री कल्याणस्वामी

पादुकांच्या उजव्या बाजूला मजकूर आहे तोः—

कश्यप अत्रि भरद्वाज विश्वामित्र गौतम जमदग्नि वशिष्ठ
ध्यानमूलं गुरोर्मूर्तिः । पुजामूलं गुरोः पदं ।
मंत्रमूलं गुरोर्वाक्यं । मोक्षमूलं गुरोः कृपा ॥

पूर्व बाजूला भगवद्गीतेतील नवव्या अध्यायाचा २७ वा श्लोक आहे तोः—

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥

पश्चिम बाजूला गीतेतील शेवटचा श्लोक आहे तोः—

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥

दक्षिण बाजूला श्लोक आहे तोः—

काशीक्षेत्रनिवासश्च जान्हवीचरणोदकं ।
गुरुर्विश्वेश्वरः साक्षात्तारकं ब्रह्म निश्चितम् ॥

उत्तर बाजूला आहे तोः—

ब्रह्म अनादि तथा विष्णुर्ब्रह्मा वशिष्ठः श्रीरामः इति ।

मारुतिं रामदासं च कल्याणं गुरुं स्वामिनं इति ।

कल्याणस्वामींच्या समाधीमंदिरापुढें मुधोबावा ऊर्फ मुद्गलस्वामी यांच्या समाधीचें मंदिर आहे. तेथें समाधीची शिला नसून दास मारुति उभा आहे. भिवाजीस्वामी, महारुद्रस्वामी व हनुमंतस्वामी यांच्या समाधी मळ्यांत आहेत.

मठाची अधिकारपरंपरा येणेंप्रमाणें:—

श्रीरामदास
|
शिष्य कल्याण (पुण्यतिथि आषाढ शु. १३ शके १६३६)
|
,, मुधोबावा ( ,, ज्येष्ठ शु. १४ शके १६७१)
|
,, भिवाजी
|
,, महारुद्र ( ,, पौष व. ७ शके १७३३)
|
,, हनुमंतबावा ( ,, पौष शु. १५ शके १७८१)
|
,, अंबादास ( ,, आषाढ शु. १० शके १८२६)
|
पुत्र श्रीराम (विद्यमान)

शाहु महाराजांच्या पत्नी सकवारबाई यांस मुद्गलस्वामींचा अनुग्रह होता, असें कागदपत्रांवरून दिसतें. महाराणी सकवारबाईसाहेब यांचेकडून कल्याणस्वामींचे पुण्यतिथीस दरसाल २३६५ रुपये येत असत. मठाला उत्पन्न बरें आहे.

मठाच्या शेवटच्या दरवाज्यापाशीं दहा ओवऱ्या आहेत त्या १७३१ त कळेघोणकर शिष्य पोरे यांनीं बांधिल्या असा उल्लेख आहे.

कल्याणस्वामींच्या मठाखालील पोटमठ बरे च आहेत. त्यांचें सविस्तर टांचण पुढें केव्हां तरी करूं. तडवळयाचा जगन्नाथमहाराजांचा मठ या च मठाखालील होय. जगन्नाथमहाराज हे कल्याणस्वामींचे शिष्य असून त्यांची कांहीं कविता उपलब्ध

आहे. त्यांत त्यांनीं कल्याणस्वामींना नमस्कार केल्याचे चार श्लोक आहेत. समाधीला नमस्कार करितांना प्रथम दरवाज्यावरील श्लोक म्हणून नंतर हे चार श्लोक म्हणण्याचा परिपाठ असल्यामुळें आपणांस हि परंपरा तोडतां येत नाहीं.

कल्याण होणें जरि तूज आहे । कल्याणपायीं मन स्थीर राहे ।
कल्याणवाणी पडतां सुकानीं । कल्याण जाले बहुसाल प्राणी ॥ १

अविनाश हें नाम कल्याण ज्याचें । करी सर्व कल्याण सर्वां जिवांचे ।
समर्थें जना ऊतरायासि पारीं । अशी ठेविली मूर्ति कल्याणकारी ॥ २

श्रमहारिणीतटाकीं स्वामि कल्याण राजा ।
परम दिनदयाळु नांदतो स्वामि माझा ।
सदय हृदय ज्याचें ध्यान हें आठवीतां ।
परम सफळ येतो मोक्ष कल्याण हातां ॥ ३

बहु मत्तमत्तांतरें दाटि जाली । तयाचे पदीं वृत्ति निवृत्ति ठेली ।
जगज्जीवनाचा प्रभु जो अनामी । नमस्कार माझा श्रीकल्याणस्वामी ॥ ४

शंकर श्रीकृष्ण देव



( ४ )

## परिशिष्ट चवथें

॥ श्रीराम ॥

## श्री कल्याणस्वामींची आज च पुण्यतिथी *

अधिक शुद्ध आषाढ मासीं । तिथी बरवी ते त्रयोदशी ।
मीनले तद्दिनीं स्वरूप समरसीं । कल्याण स्वामी गुरुभक्त ॥

शके १६३६ अधिक आषाढ शुद्ध १३ स श्री कल्याण स्वामी समाधिस्त झाले, म्हणजे त्यांना जाऊन आज बरोबर २०१ वर्षे पुरीं झालीं. आज च त्यांची पुण्यतिथी. तेव्हां अशा मंगल दिनीं या शिष्यवराच्या चरित्राचें चिंतन करणें हें सर्वथैव योग्य होय.

भोगूरचे पटवारी कृष्णाजीपंत म्हणून होते. त्यांची स्त्री वारल्यानंतर वैराग्य प्राप्त होऊन ते तीर्थाटणास निघाले. मार्गांत कोल्हापुरीं श्रीमहालक्ष्मीच्या देवालयांत त्यांचा मुक्काम झाला. कृष्णाजीपंत अत्यंत तेजस्वी पुरुष होते व त्यांची एकंदर दिनचर्या एकाद्या तपस्व्याला साजेल अशी होती. त्या वेळीं बरवाजीपंत म्हणून कोल्हापुरास सुभेदार होते. त्यांना एक बहिण असून ती उपवर झाली होती. ती कृष्णाजीपंतास द्यावी असें बरवाजीपंतांच्या मनांत आलें. कृष्णाजीपंताजवळ त्यांनीं गोष्ट काढली. त्यांना हि जगदंबेचा साक्षात्कार झाला होता, त्यांनीं रुकार दिला व बरवाजीपंतांनीं आपल्या भगिनीचा विवाहसमारंभ मोठ्या थाटानें साजरा केला. कृष्णाजीपंतांच्या भार्येचें नांव रखुमाबाई ठेविलें. त्यांना एकंदर तीन अपत्यें झालीं. अंबेच्या कृपाप्रसादानें वडील पुत्र झाला म्हणून त्याचें नांव अंबाजी ठेविलें. दत्तप्रसादानें द्वितीय चिरंजीव झाले म्हणून त्यांचें नांव दत्तात्रय ठेवण्यांत आलें. तिसरें अपत्य कन्या होती. या त्रिमूर्तींना जन्म देण्यासाठीं च कृष्णाजीपंतांचा अवतार होता, असें म्हणावें लागतें. हीं तीन अपत्यें झाल्यावर ते तीर्थाटणास निघून गेले ते पुन्हां परत आले नाहींत । हीं तिन्हीं बालकें आपल्या मामाच्या घरीं च लहानाचीं मोठीं झालीं. तीं दहा बारा वर्षांचीं झालीं असतील तों श्री समर्थांची स्वारी संचार करीत करीत कोल्हापुरास आली आणि या त्रिमूर्तींचें भाग्य उदयास आलें. अंबाजीची एकंदर वृत्ति पाहून श्रीसमर्थ फार खुष झाले. श्रीसमर्थांनीं विचारल्यावरून अंबाजीनें आपलें अक्षर त्यांना दाखविलें. तें सुंदर होतें. हा मुलगा आम्हांस द्यावा, असें श्रीसमर्थ बरवाजीपंतास म्हणाले. आपल्या सेवेपरतें दुसरें भाग्य कोणतें, असे म्हणून अंबाजी व

---

* श्री रामदास आणि रामदासी मासिकांत क्रमशः आलेल्या आणि शके १८३० वैशाख शुद्ध २ या दिवशीं प्रसिद्ध झालेल्या " श्री सांप्रदायिक त्रिविध विषय – प्रथम खंड " या ग्रंथांतील देवांनीं लिहिलेला ६ वा लेखांक.

दत्तात्रय उभयतां बंधु, श्रीचरणाजवळ राहिले. हे च अंबाजी पुढें कल्याण झाले. ती आख्यायिका सर्वश्रुत च आहे.

निजवचनें वटशाखा तोडुनि जो शिष्य पावला पतन ।
तो कल्याण चि केला जीवनदानें करूनिया जतन ॥

शके १५६७ पासून तों १६०० पर्यंत कल्याणांना श्री सद्गुरुचरणांचा सहवास घडला. खांडुकाची गोष्ट, छाटी पडल्याची गोष्ट, चंचीची गोष्ट, तलवार घेऊन श्री समर्थ मार्गे लागल्याची गोष्ट, चोरांना पिटाळून लावल्याची गोष्ट, दासबोधांतील नेमकी ओवी काढून देण्याची गोष्ट, त्यांच्या सामर्थ्याच्या अनेक गोष्टी, या सर्व गोष्टींची आठवण वाचकांस नुसत्या संकेतानें हि होईल. श्रीसमर्थांच्या सर्व शिष्यांत कल्याण अत्यंत बलाढ्य होते. त्यांना एकदां श्रीसमर्थांनीं " बलभीम " म्हटल्याचा प्रसंग वाचकांस आठवेल च. श्री कल्याणस्वामींचें एकंदर चरित्र पाहिलें म्हणजे " गुरुनिष्ठा " हें त्यांच्या चरित्राचें रहस्य होय, असें स्पष्ट दिसतें. गुरुकृपेवांचून गतिदायक असें दुसरें साधन त्यांनीं कधीं मानलें च नाहीं व नाहीं हि खरें !

कल्याणस्वामींच्या सर्व गोष्टी विस्तृतपणें सांगावयास पाहिजे होत्या खऱ्या, पण आज आपणांस वेळ असून हि स्थळ नाहीं, त्यामुळें नाइलाज आहे. तथापि एक गोष्ट सांगतों; त्यावरून श्रीसमर्थांची शिस्त कशी होती, ती हि कळणार आहे. श्रीसमर्थांचे शिष्य साऱ्या भरतखंडभर पसरलेले होते व ठिकठिकाणीं त्यांचे मठ होते हें आतां आपणांस पूर्णपणें ठाऊक झालें आहे. ही सारी संघटना नियमबद्ध होती. तिच्यावर श्रीसमर्थांची पूर्ण देखरेख असे. ठिकठिकाणीं जाऊन एकंदर मठांची व्यवस्था कशी चालली आहे ती पाहून येऊन सर्व हकिकत श्रीसमर्थचरणीं निवेदन करण्यासाठीं सर्व भरतखंडभर संचारार्थ कांहीं प्रमुख शिष्यांची योजना होत असे. त्यांत कल्याणस्वामी हे बहुधा असावयाचे च.

अशा रीतीनें पडेल तें काम करून श्री कल्याणस्वामींनीं १६०० पर्यंत गुरुगृहीं वास केला. परंतु पुढें श्रीसमर्थांच्या मनांत काय आलें न कळे, त्यांनी कल्याणांना च महंती करावयास परंडाप्रांतीं पाठविलें. कल्याणांना गुरुचरणांचा वियोग असह्य झाला ! गुरुभक्ताचें चित्त श्रीगुरुचरणीं कसें जडलेलें असतें पहा. गुरुचरणांना नेत्रोदकानें मनसोक्त स्नान घालून व वारंवार वंदन करून कल्याणस्वामी परंड्याकडे जावयास निघाले खरें, पण त्यांचें सारें चित्त सद्गुरुपायीं होतें. आतां श्रीसमर्थांची मर्जी कोण सांभाळील, त्यांना स्नानाला उठा म्हणून कोण म्हणेल, पाणी कोण देईल, भोजन कोण घालील, पादसेवन कोण करील, अरण्यांत कोण बरोबर जाईल, सहजस्फूर्तीनें कवनरूप प्रेमोद्गार निघतील ते कोण तत्काळ उतरून घेईल, अशी चिंता करीत व गुरुचरण आठवीत श्री कल्याणस्वामींनीं

एक एक पाउल टाकावें ! परळ्यापासून तीन कोसांवर डोंबगांव आहे, तेथें ते गेले. तेथें त्यांनीं मठ च व्याप केला, तो थोडक्यांत कसा सांगावा ! श्री सद्गुरूंच्या सगुण रूपाचें दर्शन कल्याणांना पुन्हां व्हावयाचें नव्हतें. १६०३ च्या माघ वद्य ९ स श्रीसमर्थांनीं अवतार संपूर्ण केला. पुढें कल्याणस्वामी प्रतिवर्षी परळीस जात, पण वर गडावर जात नसत. सर्व च सज्जनगड त्यांना गुरुरूप भासे ! अजून हि गड चढूं लागण्यापूर्वी एकवार पायथ्याशीं च लोटांगण घालण्याची बुद्धि कोणाकोणाला होते, त्याचें कारण हें च असावें.

श्रीकल्याणस्वामींच्या चरित्रांतील गुरुनिष्ठेचा शेवटचा चमत्कार म्हणजे असा कीं, श्रीसमर्थांच्या अस्थि चाफळाहून काशीस नेण्यासाठीं वृंदावनांतून काढण्याची बुद्धि कल्याणशिष्य केशवस्वामीस १६३६ च्या अधिक आषाढ शु. १२ स झाली व त्या च दिवशीं इकडे डोंबगांवीं कल्याणांनीं आपला देह ठेवला ! श्रीसमर्थांच्या अस्थि घेऊन केशवस्वामी डोंबगांवीं येतात तों त्यांना हें वृत्त कळलें ! केशवस्वामी बहुत कष्टी झाले ! पण हा सर्व नेमानेम ठरलेला होता आणि उभयता गुरुशिष्यांच्या अस्थि एकत्र घेऊन केशवस्वामी काशीस गेले !

धन्य धन्य हें गुरुशिष्यपण । धन्य धन्य हें सेवाविधान ।
धन्य धन्य हें अभेदलक्षण । धन्य धन्य लीळा अगाध ॥

अशा श्री कल्याणस्वामींच्या पादुकांवर मस्तक ठेऊन अखंड रहावें.

१८३७ आषाढ शुद्ध १२ शनिवार — शंकर श्रीकृष्ण देव



## परिशिष्ट पांचवें

॥ श्रीराम ॥

# श्री समर्थशिष्यवर कल्याणस्वामी *

## — मठ डोमगांव —

## — परंपरा, ग्रंथसंग्रह, कवन वगैरे —



कल्याण नामा ग्रंथ विस्तारी । उत्कट कीर्ति विश्वाभितरी ।
देहांत साधनें गुरुआज्ञा करी । कल्याण चराचरीं पावला नाम ॥

स. प्र. १० – १६

( १ ) त्या कल्याणस्वामींचा हा मठ होय ! कल्याणांचें नाम उच्चारतां च त्यांच्या चरित्रांतील दोन ठळक गोष्टींचें तत्काळ स्मरण होतें. कल्याण म्हणजे श्रीसमर्थांचे ग्रंथलेखक व कल्याण म्हणजे श्रीसमर्थांचे एकनिष्ठ सेवक ! कल्याणांनीं श्रीसमर्थांची जशी सेवा केली, तशी सेवा करण्याचें दुसऱ्या कोणाच्या च नशिबीं नव्हतें ! गुरुसेवेपुढें त्यांनीं आपल्या प्राणाची हि पर्वा केली नाहीं; किंबहुना श्रीगुरुवचनप्रतिपालनार्थ त्यांनीं आपला प्राण हि खर्चिला आणि म्हणून च **कल्याण** हें अभिधान त्यांना प्राप्त झाले.

( २ ) श्री रामदासी मालेंतील तिसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत डोमगांव मठाची थोडीशी + हकिकत दिलेली आहे. आमचे बहुतेक मनोरथ पूर्ण करून व आम्हांवर अगणित उपकार करून आम्हांस जन्माचे ऋणी करून ठेवणाऱ्या या मठाची आणखी एकवार या ठिकाणीं थोडीशी जास्त माहिती नमूद करून ठेवण्याचें आज योजिलें आहे.

( ३ ) कुर्डूच्या वाडीपासून सात कोस किंवा केम स्टेशनपासून सहा कोस श्रमहारिणी ऊर्फ सीना नदीचे कांठीं मोगलाईंत डोमगांव आहे.

( येथें मूळांत डोमगांव मठांतील बाडांक ९ वरून म्हणजे श्रीसमर्थ-वाग्देवतामंदिरांतील बाडांक ५९ वरून या ग्रंथाचे पृष्ठांक ७४–७५ वरील " श्रमहरणीची आरती " दिलेली आहे. )

---

* श्री रामदास आणि रामदासी मासिकांत क्रमशः आलेल्या आणि शक १८३९ वैशाख शुद्ध २ या दिवशीं प्रसिद्ध झालेल्या " श्री सांप्रदायिक विविध विषय – प्रथम खंड " या ग्रंथांतील देवांनीं लिहिलेला ८६ वा लेखांक.

+ परिशिष्ट तिसरें पहा.

या गांवचा आणि कल्याणांचा मूळचा कांहीं एक संबंध नव्हता. श्रीसमर्थांनीं त्यांना हें स्थान नेमून दिलें आणि तेथें ते रहावयास गेले. या च स्थानाची योजना कां करण्यांत आली, याविषयीं अटकळ करण्यापलिकडे दुसरें साधन नाहीं. सुमारें शक १६०० पासून तों समाधीपर्यंत म्हणजे शक १६३६ पर्यंत कल्याणांचें या स्थानीं वास्तव्य झाल्यामुळें त्याला अत्यंत रमणीयता आली आहे. हा गांव मूळचा खरोखर डोंबांचा. पण त्याला परंपरेनें साधुसमागम घडल्यामुळें कायमचें क्षेत्रत्व प्राप्त झालें आहे. या गांवीं मठाच्या संबंधानें आहेत तेवढीं च ब्राह्मणांचीं घरें असून बाकी ब्राह्मणेतरांचीं आहेत. गांव उंचवट्यावर आहे. कल्याणांची समाधी, श्रीमत् ग्रंथराज दासबोधाची कल्याणस्वामींच्या हातची मूळ प्रत, श्रीसमर्थांनीं कल्याणांना घालून दिलेला किता, कल्याणशिष्य मुद्गल यांच्या हातचा श्रीदासबोध, केशवांच्या हातची त्याची सोनेरी रुपेरी प्रत, या व इतर अनेक तत्कालीन पवित्र वस्तूंचें दर्शन एकवार तरी श्रीसांप्रदायिकांनीं व श्रीसांप्रदायभक्तांनी घेतले पाहिजे ना? म्हणून म्हणतों, निदान एकवार डोमगांवची यात्रा सर्वांनीं अवश्य केली पाहिजे. डोमगांवला गेल्यावर सोनारी, परंडा, वरकुटें वगैरे आसपासचीं इतिहासप्रसिद्ध स्थलें पाहण्याविषयीं निराळी प्रार्थना करणें नको.

(४) या मठाची परंपरा व तोंडी माहितीप्रमाणें वंशवृक्ष व लेखी नोंदीवरून पुण्यतिथी येथें देतों :—

(पुढील पानावर)

- श्री रामदास
  - कल्याण ( पु. ति. १६३६ अ. आषाढ शु. १३ )
    - मुद्गल ( १६७१ ज्येष्ठ शु. १४ )
      - भिवाजी उर्फ भीमराज ( १७१० माघ शु. १३ )
      - रामाजी ( १६९१ कार्तिक व. १३ )
        - महारुद्र ( १७३३ पौष व. ७ )
        - लक्ष्मण उर्फ आबाजी (१७४१ आषाढ व. ७ )
          - हनुमंत ( १७८१ पौष शु. १५ )
          - सीताराम
            - ( अंबादास ) ( १८२६ आषाढ शु. १० )
              - श्रीराम
          - राघोबा
          - तात्याबा
            - सखाराम
              - दासमहाराज
                - दत्तात्रय
            - तुकाराम
              - तात्याबा
                - रघुनाथ
                  - (दिगंबर)
              - आबा
        - बाबाजी
          - शिवराम
            - मार्तंड
              - एकनाथ
          - राजाराम
            - आपाजी
              - राजाराम
          - रामकृष्ण
            - कल्याण
              - (निंबराज)
              - (सावळाराम)
        - नानाजी
          - तुळशीराम
            - (भीमराज)
            - रामबुवा
              - कोंडी
              - महारुद्र

ज्या नांवांखालीं रेघा ओढल्या आहेत, तीं या मठाची परंपरा दाखवितात. अंबादास महाराजापर्यंतचे पूर्व मठपति ब्रह्मचारी होते. वडील मुलानें ब्रह्मचारी रहावें व धाकट्यांनी गृहस्थाश्रम पतकरावा, अशी या मठानें वहिवाट ठेवली होती. ती अंबादास महाराजांपासून बंद पडली. ज्यांचीं नांवें कंसांत दर्शविलीं आहेत, त्यांनीं आम्हांस थोडी फार ग्रंथांची भिक्षा घालून कायमचे ऋणी करून ठेवलें आहे. वर नमूद केलेल्या पुण्यतिथींशिवाय आणखी तीन नोंदी एका बाडांत आढळतात, त्या अशा – जगन्नाथ १६७० पौष व. २, अनंतबावा १६९५ भाद्रपद व. ११, देवाजीपंत वैशाख व. ६. पैकीं अनंतबावा व देवाजीपंत कोण याची माहिती नाहीं. जगन्नाथ हे श्रीकल्याणांचे एक प्रमुख शिष्य असून तडवळें मठाचे संस्थापक होते. तडवळें मठाची हकिकत पुढें मागें देतांना या पुण्यतिथींची आठवण झाली पाहिजे.

( ५ ) ग्रंथ व कागदपत्रें यांची आम्हांस या गांवीं विपुल भिक्षा मिळाली. खुद्द मठांतील ६१ बाडें, नानाबुवापासून ६, दुर्गाबाईकडील ८ व सावळारामबुवापासून १६, व इतर किरकोळ कांहीं, मिळून सुमारें १०० वर बाडें मिळालीं. शिवाय केजचे श्रीमंत देसाईसाहेब यांचेकडून मिळालेलीं ६ बाडें मूळचीं या मठांतील च होत ! दासमहाराजांची कन्या देसाईसाहेबांस दिलेली आहे. त्यांनीं हीं बाडें आपल्याबरोबर माहेराहून नेलेलीं होतीं ! यापासून संशोधकांनीं एक नवीन च धडा घेतला पाहिजे. कोठल्या हि मठांत गेल्यावर नुसते तेथील च ग्रंथ पाहून भागावयाचें नाहीं, तर गत व विद्यमान मठपतींचे सोयरेधायरे व भाऊबंद या सर्वांचा शोध केला पाहिजे. ही जी एकंदर विपुल संपत्ति मिळाली तिच्या महत्त्वाची वाचकांस कांहींशी अटकळ व्हावी म्हणून इतकें च सांगतों कीं, बहुतांशीं या च संपत्तीच्या बळावर आजपर्यंतचा आमचा हा प्रपंच चालला व पुढें केक पिढ्या चालूं शकेल !

( ६ ) श्रेष्ठांची कविता कांहीं पण श्रीसमर्थ व श्रीकल्याणस्वामी यांची बहुतेक सर्व कविता या गांवीं मिळाली ! या च मठांतील अस्सल श्रीदासबोधावरून आपण तो प्रकाशित केला आहे व मालेंतील तिसरा भाग या च मठांतील कल्याणांच्या हातच्या एका बाडावरून छापला आहे व करुणाष्टकें हल्लीं छापत आहेत. श्रीसमर्थकृत सर्व लघुकाव्यें या मठांत मिळालीं आहेत व तीं करुणाष्टकानंतर स्वतंत्र पुस्तकरूपानें छापावयाचीं आहेत. श्रीसमर्थकृत पदे तर इतकीं विपुल मिळालीं आहेत कीं, न जाणों त्यांचा च पांचशें पृष्ठांचा स्वतंत्र ग्रंथ होईल. कल्याणस्वामींशिवाय त्यांचे बंधु दत्तात्रय, दिनकर, वेणाबाई, उद्धव, राघव, रंगनाथ या सहा समर्थशिष्यशिष्यिणींची कविता मिळाली आहे. दत्तात्रय, उद्धव, दिनकर व वेणाबाई यांचा आपणांस बराच परिचय झाला आहे, पण राघव आणि रंगनाथ यांचा आपणांस नांवापलिकडे परिचय नाहीं. राघवांचें एक पद मिळालें आहे, त्यांत कांहीं ऐतिहासिक प्रसंगांचे उल्लेख आहेत.

डोमगांव ] [ बाड* ३७

येथूनि आतां कल्याण सर्वांचें । चाफळा येणें जालें दीनानाथाचें ॥ ध्रु० ॥

क्षय वछरीं वियोग जाहाला । यात्रेमधें रथांक मोडला ।

तधींपासुनि सृष्टीसंहार जाहाला । देखोनि दयाकल्लोळ बोळला ॥ १ ॥

अब्दविकारी मंगळवासरीं । प्रतिपदा मुख्य पदाधिकारी ।

मंगळमाता ज्यामात श्रीहरी । दुख शोक चिंता भय संहारी ॥ २ ॥

ऐका हो मोठी चमत्काराची परी । अष्टादशें वाद्यें जालीं अंबरीं ।

आश्चीर्य वाटे सर्वांचे अंतरीं । अगाध लीळा दाविली यापरी ॥ ३ ॥

स्वामी सद्गुरु वातसुतावतारी । श्रीरामनामें विश्वासी उधरी ।

विश्वासें जाणा जो कोण्ही अंगीकारी । तो हि जगासी पावनाचि करी ॥ ४ ॥

यश कीर्ति प्रताप महिमा । आनंदवनभूवनीं उपमा ।

दुख शोकासी दुरी करी या नेमा । सद्गुरुकृपे राघवीं हा प्रेमा ॥ ५ ॥

क्षय संवत्सर म्हणजे १६०८. त्या संवत्सरांत यात्रेमध्यें रथांक मोडला आणि तेव्हांपासून महाराष्ट्रावर राजकीय अरिष्ट कोसळलें. हा काळ म्हणजे संभाजी-महाराजांचा काळ होय. विकारी संवत्सर म्हणजे १५८१ होय. त्या संवत्सरीं उत्सवामध्यें अंबरीं अष्टादशवाद्यें झालीं आणि तेव्हांपासून महाराष्ट्रांतून दुःख, शोक, चिंता, भय हीं हद्दपार जालीं. वातसुतावतारी जे श्रीरामदास त्यांच्या संप्रदायाचा जे कोणी विश्वासानें अंगिकार करितात ते हि जगास पावन करितात. हा प्रत्यय राघवांना येऊन च त्यांनीं श्रीसद्गुरुंची कांस धरिली. असा या पदाचा गोळा बेरजेनें मी कांहीं तरी अर्थ करितों. तो बरोबर आहे अशी मला खात्री वाटत नाहीं. इतरांना पटेल तसा अर्थ त्यांनीं करावा व कृपा करून कळवावा. रंगनाथांनीं गुरुशिष्यलक्षणें वर्णिलीं आहेत व जोहार केला आहे. जोहाराचा शेवट असा आहे :

मग रामदासबावाचे दरबारीं । राहिलों रंगनाथ परवरी ।

जुगांत जुगें चाकरी करी । तरी कोणी च दूर न करी ।

मायबाप जोहार घ्या ॥

कल्याणस्वामींची कांहीं कविता असेल, असें दहा पंधरा वर्षांमागें आपणांस वाटत नव्हतें व कल्याणांच्या हि अनेक शिष्यांनीं हजारांनीं मोजतां येईल इतकी कविता केली आहे, याची महाराष्ट्रास अजून माहिती व्हावयाची आहे. हरि, शाम, सामराज,

* म्हणजे श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ८७

नरहरि, दिगंबर, शिवराम, जगन्नाथ, केशव, जना व स्वामीदास अशा कल्याणस्वामींच्या दहा शिष्यांची कविता या मठांत आहे. तिचा मासला पुढील एकाद्या लेखांकांत देऊं. त्यानंतर राघव, यादव वगैरे परंपरेंतील पुढें होऊन गेलेल्या सच्छिष्यांची त्रोटक कविता आहे. कण्हेरी मठाचे संस्थापक जे वासुदेव गोसावी त्यांचे शिष्य माधव होते. त्या माधवांची कांहीं कविता आहे. अशी एकंदर श्रीसांप्रदायिक कविता आहे. इतर मठाप्रमाणें या हि मठांत सांप्रदायाबाहेरील शेकडों सत्पुरुषांची कविता आहे. त्यांचा नामनिर्देश वारंवार तरी कितीदां करावा! तथापि त्यांत हि कांहीं नांवें नवीन असतात च, म्हणून तीं सर्व नांवें देण्याचा आणि वाचण्याचा कंटाळा करतां कामा नये. मुकुंदराज, ज्ञानेश्वर, मुक्ताबाई, चांगा, नामदेव, गोणाई, जनी, वामन, केशव, भानुदास, येकनाथ, मुक्तेश्वर, तुका, तुकयाबंधु, चोखामेळा, उद्धवचिद्धन, राघवचिद्धन, अखंडानंद, सहजानंद, जयराम, विठारेणुकानंदन, जसवंत, कबीर, लतीफा, बस्वलिंग, रंगनाथ ( कृत गोपीचंद ), शिवराम पूर्णानंद, मीराबाई, त्रिंबक, दासकृष्ण, पुरंधर विठ्ठल, अनंत, अनंतसुत, शिवदिन, विष्णुदासनामा, गोसावीनंदन, ज्ञानदेव, अवधूत, श्रीधर, शंकर ( कृत दामाजीपंताची रसीद ), मानपुरी, कृष्णदासमुद्गल, कृष्णदयार्णव, मालो, मुकुंदराज ( कृत रुक्मिणीस्वयंवर ), मध्वमुनेश्वर, चैतन्यांकित देवदास, ब्रह्मगिरी अमृतराय, गंगाधर, अथर्वण गंगाधर, विठ्ठल, चिंतामणी ( कृत मल्लारी माहात्म्य ), कान्हा, जनमैत्रनागा, गुंडो केशव, जयरामजजांकित, माधवदास इत्यादि अनेक ज्ञात व अज्ञात सत्पुरुषांची प्रकाशित व अप्रकाशित अशी कविता या मठीं आहे.

( ७ ) मठांतील बाड अनुक्रमांक ७ * यांत पुढील नोंदी आहेत.

चित्रभान संवत्छरिं मंडपाचा पाया खाणायासि आरंभ केला कार्तिक शुद्ध ११ येकादसि सन हजार ११७२ शके १६८४

विजये नाम संवछरीं ( म्हणजे १६९५ ) इमारतिचा पाया खाणायासी आरंभ केला फाल्गुन शुद्ध पंचमी ५ वैशाखमासीं पाया घातला

दुर्मुख नाम संवछरीं ( १६९८ ) चउतरा तयार केला माघ वद्य चतुर्दसी खर्चाचा तपसील रुपयाचा

( नंतर पुढें तपसील आहे )

डोमगांवीं जाऊन पहाणारास याविषयीं जास्त खुलाशाची अपेक्षा वाटणार नाहीं. त्या च बाडांत पुढील दोन नोंदी मागाहून केलेल्या आहेत.

---

* म्हणजे श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ५७

पुढील्या स्वामीच्या देवळाचा पाया खाणायास आरंभ चैत्र
शुद्ध प्रतिपदा संवछर प्रमोद ( १७३२ )
विलंबी नाम संवछरे ( १७०० ) श्रावण शुद्ध दसमीस
वरीली इमारतिस चीरे काढायासी आरंभ केला सीदोजी पाथरूट

हें सातवें बाड फार महत्त्वाचें आहे. यांत शके १६५३ व १६५४ या दोन सालांचा जमाखर्च आहे. कल्याणांच्या पुण्यतिथीला कोणा शिष्यांकडून काय रकमा येत त्यांचा तपसील या बाडांत आहे. तसें च या च बाडांत कल्याणस्वामींच्या कांहीं शिष्यांचीं नांवें गांववार दिलेलीं आहेत. तीं आपण एकाद्या लेखांकांत नमूद करूं; कारण, तेणें करून संशोधकांना पुष्कळ मदत होणार आहे.

( ८ ) बाड ५२ * त पुढील महत्त्वाची नोंद आहे :—

शके १५७१ जाण । विरोधीनाम संवछर जाण ।
फाल्गुन वद्य द्वितीया इंदु पूर्ण । आलासे दीन चार घटका ॥ १

अशी नुसती नोंद आहे, पण त्या वेळीं काय झालें तें सांगितलेलें नाहीं ! इतरत्र जें कांहीं वाचण्यांत आलें आहे, त्यावरून माझी अशी समजूत होते कीं, या नोंदींत जो नक्की काळ दिला आहे तो चाफळास श्रीरामाची स्थापना झाल्याचा असावा ! तसें असेल तर ही नोंद श्रीसांप्रदायिकांना अत्यंत महत्त्वाची वाटेल.

( ९ ) बाड ९ § त शिवदिनकेसरींचें श्रीसमर्थावर पुढील पद आहे.

डोमगांव ] [ बाड ९ §

तेथें राम सखा राम सखा । रामदास गुरु वोळखा ॥ ध्रु० ॥
सज्जनगड अविनाशी । लक्षें उन्मन करित मनासी ॥ १ ॥
मुळिचा प्रताप रुद्र । सर्व हि सत्ता साक्ष समुद्र ॥ २ ॥
हृत्कला चित्कासी । नामें पद्मावती च सुखासी ॥ ३ ॥
अगणित चिन्मयखाणी । नामें अंगला बाई भवानी ॥ ४ ॥
शिवदिन जीवतमहर्ता । केसरी उद्बोधनी पूर्ता ॥ ५ ॥

( १० ) श्रीसमर्थस्तवनपर पुढील चार स्फुट नोंदी आहेत.

डोमगांव ] ( १ ) [ बाड १२ †

वैराग्यारामसीमा मितितममहीनामभीमावतारः ।
कामारिप्रेमधामा गुणगणमतिमान् रामनाम्नो विरामः ।

* म्हणजे श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक १०२.

§ म्हणजे मंदिरांतील बाडांक ५०. † म्हणजे बाडांक ६८

श्रीमान् कामादिदामा विकृत मति रति प्रीतिमान् माधवे यः ।
स श्रीमान् रामदासः सुरगुरुरवनीमागतः किं गुरुर्नः ॥ १ ॥
रामरामेति रामेति जपन्नास्ते सदैव यः ।
तस्मै श्रीरामदासाय प्रणमामि कृताञ्जलिः ॥ २ ॥

डोमगांव ] ( २ ) [ बाड १६ †

यो दासबोधमुखभूरिनिबंधनैः स्वैः
दूरीचकार विमलात्मपर प्रवृत्तेः ।
अंतस्थमंहः कलुशमानसमानवानाम्
श्री रामदासगुरुपादमहं भजामि ॥

डोमगांव ] ( ३ ) [ बाड ४२ ‡

श्रीरामसमर्थ

रामदास माउली सद्गुरु रामदास माउली ॥ ध्रु० ॥
या जगदोद्धारासाठीं हो विप्रमंदिरीं अवतरली ॥ १ ॥
प्रपंच लटिका जाणूनियां पंचवटीसी आली ॥ २ ॥
द्वादश वर्षे तप केलें कृपा रघुनाथा आली ॥ ३ ॥
बीज मंत्र सांगूनियां वस्त्रें हुर्मुजी दिधली ॥ ४ ॥
कृष्णातीरासी जाया आज्ञा श्रीरामें केली ॥ ५ ॥
द्वादश वर्षे तप केलें उपासना ह प्रगटविली ॥ ६ ॥
चाफळखोरा जाऊनियां राघवमूर्ति स्थापिली ॥ ७ ॥
अद्भुत कीर्ती करूनियां सज्जनगडासी आली ॥ ८ ॥
आपण निजधामा जाया आज्ञा वेणीसी दिधली ॥ ९ ॥
जगदोद्धार करा जा हो आज्ञा कल्याणा केली ॥ १० ॥
आश्रये निजदासा केला समाधिसेजे पहुडली ॥ ११ ॥

डोमगांव ] ( ४ ) [ वाड ५३ §

मळाचे परी द्रव्य चित्तांत भावी । शवाचे परी अंगना ते परावी ।
जसा भीम रामासि भक्तीस तैसा । नमस्कार माझा तया रामदासा ॥

† म्हणजे बाडांक ६६ ‡ म्हणजे बाडांक ५२ § म्हणजे बाडांक १०३

(११) सरते शेवटीं, दुसऱ्या कोणाला नसली तरी श्रीसांप्रदायिकांना माझी नम्रपणें प्रार्थना आहे कीं, त्यांनीं डोमगांवीं एकवार तरी जाऊन श्रीकल्याण-स्वामींच्या पादुकांवर मस्तक ठेवावें। गुरुपादुकांचें महत्त्व दर्शविणारें, या च मठांत सांपडलेलें, श्रीसमर्थकृत एक पद देऊन हें प्रकरण संपवितों.

डोमगांव ] [ बाड ४१ *

त्रिविध तापासि हारक हे गुरुपाय ।
भवसिंधूसी तारक हे गुरुपाय ॥ ध्रु० ॥
स्वात्मसुखाचें बीज हो हे गुरुपाय ।
ज्ञानाचें निजगूज हो हे गुरुपाय ॥ १ ॥
भक्तिपंथासी लाविती हे गुरुपाय ।
नयनीं रघुवीर दाविती हे गुरुपाय ॥ २ ॥
पूर्ण कृपेचा सागर हे गुरुपाय ।
सहज शांतीचे आगर हे गुरुपाय ॥ ३ ॥
रामदासाचें जीवन हे गुरुपाय ।
सकळ जीवासी पावन हे गुरुपाय ॥ ४ ॥

१८३८ मार्गशीर्ष शु ६ शंकर श्रीकृष्ण देव

* म्हणजे बाडांक ९१

( ६ )

## परिशिष्ट सहावें

॥ श्रीराम ॥

### श्री कल्याणस्वामींचे महंत †

( १ ) श्रीसमर्थशिष्यांत कल्याणस्वामींची योग्यता विशेष आहे. त्यांच्या संबंधानें जितका जास्त शोध होईल तितका त्यांच्या चरित्रावर व पर्यायानें सांप्रदायावर प्रकाश पडणार आहे. माझी अशी फार दिवसांची अकारण पण दृढ श्रद्धा आहे कीं, आपणांस पाहिजे आहे तसलें श्रीसमर्थांचें चरित्र श्रीमत् कल्याणस्वामींच्या च परंपरेंत केव्हां तरी उपलब्ध होणार आहे! जणें करून आपल्या सर्वांचें सारखें समाधान होईल, सर्वांच्या शंका फिटतील व संशय निरसतील, असें चरित्र आपणांस पाहिजे आहे. श्रीसमर्थांविषयीं जें जें म्हणून कळावें अशी आपणांस तळमळ आहे तें तें सांगणारें चरित्र हवें आहे. ज्याच्या प्रामाण्याविषयीं कोणाला च कांहीं शंका घेतां येणार नाहीं असें श्रीसमर्थांचें चरित्र मिळालें पाहिजे. असें चरित्र जर केव्हां तरी मिळावयाचें असेल तर तें कल्याणस्वामींच्या च परंपरेंत मिळण्याचा संभव आहे. आणि म्हणून त्यांच्या परंपरेच्या संशोधनास मदत करणाऱ्या कोणत्या च गोष्टीची उपेक्षा करतां कामा नये. आपले इष्ट हेतु केव्हां आणि कसे सफल होतील याचा कांहीं नियम नाहीं!

( २ ) या दृष्टीनें संशोधन होण्यास सहाय्य व्हावें म्हणून श्रीकल्याणस्वामींच्या महंतांचीं कळतील तितकीं नांवें व गांवें कळणें जरूर आहे. श्री रामदासी ग्रंथमालेंतील तिसरा भाग, श्री रामदासांची कविता – प्रथम खंड, याच्या प्रस्तावनेंत कल्याणांच्या ४२ महंतांचीं नांवें दिलीं आहेत, त्यांपैकीं फक्त अकरा जणांचीं च काय तीं गांवें दिलेलीं आहेत. त्यावेळीं तीं नांवें डोमगांव मठांतील बाड अनुक्रमांक ३ * यावरून दिलीं होतीं; परंतु बाड ७ त* जी यादी दिलेली आहे तींत बहुतेकांची वस्ती दिलेली आहे. शिवाय दोन्हीं यादींत पांच सहा नांवें कमी जास्त आहेत यासाठीं किंचित् पुनरुक्तीचा बोल पतकरून हि तीं नांवें व गांवें येथें देतों.

---

† श्री रामदास आणि रामदासी मासिकांत क्रमशः आलेल्या आणि शक १८३९ वैशाख शुद्ध २ या दिवशीं प्रसिद्ध झालेल्या " श्री सांप्रदायिक विविध विषय-प्रथम खंड " या ग्रंथांतील देवांनीं लिहिलेला ५० वा लेखांक

* म्हणजे आतां अनुक्रमें बाडांक ५३ व ५७

डोमगांव ] [ बाड ७*

## यादी श्री स्वामींचे महंत

१ रामाजी दादा बारामतीकर

२ केशव बावा उंबरजकर ( यांच्या मठाचें संशोधन कांहीं झालें आहे. )

३ जानाबा बावा वडगांवकर ( बहुधा शेणोली जवळचे वाघमाऱ्याचें वडगांव असावें. )

४ भिवाजी बावा अष्टेकर ( बहुधा हरी नारायणाचें अष्ट )

५ अंताजी बावा निनामकर

६ जगन्नाथ बावा तडोळेकर ( यांच्या मठाचें संशोधन कांहीं झालें आहे. )

७ शंकराजी गो वाईकर देशपांडे

८ सिवाजी गो आपचंद ( म्हणजे च शिवराम स्वामी त्यांच्या मठाचें संशोधन झालें आहे. )

९ कृष्णाजी गो तामसेकर

१० बहिरव गो वाईकर

११ स्वामी ( बहुधा चिंचोली मठाचे संस्थापक )

१२ शिवराम गो लातुरकर

१३ रामाजी बावा वाळुजकर

१४ हरिबावा भूमकर

१५ स्वामीदास तेलंगसीकर ( तेलंगसी गांव बीड जिल्ह्यांत पाटोदे तालुक्यांत तळें पिंपळगांव जवळ असावें असें सांगतात. मठाचें संशोधन व्हावयाचें आहे, पण स्वामीदासांची कांहीं कविता डोमगांवीं मिळालेली आहे. )

१६ रामाजी गो रेवडीकर

१७ जयेराम गो ( यांची वस्ती दिलेली नाहीं. १६१५ तील श्री दासबोधाची प्रत यांच्या च हातची असावी. )

१८ सुंदर जयराम

१९ गोविंद गो पनाळेकर

२० वासुदेव गो

---

* म्हणजे आतां बाडांक ५७

२१ अनंत गो सेणवी

२२ अनंत भट ( या दोघां अनंतांपैकीं कोणा तरी अनंतांची बरी च कविता डोमगांवचे संग्रहांत आहे. )

२३ आणाजी बावा भालकीकर

२४ महादेव गो इसलामपूरकर

२५ महादेव गो वराडकर

२६ आपाजी गो नाशिककर

२७ आपाजी गो हुजुरचे

२८ गोविंद गो कोळगांवकर ( बीड जिल्ह्यांत गवराई तालुक्यांत कोळगांव बहुधा आहे. १६२६ तील ग्रंथराजाच्या प्रतीचे लेखक दीन गोविंद ते हे च असावेत. )

२९ मुल्हारबावा हुजुरचे

३० नीळकंठ बावा हुजुरचे ( हुजुरचे म्हणजे श्रीसमर्थांकडील कीं काय कोण जाणे ! कीं छत्रपतीकडील ? )

३१ रामाजी गो गुरव

३२ मारोबा गो पांगरकर देशपांडे ( यांची कांहीं कविता डोमगांव संग्रहांत आहे. )

३३ आंबाजी गो भाजगांवकर

३४ नारायेण गो वाहेकर

३५ उदास गो घोडेश्वरकर

३६ शिवराम गो देवगांवकर ( देवगांव बहुधा परंडे तालुक्यांत असावें. )

३७ शामजी गो जवळेकर ( यांची च बहुधा कांहीं कविता डोमगांवच्या संग्रहात आहे. )

३८ शंभु गो

३९ लक्षुमण गो वीरवाल्हेकर

४० आनु आका

४१ काळु बाई

४२ वलि मह[illegible] नांदणजकर ( नांदणज गांव बीड जिल्ह्यांत अष्टी तालुक्यांत आहे. )

४३ क्षेत्रपाळ गो। नामवंसि कुरडुकर

( ३ ) संशोधन करण्याला खरोखर हें केवढें विस्तृत क्षेत्र आहे! या त्रेचाळीस मठांपैकीं २, ६, ८ या तीन च मठांचें कांहीं संशोधन झालें आहे, बाकी सर्व मठ अजून शोधावयाचे आहेत. २, ३, ६, ८, १५, २२, ३२ व ३७ यांची व आणखी इतर दोघा चौघा शिष्यांची थोडी फार कविता उपलब्ध आहे; बाकीच्यांची कविता नसेल, असें मानावयास कांहीं च कारण नाहीं. संशोधकाच्या हातीं अधिकार असता, किंवा हातीं अधिकार असणारे संशोधक असते, तर जें काम एका फरमानानें झालें असतें, त्या च कार्यविषयीं बोलतांना अनाधिकारी संशोधकाला अनेक जन्मांचा हवाला द्यावा लागत आहे!

१८३८ पौष शु. ८ शंकर श्रीकृष्ण देव



( ७ )

# परिशिष्ट सातवें

॥ श्रीराम )

## श्री कल्याणकृत संतमाळा *

( १ ) मागील लेखांक ४१ त श्रीसमर्थकृत संत नामावळी दिली आहे. आज कल्याणस्वामींनीं केलेलें संतस्तवन द्यावयाचें आहे. त्यांत कल्याणस्वामींनीं कोदंडधारी श्रीरामाच्या मूर्तीचे ठायीं अनेक सत्पुरुषांची कल्पना करून एक उत्कृष्ट रूपक बनविलें आहे. कल्पना तर हृदयंगम आहे च, पण तींत कल्याणांनीं श्री समर्थांना जें स्थान दिलें आहे व स्वतःकरितां व आपल्या बंधूकरितां जीं स्थानें राखून ठेविलीं आहेत, त्यांवरून त्यांचा मार्मिकपणा विशेष च दिसून येत आहे. संतमाळा पाठ करण्यासारखी आहे.

( येथे डोमगांव मठांतील सावळाराम बुवांकडील बाडांक १५ म्हणजे च श्री समर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक १२८ वरून या ग्रंथाच्या पृष्ठांक ४७-४८ वरील " ओव्या संतमाळा " हें प्रकरण दिलें आहे. )

( २ ) स्वतः कल्याण व त्यांचें बंधु दत्तात्रय वगळून या नामावळींत एकंदर बत्तीस सत्पुरुषांचा उल्लेख आहे. त्यांना जीं स्थानें देण्यांत आलीं आहेत तीं अशीः-

मुकुट — मुद्गल भट
तिलक — निवृत्ति
अक्षता — मुक्ताबाई
नयनद्वय — भानुदास व कूर्मदास
नासिका — आचार्य स्वामी
मुख — रामानंद
कर्णद्वय — नामदेव व ज्ञानदेव
वाचा — नरसिंहसरस्वती
कुंडलद्वय — मुकुंदराज व मुक्तेश्वर
सुमनहार — कबीर आणि जसवंत
बाहु — साळया व एकनाथ
वीरकंकण — कृष्णदास केशव
धनुष्य — धनाजाट
तूणीर — तुकाराम
यज्ञोपवीत — कृष्णयाज्ञवल्की
नाभि — मिराबाई
कटिसूत्र — नरहरि सोनार
पीतांबर — दासोदिगांबर
शांतिवसन — जयराम

---

* श्री रामदास आणि रामदासी मासिकात क्रमशः आलेल्या आणि शक १८३९ वैशाख शुद्ध २ या दिवशीं प्रसिद्ध झालेल्या " श्री सांप्रदायिक विविध विषय-प्रथम खंड " या ग्रंथांतील देवांनीं लिहिलेला ५१ वा लेखांक.

| | |
|---|---|
| स्तनद्वय – नारायण आणि अच्युताश्रम | रूप – आनंदमूर्ति |
| | रंग – रंगनाथ |
| मन – वामन | चरण – सुरदास आणि रोहिदास |
| प्राण – रामदासस्वामी | पाउलें–कल्याण आणि दत्तात्रय |

( ३ ) म्हणजे याचा अर्थ असा होतो कीं, १६०३ च्या माघ व. ९ नंतर श्री कल्याणस्वामींना कोणी विचारलें असतें कीं, श्री समर्थांचें अजून हि प्रत्यक्ष दर्शन व्हावें अशी एकाद्यास तळमळ असल्यास त्यानें त्यांना कोठें पहावें, तर कल्याणांनीं उत्तर दिलें असतें कीं, श्री रामाच्या हृदयांतरीं श्री समर्थ भेटतील ! श्रीरामहृदय म्हणजे च श्री समर्थ ! आणि आपणाविषयीं कोणास असा प्रश्न पडूं नये म्हणून त्यांनीं सांगून ठेवलें कीं, आपण दुसरीकडे कोठें हि कोणास आढळणार नाहीं, ज्यांना आपणांस भेटावें अशी इच्छा होईल त्यांनीं श्री रामाच्या पाउलांचे ठायीं आपला शोध घ्यावा !

१८३८ पौष शु. ९ शंकर श्रीकृष्ण देव

## (८)

# परिशिष्ट आठवें

## भालगांव व डोमगांव मठांचा संबंध*

डोमगांवचा मठ म्हणजे कल्याणस्वामींचा मठ होय. इतर कित्येक मठांतील व डोमगांवच्या मठांतील जीं कागदपत्रें पाहण्यांत आलीं आहेत, त्यावरून असें दिसतें कीं, डोमगांव मठाविषयीं इतर मठांना विशेष आदर वाटत असे. हें अगदीं साहजिक होतें. आतांपर्यंत जीं साधनें प्रकाशित झालीं आहेत त्यावरून आपल्या सर्वांच्या निदर्शनास आलें आहे कीं, श्रीसमर्थांच्या सर्व शिष्यांत कल्याणांची योग्यता विशेष होती! निकटचा किंवा दूरचा कसला च त्यांना स्वार्थ नव्हता, सारा अभिमान अगदीं गळून गेला होता, एका सद्गुरुचरणसेवेवांचून त्यांना दुसरें तिसरें कांहीं दिसलें च नाहीं. श्रीसमर्थांच्या पश्चात् उद्धव, दिवाकर, भास्कर, भानजी, रामाजी वगैरे शिष्यांत, केवळ गैरसमजुतीमुळें कां होईना, पण जो प्रेमकलह उत्पन्न झाला होता, त्यापासून अगदीं अलिप्त राहून उभय पक्षांस कल्याणस्वामींनीं कशा समजुतीच्या गोष्टी सांगाव्या, हें आपण प्रकाशित कागदपत्रांवरून पाहिलें च आहे. अशी च निरग्रह वृत्ति कल्याणांच्या पश्चात् डोमगांवच्या गादीवर जे पुरुष बसले होते त्यांची होती. या सर्व कारणांमुळें डोमगांव मठांतील पुरुषांविषयीं इतर मठांना विशेष आदर वाटावा, हें अगदीं साहजिक आहे.

ही च गोष्ट सिद्ध करणारें पत्र येथें देतों. भालगांवमठपति खंडेराव यांनीं तें डोमगांवमठपति भिमाजी व रामाजी यांना मुद्गलांच्या निधनासंबंधानें लिहिलेलें दिसतें. मुद्गलांची निधनतिथि १६७१ ज्येष्ठ शु. १४ आहे, तेव्हां हें पत्र ज्येष्ठ वद्यांतलें किंवा आषाढांतलें आहे. दोन्हीं मठांचा हा संबंध लक्षांत यावा म्हणून जरूर तेवढी दोन्हीं मठांची परंपरा दर्शवून तें पत्र खालीं देतों.

**डोमगांवपरंपरा**




**भालगांवपरंपरा**




---

* श्री रामदास आणि रामदासी मासिकांत क्रमशः आलेल्या आणि शक १८४२ चैत्र शुद्ध १ या दिवशीं प्रसिद्ध झालेल्या "श्रीसांप्रदायिक विविध विषय-द्वितीय खंड" या ग्रंथांतील देवांनीं लिहिलेला ९३ वा लेखांक

पत्र अस्सल असून बाळबोधींत सुंदर अक्षरांनीं लिहिलेलें आहे.

श्री रामदासां कल्याण

स्वामी

श्रीगुरुभजनैकनिष्ठ विमळअंतःकरण रघुपतिदयागृह्णार्ते बंधुवर्य परमश्रिया विराजित राजश्री भीमाजी गोसावि व रामचंद्रगोसावि यांप्रति खंडोबानाम्ना कृतानेक नमस्कार विनति उपरि आपणाकडिल पत्र आलें तेथें लिहिलें होतें कि श्री परंधामवासि जाले तेणे करून बहुत आसमाधान जाले तें हृदयवासि परत्रें साक्ष आसे ते तों ब्रह्मानंदघन परंतु देहसमंधैक उर्मि आवरत नाहि त्या समयिं च येत होतों येथें जो आवरोध जाला तें सविस्तर राजेश्री नारायेण बावा निवेदितिल त्याजवरून विदित होइल उपासनेचा अभीमान श्रीस आसे आपण खेद टाकुन त्यांचा पादुकांचा ध्यास करणें सर्व निर्वाह ते चि करितिल कांहि चिंता न करणें आम्हास हि तुम्हावेगळें अन नाहि बहुत बहुत प्रकारें आपलें शरिर रक्षणें अशनि भाषणी वस्त्रग्रहणी परस्छळि स्वस्छळि सावध आसणें लोकीकी प्रकार अनेक जाले आहेत श्रीचे दयेकरून सर्व कल्याण चि होईल तुम्ही तो विवेकी सुज्ञ आसां बहुत काय लीहिणें वर्षाकाळानंतरें श्रीस्छळास येतों वारंवार साकल्यलेखन करणें लोभ न टाकणें हे विनति राजेश्री बाजीराय देशमुख व भवानीराय व माधवराय देशमुख यांप्रति आशिर्वाद उपेरी तुम्ही श्रीस्छळि वडीलावडीली स्वामीचें संस्छान रक्षीलें आतां जें भजन कराल तें समर्थास बहुतसें मान्य आसे तुम्ही जे परमार्थरक्षणी ध्वजा आसां आम्ही समाचार ऐकतां च यावें परंतु येथील वर्तमान गो नारायेण गो निवेदीतां विदित होईल बहुत काय लिहिणें हे सुचना

बाह्य मायना व आंतील विचार, आस्था, प्रेम, उपदेश वगैरे अंतर्बाह्य लक्षणांमुळें जुन्या पत्रव्यवहारांत जो मोहकपणा असतो, तो या हि पत्रांत आहे व इच्छा आहे कीं, त्यांतील भक्तिप्रेम आपल्या सर्वांच्या अंतरीं उतरावें. श्रीसमर्थ प्रत्यक्ष असतां अभाविकाच्या ठिकाणीं हि भाव उत्पन्न झाला असेल ! पण खंडोबा ग्वाही देतात, **आतां जें भजन कराल तें समर्थास बहुतसें मान्य आसे.** या वचनाचा सर्व संप्रदायिकांनीं विचार करावा.

